साहित्यसंमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर-विशेषांक

वर्ष २ रें ] मे १९४९ [ अंक ८ वा

या अंकांत

**राजकीय वास्तववाद आणि आध्यात्मिक आदर्शवाद**— आ० जावडेकर

**साहित्यसंमेलनाच्या कार्याचें समालोचन**— प्रा. न. र. फाटक, प्रा. गं. भा. निरंतर

**आ० जावडेकर यांच्या साहित्याचें व राजकीय तत्त्वज्ञानाचें समीक्षण व त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें दर्शन**— शंकरराव देव, आ. स. ज. भागवत, एस्. एम्. जोशी, र. के. खाडिलकर, शि. गो. भावे, ना. ग. गोरे, दि. के. बेडेकर, प्रभाकर पाध्ये, गोपीनाथ तळवलकर, श्रीपाद जोशी

**आ० जावडेकरांचें अभिनंदन व व्यक्तिदर्शन**— शंकरराव देव, प्रा. मा. दा. अळतेकर, प्रा. दे. द. वाडेकर, रावसाहेब पटवर्धन, त्र्यं. सी. कारखानीस, माधवराव बागल, प्रेमा कंटक, ह. मो. जोशी, बा. भ. बोरकर, ग. गं. जांभेकर, ह. कृ. मोहनी इत्यादि.

**टी. एस. इलिअटचें काव्य**-प्रा. अ. के. भागवत; **सौंदर्यबोध**- रवीन्द्रनाथ ठाकूर, अनु० प्रा. सौ. जोशी; **कलानिष्ठा व जीवननिष्ठा**-प्रा. रा. भि. जोशी; **रसाचें व्यवच्छेदक लक्षण**-प्रा. श्री. मा. कुलकर्णी; **लमाणांचा तांडा** (कविता)-प्रा. वि. म. कुलकर्णी; **सार्वजनिक मराठी ग्रंथालयें**-श्री. कृ. शं. हिंगवे.

१ रुपया













नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

## या अंकांतील जाहिराती



# पूर्ण चंद्राची देणगी

आधुनिक शास्त्रज्ञांनीं सूर्य किरणांतील डी जीवन सत्वाचा शोध लावला आहे. परंतु चंद्रकिरणांतील औषधी गुणधर्मांची माहिती फार प्राचीन कालापासून आयुर्वेदीयास होती व म्हणूनच आयुर्वेदानें पूर्णचंद्रास औषधांचा पति म्हणून संबोधिलें. आयुर्वेदीय कल्पांत उपयोगांत आणलेल्या कांहीं विशिष्ट वनस्पतींचे गुणधर्मांत चंद्रकिरणांनीं आश्चर्यकारक भर पडते. प्रवाळ चंद्रपुटी हें दाह नाहींसें करणारें बलदायक भस्म आहे. चंद्रकिरणांखालीं वाळविल्यामुळें हे गुणधर्म त्यामध्यें येतात असा आयुर्वेदीयांचा विश्वास आहे. अहमदनगर येथील आयुर्वेदाश्रम फार्मसीमध्यें आधुनिक शास्त्रीय पद्धति व प्राचीन आयुर्वेदीय पद्धति यांचा सुसंगत मिलाफ करून अत्यंत प्रभावी औषधी तयार केल्या जातात. त्यामुळें त्यांची योजना करणारे वैद्य व डॉक्टर आणि त्यांचे सेवन करणारे रुग्ण या उभयतांची त्यांचेवर पूर्ण श्रद्धा जडली आहे.

## आ यु र्वे दा श्र म

फार्मसी लि. (आफालि)  अ ह म द न ग र.








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

## जाहिरातीचे दर

| | संबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | १५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | १२० रुपये |

(१) सर्व जाहिराती 'जाहिराती व जाहिरातदार' या सदरांत छापल्या जातात.

(२) शक्य असेल त्या वेळेस जाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.

(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.

(४) पानाचा आकार ८॥''×५।''

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २.







अनुक्रमणिका

# औद्योगिक वृत्त-विशेष

( पॅरेमाउंट पब्लिसिटी सिंडिकेट लि., पुणें २ तर्फे प्रकाशित. )

**मे. डेक्कन पॉटरीज् अँड अलाइड इंडस्ट्रीज् लि.** ( चिंचवड ) यांचा चिनी मातीच्या कपबशा, टी सेट्स्-बरण्या वगैरे उत्कृष्ट प्रतीचा माल अल्पावधींत बाजारांत आला आहे. पुण्याच्या नॅशनल सेव्हिंग्ज प्रॉजेक्ट्स् प्रदर्शनांत या कंपनीचा सुबक व सफाईदार माल ठेवण्यांत आला आहे. महाराष्ट्रांत निघणाऱ्या प्रस्तुत प्रकारच्या मालांत या कंपनीनें केलेल्या वस्तूंचा पहिला नंबर लागेल असें जनतेचें मन पडलें.

कापूस कताई व विणकाम करण्याचें उद्योगासाठीं **आदर्श टेक्स्टाइल्स लि.** ( आग्रारोड कॉर्नर, ठाणा ) ही पांच लक्ष रु. अधिकृत भांडवलाची खाजगी लिमिटेड कंपनी स्थापन झाली असून श्री. एल्. जी. विंझे हे तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

अरण्यांनीं व्यापलेल्या कूर्ग प्रांतांत प्रचंड कागदाची गिरणी काढण्याचा उपक्रम **"दि कावेरी पेपर मिल्स अँड फॉरेस्ट इंडस्ट्रीज लि."** ( फ्रेजरपेट् कूर्ग. द. हिंदुस्थान ) यांनीं हातीं घेतला असून कंपनीला वजनदार डायरेक्टर्स लाभले आहेत. शेठ रतनचंद हिराचंद हे एक महाराष्ट्रीय उद्योगपती या बोर्डावर आहेत.

युद्धकालांत चॉकोलेटची निर्मिति करणाऱ्या **'नलि चॉकोलेट्स मॅन्युफॅक्चरिंग कंपनी'** ( नवी पेठ, पुणें २ ) यांनीं ग्रामोद्योगाचे पद्धतीवर आतां 'नलि टॉफीचें' उत्पादन सुरूं केलें आहे. ग्लुकोज व शुद्ध दूध यापासून ही टॉफी केलेली असून किंमतींत माफक आहे.

मोटारींची आयात व व्यापार करण्यासाठ **'गिरी ऑटोमोबाइल्स लि.'** (७७७ रविवार पेट बेळगांव) ही पांच लक्ष रु. अधिकृत भांडवलाच कंपनी स्थापन झाली असून सावंतवाडीचे श्रीमं राजेसाहेब तिचे पहिले डायरेक्टर आहेत.

**श्री. एस्. एम्. कणगली,** हे पूना डिरेक्टरीचें तिसरें प्रकाशन, ९५, बुधवार पुणें २ येथें मे १९४९ मध्यें प्रसिद्ध करतील. ही डिरेक्टरी १९४९ पर्यंतच्या पुण्यांतील सर्व घडामोडींची परिपूर्ण माहिती देईल.

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाचें मासिक

वर्ष दुसरें | अंक आठवा

# नवभारत

मे १९४९

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक

---

| | | |
|---|---|---|
| राजकीय वास्तववाद व आध्यात्मिक आदर्शवाद | आ. शं. द. जावडेकर | ५७७–५८४ |
| लमाणांचा तांडा (कविता) | प्रा. वि. म. कुळकर्णी | ५८५–५८६ |
| रांजणीं रांजण (कविता) | श्री. श्रीनिवास कोर्लेकर | ५८६ |
| टी. एस् इलिअटचें काव्य | प्रा. अ. के भागवत | ५८७–५९६ |
| सौन्दर्यबोध | श्री रवीन्द्रनाथ टाकूर<br>अनु० प्रा. सौ. सिंधु जोशी | ५९७–६०३ |
| कलानिष्ठा आणि जीवननिष्ठा | प्रा. रा. भि. जोशी | ६०४–६०८ |
| गांधीवाद्यांचें कर्तव्य | श्री. शंकरराव देव | ६०९–६१६ |
| महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयें | श्री. कृ. शं. हिंगवे बी.ए. डी.एल्.एस्सी. | ६१७–६२३ |
| रसाचें व्यवच्छेदक लक्षण | प्रा. श्री. मा. कुळकर्णी | ६२४–६२७ |
| आचार्य जावडेकर : संक्षिप्त जीवनपरिचय | श्री. श्रीपाद जोशी | ६२८–६३४ |
| आचार्य जावडेकर यांचे प्रकाशित ग्रंथ | | ६३४ |
| गेलीं महाराष्ट्र-साहित्यसंमेलनें व त्यांचें कार्य | प्रा. न. र. फाटक | ६३५–६४१ |
| मागील साहित्यसंमेलनांतील ठरावांचें समालोचन | प्रा. गं. भा. निरंतर | ६४२–६४७ |
| 'अध्यक्ष' जावडेकर | आ. स. ज. भागवत | ६४८–६५१ |

अनुक्रमणिका








| | | |
|---|---|---|
| क्रांतिनिष्ठ महाराष्ट्राचे मार्गदर्शक | श्री. एस्. एम्. जोशी | ६५२–६५६ |
| गांधीवादाचा प्रभावी भाष्यकार | श्री. र. के. खाडिलकर | ६५७–६६१ |
| मीं पाहिलेले जावडेकर | श्री. शिवराम गोविंद भावे | ६६२–६६६ |
| जावडेकरांच्या वैचारिक यात्रेचा मागोवा | श्री. ना. ग. गोरे | ६६७–६७२ |
| जावडेकरांची भाषाशैली | श्री. गोपीनाथ तळवलकर | ६७३–६७४ |
| व्यक्तिवादी राष्ट्रवादाचे आचार्य | श्री. दि. के. बेडेकर | ६७५–६८१ |
| | | ६८७ |
| आचार्य जावडेकरांची लेखनशैली | श्री. प्रभाकर पाध्ये | ६८२–६८७ |
| संमेलनाध्यक्ष जावडेकर : अभिनंदन व व्यक्तिदर्शन | | |
| स्थिरप्रज्ञ जीवननिष्ठ तत्त्वचिंतक | श्री. शंकरराव देव | ६८८–६८९ |
| निष्कपट वृत्ति व शास्त्रीय दृष्टि | प्रा. मा. दा. अळतेकर | ६८९–६९१ |
| जावडकरांचें वैचारिक विभूतिमत्त्व | प्रा. दे. द. वाडेकर | ६९१–६९३ |
| सत्याग्रही समाजवादी आ० जावडेकर | श्री. पु. ह. पटवर्धन | ६९४–६९५ |
| माझे थोर सल्लागार व सहायक | श्री. माधवराव बागल | ६९५–६९६ |
| तपस्वी साहित्यकार | श्री. प्रेमा कंटक | ६९६–६९७ |
| 'लोकशिक्षणा'चे अभिमानी व महनीय लेखक | श्री. ग. गं. जांभेकर | ६९७–६९९ |
| मार्क्सवाद्यांतील माझे पहिले गुरु | श्री. त्र्यं. सी. कारखानीस | ६९९–७०० |
| जावडेकरांना जवळून पाहिल्यावर | श्री. बा. भ. बोरकर | ७०१–७०३ |
| अहिंसात्मक मनोवृत्तीचा विजय | श्री. ह. मो. जोशी | ७०३–७०४ |
| क्रियावान् पंडित | श्री. ह. कृ. मोहनी | ७०५–७०७ |
| विचार हेंच जीवन | श्री. शिवाजी न. भावे | ७०७ |

---

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. र. ग. जोशी यांनीं **सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २,** येथें छापून, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्त-मंडळाकरितां तेथेंच **नवभारत कार्यालयांत** प्रसिद्ध केलें.

# संमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर विशेषांक, मे १९४९

## निवेदन

२७ मार्च १९४९ ला आचार्य शं. द. जावडेकर हे महाराष्ट्र—साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष निवडले गेले. या निमित्तानें 'नवभारता'च्या 'मे' च्या अंकांत त्यांचें साहित्य, तत्त्वज्ञान, व्यक्तिमत्त्व यासंबंधीं, त्याचप्रमाणें ते ज्या संघटनेचे अध्यक्ष झाले आहेत त्या साहित्यसंमेलनासंबंधींहि, कांहीं अधिकारी व्यासंगी लेखकांचे लेख देणें समयोचित होईल" असें वाटलें. त्याप्रमाणें योजना करून आम्हीं बऱ्याच अधिकारी लेखकांस विनंति केली. कालावधि फार थोडा होता. कारण दरमहिन्याच्या अंकाप्रमाणें 'मे'चा अंक १ तारखेस प्रसिद्ध व्हावा, ती तारीख शक्य तों टळूं नये, ह्या गोष्टीवरही कटाक्ष होताच. म्हणून ती मर्यादा सांभाळून ठराविक कालमर्यादेपर्यंत लेखकांना लेख पाठविण्यास विनंति केली होती. आनंदाची गोष्ट ही कीं बऱ्याच लेखकांनीं आमच्या विनंतीस मान देऊन लेख पाठविले. त्याबद्दल त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतों. प्रस्तुतचा 'संमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर विशेषांक' हा त्यांच्या या हार्दिक सहकार्याचें फळ होय.

प्रस्तुत अंकांत आचार्य जावडेकरांच्या सखोल विचारसंपदेचें, त्यांच्या समन्वयी राजकीय तत्त्वज्ञानाचें व त्यांच्या अनासक्त, तपस्वितुल्य व्यक्तिमत्वाचें निरनिराळया अधिकारी व्यक्तींनीं केलेलें समीक्षण वाचकांना विचारप्रवर्तक व उद्‌बोधक वाटेल असा विश्वास वाटतो. गेल्या पंचवीस वर्षांत त्यांनीं निर्मिलेली ग्रंथसंपत्ति विशाल व समृद्ध आहे. गांधीजींच्या जीवनदर्शनानें प्रभावित झालेल्या या विचारवंत परिणतप्रज्ञ साहित्यिकानें राज्यशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान यांमधील प्राचीन काळापासून अद्ययावत् सिद्धान्तांचें अभ्यासपूर्वक मनन करून शास्त्रपूत अशा आपल्या अधिकारवाणीनें भारतीय संस्कृति, राजकारण, समाजकारण आणि धर्मकारण यांमधील निरनिराळ्या प्रश्नांसंबंधीं स्फूर्तिप्रद विवेचन, मार्गदर्शन व सिद्धांतन केलें आहे. गेल्या २५ वर्षांत आपल्या लेखणीनें, वाणीनें आणि रहाणीनें त्यांनीं ज्या ओजस्वी विचारांचा प्रसार केला त्यामुळें महाराष्ट्राची एक तरुण पिढी कशी प्रभावित झाली याची साक्ष या अंकांतील अनेक लेखांवरून पटण्यासारखी आहे. हे सर्व लेखक आज आपापल्या क्षेत्रांत मान्यता पावलेले थोर विचारवंत कार्यकर्ते आहेत, ही गोष्ट लक्षांत घेतल्यास आचार्य जावडेकरांची कामगिरी किती असामान्य आहे याची कल्पना येईल. आचार्य जावडेकरांचें साहित्य विचारसंपन्न व प्रेरक आहे एवढेंच नाहीं, तर त्यांची एक साहित्यगुणविशिष्ट अशी प्रभावी लेखनशैलीही आहे, ह्याचें या अंकांत अधिकारी विवेचन केलेलें आढळून येईल.

अलीकडे हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थिति फारच बदलली आहे. गेल्या दोन वर्षांत महान्, दूरपरिणामी घटना घडून आल्या आहेत. देशांत निरनिराळे विचारप्रवाह सुरू आहेत. सर्वोदयवादी, गांधीवादी, कॉंग्रेसवादी, मार्क्सवादी, कम्युनिस्ट अशा निरनिराळ्या नांवांनीं व छटांनीं व्यक्त होणाऱ्या विचारसरणी देशांतील परिस्थितीचें व घटनांचें आपापल्या परीनें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न करीत आहेत. या भिन्नभिन्न विचारसरणींतून आचार्य जावडेकर कसे दिसतात हें पहाणें आचार्य जावडेकरांच्या चहात्यांच्या दृष्टीनेंही मनोरंजक व बोधप्रद आहे. अशा भिन्न विचारसरणींतून आपापल्या विशिष्ट भूमिकांप्रमाणें व प्रकृतिभेदांप्रमाणें कांहीं लेखकांनीं जावडेकर यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचें व भूमिकेचें केलेलें समीक्षण वाचकांना अत्यंत विचारप्रवर्तक वाटेल असा विश्वास वाटतो.

आचार्य जावडेकरांचें राजकीय तत्त्वज्ञान व भूमिका यांबद्दल जरी तीव्र मतभेद असले तरी त्यांच्या सौजन्यमय व्यक्तिमत्वाबद्दल सर्वांचीच संपूर्ण एकवाक्यता आहे. त्यांचे बाळमित्र, निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत असलेले त्यांचे सहकारी, चहाते व अभ्यासक यांनीं त्यांच्याविषयींचीं जीं शब्दचित्रें

रेखाटली आहेत, त्यांवरून प्रतीत होणारें त्यांचें अपरिग्रही, तपोधन, चिंतनशील, सौजन्यमय व्यक्तिमत्त्व त्यांनीं निर्मिलेल्या साहित्याशीं सुसंवादी असें आहे.

आतांपर्यंत होऊन गेलेल्या एकतीस संमेलनांच्या कार्याचा आढावा प्रा. न. र. फाटक व ।. गं. भा. निरंतर यांनीं आपल्या लेखांतून घेतला आहे, तो वाचकांना समयानुरूप व विचारप्रवर्तक वाटेल. पुणें येथील ज्या ' नगरवाचनमन्दिरा 'तर्फे आगामी महाराष्ट्र साहित्यसंमेलन भरणार आहे, त्या नगरवाचन-मन्दिराचा शतवार्षिक उत्सव येत्या साहित्यसंमेलनाच्या आधीं साजरा होणार आहे. या निमित्तानें प्रस्तुत अंकांत दिलेला ' मराठी ग्रंथालयें ' हा लेख आवश्यक ती माहिती येईल, असा विश्वास आहे. पुणें-नगरवाचनमन्दिराचें या शताब्दीनिमित्त मनःपूर्वक अभिनंदन करून त्याला आम्हीं परमोत्कर्ष चिन्तितों.

याशिवाय या अंकांत दिलेले इतर विषयांवरील लेख साहित्यान्तर्गत म्हणून साहित्यसंमेलनाच्या निमित्तानें उत्पन्न होणाऱ्या विचाराला व वातावरणाला पोषक होतील असा अंदाज आहे. साहित्यशास्त्रांतील एक जुना सनातन प्रश्न ' रसाचें लक्षण कोणतें ' यासंबंधीं नागपूरच्या विं. सिटी कॉलेजांतील प्रा. श्री. मा. कुळकर्णी यांनीं एका लेखांत चर्चा करून आपला एक सिद्धान्त प्रतिपादिला आहे. रवीन्द्रनाथ ठाकूरांनीं सौंदर्य आणि साहित्यानंद यांची जी मौलिक मीमांसा केलेली आहे तिचा मूळ बंगालीवरून अनुवाद प्रा. सौ. जोशी यांनीं केला आहे, त्यावरून रवीन्द्रनाथांच्या विचारसौन्दर्याचें व वैशिष्ट्यपूर्ण शैलीचें दर्शन होईल. रवीन्द्रनाथांची जन्मातिथि मे मध्यें (ता. ६ ला) पडत आहे ही जाणीव रवीन्द्रनाथांच्या रसिक वाचकांना हा लेख वाचतांना निःसंशय आल्हाददायक वाटेल. इंदूर येथें गेल्या फेब्रुवारींत भरलेल्या शारदोत्सवांत श्री. वि. स. खांडेकर यांनीं केलेल्या भाषणांतील कांहीं विधानांची चर्चा प्रा. रा. भि. जोशी यांनीं प्रस्तुत अंकांतलि आपल्या लेखांत केली असून, अलीकडे मराठी वाङ्मयांत दिसून येणारी जीवनमूल्यांविषयींची अश्रद्धा ही आधुनिक जागतिक साहित्यांत दिसून येणाऱ्या जीवनविषयक अश्रद्धेचें प्रतिबिंब आहे असें सूचित केलें आहे. अशा तऱ्हेच्या जीवनविषयक अश्रद्धेचे पडसाद अत्यंत अभिनव तऱ्हेनें मांडलेले ज्यांच्या साहित्यांत दिसून येतात ते, नोबेल प्राइझ मिळवून जगाच्या साहित्यांत अग्रपूजेचा मान मिळविलेले श्रेष्ठ साहित्यिक, टी. एस्. ईलिअट यांच्या काव्याचा प्रा. अ. के. भागवत यांनीं प्रस्तुत अंकांत करून दिलेला परिचय प्रसंगानुरूप वाटेल. प्रा. रा. भि. जोशी यांनीं आपल्या लेखांत उल्लेखिलेल्या उद्ध्वस्त मानवी जीवनाच्या संदर्भांत प्रा. वि. म. कुलकर्णी यांची ' लमाणाचा तांडा ' ही कविता अर्थपूर्ण वाटण्याचा संभव आहे.

' नवभारता 'चा प्रस्तुत अंक नेहमींच्या अंकांपेक्षां मोठा झाला आहे. नेहमीं दर अंकांत ८० पानें मजकूर आम्हीं देत आलों आहोंत. या अंकांत तो १३० पानांच्या वर गेला आहे. वर्गणीदारांना वर्गणीच्याच मूल्यांत हा अंक देतांना साहजिकच ' नवभारता 'ला जादा आर्थिक झीज सहन करावी लागली आहे. पुढील अंकांतील क्रमशः कांहीं पानें कमी करून हा जादा खर्च भरून काढावा लागणार आहे. या परिस्थितिप्राप्त व्यावहारिक धोरणाबद्दल वाचक व वर्गणीदार यांनीं आम्हांस क्षमा करावी अशी विनंति आहे.

प्रस्तुत जावडेकर-विशेष-अंकाची योजना करून ती पार पाडण्यांत आचार्य भागवत यांचें मला फार साहाय्य झालें आहे, त्यांचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करणें मी माझें कर्तव्य समजतों. त्याचप्रमाणें अंक पावणेदोनपट जास्त वाढला असूनहि तो वेळेवर छापून दिल्याबद्दल ' सुलभ—मुद्रणालया 'चे व्यवस्थापक श्री. सरनाईक यांचाहि मी आभारी आहे.

—वि. म. वेडेकर








आचार्य शं. द. जावडेकर

# राजकीय वास्तववाद आणि आध्यात्मिक आदर्शवाद

वास्तववाद आणि आदर्शवाद यांतील विरोध मानवी जीवनाच्या सर्व अंगांत दृष्टीस पडतो. अर्थात् तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र, राज्यशास्त्र व इतर सामाजिक शास्त्रें, या सर्वांत वास्तववादी विरुद्ध आदर्शवादी असे दोन विचारप्रवाह दिसून येतात. जग कसें आहे आणि तें कसें असावें, मनुष्य-स्वभाव कसा आहे व तो कसा असावा, आपण कसे जगूं शकूं आणि आपण कशा प्रकारें जगावें हे प्रश्न मनुष्यापुढें सतत उभे राहतात. वास्तविक मनुष्य कसा आहे आणि मानवाचा आदर्श कोणचा या दोहोंचेंहि ज्ञान आपणांस असल्यावांचून आपल्या जीवनांतील कोणताहि प्रश्न समाधानकारकपणें सुटूं शकत नाहीं. हे दोन प्रश्न परस्परांहून पृथक् किंवा अलगहि करतां येत नाहींत. मनुष्याचा वास्तविक स्वभाव कसा आहे याचें उत्तर मिळाल्यावांचून मनुष्याचा आदर्श ठरवितां येत नाहीं; आणि मनुष्याचा आदर्श विचारांत घेतल्यावांचून मनुष्याचें वास्तविक स्वरूप कोणतें आहे त्याचेंहि खरें उत्तर मिळूं शकत नाहीं. म्हणूनच तत्त्वज्ञान असो कीं नीतिशास्त्र असो, राजकारण असो कीं समाजशास्त्र असो, काव्यनाटक असो कीं साहित्य शास्त्र असो, या सर्वांत आदर्शवाद व वास्तववाद यांच्यांतील मतभेद व दृष्टिभेद प्रत्ययास येत असतो. आम्हांस या लेखांत या सर्व विषयांत शिरावयाचें नसून येथें फक्त राज्यशास्त्रांतील लोकशाहीचें ध्येय आणि ती लोकशाही भ्रष्ट न होऊं देतां ती शुद्ध बनविण्याचा मार्ग येवढ्या एकाच प्रश्नाचा विचार करावयाचा आहे.

## आत्मराज्याचा आदर्श

केवळ आध्यात्मिक आदर्शवादाच्या दृष्टीनेंच विचार केला तर म. गांधी ज्याला रामराज्य असें म्हणत, ज्याला प्राचीन ग्रंथांत सत्ययुग असें नांव आहे व ज्याला आपण आत्मराज्य असें म्हणूं शकूं अशी दंडहीन सामाजिक अवस्था हेंच आपलें राजकीय ध्येय म्हणावें लागेल. याच आत्मराज्यास युरोपीय राज्यशास्त्रांत "आध्यात्मिक अराज्यवाद" (Spiritual Anarchism) अशी संज्ञा दिलेली आढळते. पण ही केवळ एकांतिक आदर्शवादी दृष्टि कोणताहि राजकीय व्यवहार करण्यांत पुरी पडूं शकत नाहीं म्हणून व्यवहारदृष्टीनें अथवा वास्तववादी दृष्टीनें म. गांधी लिहितात :

"The nearest approach to pures anarchy would be a democracy based on nonviolence. The European democracies are to my mind a negation of democracy."

"Harijan", July 21, 1940.

अहिंसेच्या अधिष्ठानावर उभारलेली लोकशाही हेंच शुद्ध अराज्यवादाच्या अधिकांत अधिक निकटचें असें ध्येय आहे. युरोपखंडांतील लोकशाही ही खरी लोकशाही नसून तींत लोकशाहीचा पूर्ण अभाव आहे. लोकशाही राज्याला अहिंसेचें अधिष्ठान दिलें पाहिजे, याचा अर्थ काय? लोकशाही पद्धतीचें झालें तरी आणि अहिंसेचें अधिष्ठान त्याला दिलें तरी ती समाजाची दंडहीन अवस्था नव्हे. लोकशाही-राज्यांतहि राजदंडाची आवश्यकता आहे आणि हा राजदंड जेथें उपयोगांत येतो तेथें अहिंसेला बाध येतो. असें असलें तरी अहिंसाधिष्ठित लोकशाही हेंच आपलें वास्तववादी ध्येय होऊं शकतें. आत्मराज्य हा आपल्या अंतःकरणांतील आध्यात्मिक आदर्श असून त्याचें बाह्य मूर्त वास्तववादी स्वरूप अहिंसाधिष्ठित लोकशाही राज्य हेंच आज होऊं शकतें असा म. गांधींचा








आशय वरील उताऱ्यावरून दिसून येतो. युरोपीय लोकशाही ही धनिक लोकशाहीच्या अंकित गेली असल्यामुळें ती खरी लोकशाही नसून तो लोकशाहीचा भ्रम आहे हें आतां सर्वमान्य होऊं लागलें आहे. पण अहिंसाधिष्ठित लोकशाही म्हणजे तरी काय याचा आपण अधिक खोल विचार केला पाहिजे.

## युरोपीय संस्कृतीचे दोन ध्रुव

आधुनिक युरोपांत जी संस्कृति निर्माण झाली तिची निर्मिति करणाऱ्यांच्या पुढें सॉक्रेटिस आणि ख्रिस्त हे दोन आदर्श होते. काहींनीं ग्रीक संस्कृतीचा पुनरुद्धार करण्याचें ध्येय आपल्यापुढें ठेवून आधुनिक युरोपीय संस्कृतीचा पाया घातला. त्यांनीं सॉक्रेटिस हा आपला आदर्श म्हणून पुढें ठेविला असला तरी त्या सॉक्रेटिसाचें तत्त्वज्ञान प्लेटोच्या मुखानेंच त्यांनीं समजून घेतलें. प्लेटोचें राज्यशास्त्र हें तत्त्ववेत्त्यांच्या हातीं राजदंड द्यावा या ध्येयाचा पुरस्कार करणारें होतें. तत्त्ववेत्त्यांच्या हातीं राजदंड देणें म्हणजे लोकशाही नव्हे. प्लेटोचें हें ध्येय लोकशाहीला मारक आहे. प्लेटोच्या विचाराचा आधार घेऊन ज्यांनीं आधुनिक युरोपांत राज्यशास्त्राचा विचार केला ते बहुतेक लोकशाहीविरोधकच बनले. ग्रीक संस्कृतीच्या आधारावर आधुनिक संस्कृति निर्माण करण्याचा प्रयत्न ज्यांनीं केला त्यांची विचाराची दिशा तज्ज्ञ, शहाणे किंवा तत्त्वज्ञानी अशा थोड्या लोकांच्या हातीं राज्यसत्ता द्यावी अशी बनूं लागली. गेल्या २५।३० वर्षांत युरोपांत लोकशाही नष्ट करून एकपक्षीय अनियंत्रित सत्ता स्थापन करण्याचे जे प्रयोग कम्युनिझम व फॅसिझम या नांवानें झाले त्यांच्या या प्रयोगांस प्लेटोच्या "तत्त्वज्ञान्यांचें राज्य" या ध्येयाचा आधार घेतां येणें शक्य आहे.

आधुनिक युरोपीय संस्कृतीचा दुसरा उगम येशू ख्रिस्ताचा जीवनसंदेश पुनः जगापुढें ठेवावयाचा हा उद्देशानें करण्यांत आलेल्या प्रयत्नांत दिसून येतो. तसा प्रयत्न प्यूरिटन लोकांनीं केला. या प्यूरिटन पंथाचा आद्य प्रणेता कॅल्व्हिन हा होता. या कॅल्व्हिनच्या अनुयायांचें राजकीय ध्येय "संतांचें राज्य"—(The rule of saints) हें होतें. पण तत्त्वज्ञान्यांचें राज्य जसें लोकांचें राज्य नव्हे त्याचप्रमाणें संतांचें राज्य हेंहि लोकांचें राज्य नव्हे. तत्त्वज्ञान्यांच्या हातीं राजदंड देण्याची कल्पना जशी लोकशाहीला मारक आहे त्याचप्रमाणें संतांच्या हातीं राजदंड देणें हेंहि लोकशाहीला मारक आहे. प्लेटो किंवा कॅल्व्हिन यांच्या विचारांतून लोकशाहीचा उदय होऊं शकत नाहीं. संतांच्या हातीं राजदंड देऊन दुष्टांचा संहार करण्याचें कार्य घडविण्याचा प्रयत्न ज्या प्यूरिटन लोकांनीं केला, त्यांना लोकशाहीची स्थापना करण्यांत यश मिळालें नाहीं. शिवाय या हिंसक मार्गाचा आश्रय त्यांनीं केल्यावरोबर प्यूरिटन पंथांत निर्माण झालेलें आत्मबल नष्ट होऊन त्यांच्या प्रयत्नांतून उदयास येणाऱ्या राज्याला परमेश्वरी साम्राज्याऐवजीं सैतानी साम्राज्याचें स्वरूप येऊन लोकशाहीचें रूपांतर धनिकशाहींत झालें. प्यूरिटन पंथाचा हा प्रयोग हिंसेच्या साधनानें करण्यांत येत असतांना ख्रिस्ताचा जीवनसंदेश आचरणांत आणण्याचा हा मार्ग नव्हे, असें सांगणारा एक जॉर्ज फॉक्स नांवाचा संत इंग्लंडांत झाला. त्यानें अहिंसेचें राजकारण निर्माण करण्याचा व आत्मबलानें राजकीय जुलमाला प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नांतून पुढें क्वेकर पंथ जन्मास आला. म. गांधींच्या सत्याग्रही राजकारणाचा धागा या क्वेकर पंथाच्या उगमापर्यंत जाऊन पोंचतो. येशू ख्रिस्ताचा जीवनसंदेश संतांच्या हातीं राजदंड देऊन अंमलांत आणण्याचा प्यूरिटन लोकांचा प्रयत्न विफल झाला व तें योग्यच होतें. येशू ख्रिस्त हा खरोखर संतांचें राज्य स्थापन व्हावें या वृत्तीचा नसून तो खरोखर आध्यात्मिक अराज्यवादी होता. त्याचा हा आध्यात्मिक अराज्यवाद एकांतिक आदर्श–निष्ठेवर उभारलेला होता. ख्रिस्ताच्या जीवनांतून प्रज्वलित झालेली आध्यात्मिक आदर्श–निष्ठा आणि प्लेटोच्या राज्यशास्त्रांत वर्णिलेलें तत्त्वज्ञान्यांचें राज्य हीं दोन आधुनिक युरोपीय संस्कृतीचीं उगमस्थानें आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. केवळ आध्यात्मिक आदर्शवादाचा स्वीकार केल्यास अराज्यवाद हें ध्येय बनतें. पण तें वास्तववादी नाहीं. केवळ








# राजकीय वास्तववाद आणि आध्यात्मिक आदर्शवाद

वास्तववादी दृष्टीनें विचार करूं लागल्यास तत्त्ववेत्त्यांचें राज्य, संतांचें राज्य, तज्ज्ञांचें राज्य, शहाण्यांचें राज्य, असें होतां होतां एकपक्षीय सर्वंकष अनियंत्रित सत्ता व तीहि धनिकांची किंवा धटिंगणांची बनते! हीं दोनहि टोकें वगळून आध्यात्मिक आदर्शवाद आणि राजकीय वास्तववाद यांचा समन्वय साधिल्यावांचून शुद्ध लोकशाही किंवा जिला म. गांधी अहिंसाधिष्ठित लोकशाही असें नांव देतात ती निर्माण होऊं शकत नाही. राजकीय वास्तववाद आणि आध्यात्मिक आदर्शवाद यांचा समन्वय करावयाचा तर लोकशाहीला अहिंसेचें अधिष्ठान देऊन सत्याग्रहाच्या मार्गानें धनिकशाहीच्या कचाटींतून तिला मुक्त केलें पाहिजे. केवळ आध्यात्मिक आदर्शनिष्ठा वा केवळ राजकीय वास्तववाद यांनीं हा लोकशाहीचा प्रश्न सुटणें शक्य नाहीं.

## लोकशाहीची शुद्धता आणि सत्याग्रह

तत्त्ववेत्ते किंवा संत यांच्या हातीं राजदंड देऊन लोकांचें राज्य निर्माण होऊं शकत नाहीं. इतकेंच नाहीं तर राजदंडाचा उपयोग करणारे तत्त्ववेत्ते अथवा संत हे स्वतःच तत्त्वच्युत अथवा भ्रष्ट बनतात. म्हणून लोकशाहीचें शुद्धीकरण व्हावयाचें तर तत्त्ववेत्त्यांचें किंवा संतांचें मंत्रिमंडळ बनवून चालणार नाहीं. राजदंड हातीं घेणारे लोक केवळ आध्यात्मिक आदर्शवादी असून चालणार नाहीं. राजदंड हातीं घेणाऱ्यांनीं राजकीय वास्तववादच अनुसरला पाहिजे. पण याचा अर्थ समाजाला किंवा लोकशाही राज्याला संतांच्या किंवा द्रष्ट्या तत्त्ववेत्त्यांच्या नेतृत्वाची किंबहुना राजकीय नेतृत्वाची आवश्यकता नाहीं, असा मात्र होऊं शकत नाहीं.

यासंबंधीं ए. डी. लिंडसे यांच्या Essentials of Democracy या छोट्या पुस्तकांत फार सुंदर विवेचन केलें आहे. त्यांतील पुढील उतारा या प्रकरणीं लागू पडतो. प्लेटोनें लोकशाही राज्यावर केलेल्या टीकेसंबंधीं व त्यांतून काढलेल्या निष्कर्षासंबंधीं लिहितांना लिंडसे म्हणतात :

"Plato developed the implications of this criticism in his doctrine that there can be no salvation to states until they are ruled by men with true understanding of the ends or purposes of life. The same view of the state was implicit in the Calvinism of Geneva. Calvinism was not democratic. It demanded the rule of the saints.... Democracy rests on the principle, not that all men's views on what are right and wrong are of equal value, nor on the denial of the existence of saints and prophets, but on the doctrine that compulsory morality is a contradiction in terms....... This does not mean that prophets and saints are not to guide and illumine our moral lives—but that they are to do it by persuasion and example and not by force."

लोकशाही समाजांतील राजदंड संतांच्या हातीं देऊं नये याचा अर्थ लोकशाही समाजाला द्रष्टे तत्त्वज्ञानी आणि साधुसंत यांच्या नेतृत्वाची आवश्यकता नाहीं असा होत नाहीं. समाजांतील सर्वच व्यक्तींची नैतिक बुद्धि सारखीच विकसित झालेली असते अथवा समाजांतील सर्व व्यक्ती सारख्याच नीतिमान् अथवा शहाण्या असतात असा लोकशाहीचा सिद्धान्त नाहीं. समाजाच्या बुद्धीला आणि शीलाला नवी दृष्टि देऊन सामाजिक शीलाची उन्नति करणारे द्रष्टे मार्गदर्शक संत समाजाला कव्हांही हवेच असतात. लोकशाही राज्य शाबूत ठेवून सामान्यजनतेला आपल्या कर्तव्याचें मार्गदर्शन करणारे नेते त्याला लाभले नाहींत व त्यांनीं समाजाची तत्त्वनिष्ठा व ध्येयवृत्ति आणि अनत्याचारी भावना जागृत ठेविली नाहीं तर लोकराज्यहि गुंडराज्य होण्यास यत्किंचित् अवकाश लागणार नाहीं. या गुंडराज्यांतून कांहींकाल अराजक माजून अखेरीस एकपक्षीय अनियंत्रित सत्ता निर्माण होते आणि लोकशाही राज्य रसातळास जातें. म्हणूनच समाजांतील सत्यनिष्ठा आणि अहिंसावृत्ति प्रज्वलित करून ती तेवत ठेवणारे राजकीय नेते व सामाजिक संत यांची लोकशाही राज्याला सर्वांत अधिक आवश्यकता आहे. पण समाजांतील आत्मबलाचें चैतन्य सदैव जागृत ठेवून त्याची शीलोन्नति करणारे व










त्याला मार्गदर्शन करणारे संत सत्ताधारी बनता कामा नये. समाजाच्या शीलाची उन्नति करणारे आणि त्याची बुद्धि प्रज्वलित करून ती ध्येयनिष्ठ बनविणारे राजकीय कर्मयोगी सत्याग्रही-वृत्तीचे असले पाहिजेत व त्यांनी आपलें हें कार्य समाजावर सक्ती करून लादण्याचा प्रयत्न न करता त्याचें आत्मबळ जागृत करून स्वतःच्या उदाहरणानें, आचरणानें व उपदेशानें तें केलें पाहिजे. राज्य-सत्तेला—मग ती राज्यसत्ता लोकशाही राज्यांतील असो किंवा इतर कोणत्याहि पद्धतीच्या राज्यांतील असो—अन्यायापासून परावृत्त करणारे व प्रसंगी प्रजेचें आत्मबल जागृत करणारे व तिला विरोध करणारे राजकीय संत लोकशाहीच्या शुद्धीला आव-श्यक आहेत.

## विरोधी पक्ष व व्यक्तिस्वातंत्र्य

सत्याग्रही राजकीय कर्मयोग्यांची आवश्यकता लोकशाहीच्या शुद्धीकरणास आहे हें खरें असलें तरी सत्याग्रही लोकसेवक हे स्वतः राज्यसत्ता आपल्या हातीं घेत नसल्यामुळें राजदंड धारण करणाऱ्या पक्षावर त्यांनीं केलेली टीका कित्येक वेळां अवास्तव ठरून परिणामतः बेजबाबदार होण्याचा धोका आहे. जें धोरण राज्यसत्तेनें अमलांत आणावें असें ते म्हणतील तें धोरण केवळ ध्येयदृष्टीनें कितीहि उचित असलें तरी व्यवहारांत अशक्य असणें संभवनीय आहे. यामुळें सत्याग्रही लोकसेवकांनीं सत्ताधारी पक्षावर केलेली टीका व्यवहारतः बरोबर आहे कीं नाहीं हा प्रश्न नेहमींच वादग्रस्त होणार. म्हणूनच त्याचा निर्णय अखेरीस कोणी तरी, सत्याग्रही लोकसेवक जें धोरण पुरस्कारीत असतील, ते अमलांत आणून दाखविण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतलीच पाहिजे. जर असा कोणताहि पक्ष तें धोरण अमलांत आणण्याचा योग करण्यास मिळाला नाहीं तर निदान त्या ...लीत तरी तें धोरण अमलांत येणें व्यवहारतः ... म्हणावें लागेल. म्हणून ज्यांनीं ... स्वीकारलें

लोकशाही मार्गानें येईल असे प्रयत्न केले पाहिजेत. अर्थात ते ज्या पक्षावर टीका करीत असतील, त्याच्या हातीं सत्ता असतांना त्याच्या विरोधी असा एक दुसरा राजकीय पक्ष त्यांना जवळ करावा लागेल. लोकशाही राज्यांत व्यक्तिस्वातंत्र्य व मत-स्वातंत्र्य असल्यानें निरनिराळ्या मतांचे निरनिराळे पक्ष अस्तित्वांत येणें साहाजिक आहे.

लोकशाहींत राजकीय पक्ष असावेत किंवा नसा-वेत असा एक प्रश्न उपस्थित होत असतो. या प्रश्नाचा विचार करतांनाहि केवळ आदर्शदृष्टीनें विचार न करता आदर्शनिष्ठ वास्तववादी दृष्टीनें जर आपण विचार करूं तर एका तत्त्वाच्या व धोरणाच्या राजकीय कार्यकर्त्यांना पक्षसंघटनेनें व शिस्तीनें काम केल्यावांचून कोणतेंहि काम करता येत नाहीं व आपलीं मतेंहि टिकविता व वाढविता येत नाहींत हें आपल्या लक्षांत येईल. म्हणून समान किंवा सदृश विचारसरणीच्या लोकांनीं पक्षसंघटना करून वागण्याची आवश्यकता आपण मान्य केलीच पाहिजे. विशेषतः जे लोक देशांतील राज्ययंत्र आपल्या हातीं घेऊन समाजावर नियंत्रण ठेवून त्याची सेवा करूं इच्छितात त्यांना एक शिस्तबद्ध पक्ष बनविल्यावांचून व शिस्तभंगासाठीं आपल्या पक्षाच्या सभासदांना जाब विचारल्यावांचून राज्य चालविता येणार नाहीं. पण त्याचबरोबर आपण हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं पक्षसंघटनेमुळें कांहीं दोषहि निर्माण होतात. पक्षनिष्ठा व सत्यनिष्ठा यांत विरोध उत्पन्न झाल्यास सत्यास जागून पक्षाविरुद्ध बोलण्याचें, लिहिण्याचें व वागण्याचें नैतिक धैर्य पक्षाच्या सभासद-व्यक्तींमधून नष्ट होतां कामा नये. पक्षातीत सत्यनिष्ठेची जोपासना करण्यासाठीं अनेकांनीं कोणत्याहि पक्षाचें बंधन न स्वीकारतां आपण समाजाची सेवा करूं शकतों, हें किंवा त्याचें मार्गदर्शन करूं शकतों, हें स्वतःच्या उदाहरणानें दाखवून दिलें पाहिजे. या सक्रिय उदाहरणाचा परिणाम निरनिराळ्या पक्षांत राहून काम करणाऱ्या लोकांवरहि होत ...या परिणाम येवढा होईल कीं राजकीय ... अनेक ... व्यवहार करीत ...व्यक्ती पक्षातीत





वृत्तीनें वागूं शकतील. लोकशाही राज्यांत एक सरकारी पक्ष व एक तरी विरोधी पक्ष असणें अवश्य आहे. सरकार चालविणाऱ्यांना ज्याप्रमाणें पक्षविशिष्ट शिस्तीनें वागण्याची आवश्यकता असते, तशीच विरोधी पक्षांसहि असते. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं ज्या पक्षानें प्रचंड बहुमतानें एकदां सरकार हस्तगत केलें आहे त्याला सनदशीर पद्धतीनें विरोध करून लोकशाही मार्गानें सरकार आपल्या हातीं घेऊं पाहणाऱ्या व्यक्तींना पक्षसंघटनेची त्याहून अधिक आवश्यकता असते. कोणत्याहि राज्यांतील सत्ताधारी व्यक्तींना किंवा पक्षाला विरोधी पक्ष नसावा किंवा असण्याची गरज नाहीं असें वाटणें ह्यापासून लोकशाही राज्याला भय किंवा धोका निर्माण होत असतो, हें आपण विसरतां कामा नये. यासंबंधींहि लिंडसे यांचे पुढील विचार मननीय आहेत :

" We often discuss whether representative government flourishes best with two parties or with more. But no one with least understanding of its nature would think that it could get on with one party.... The Bolshevik maxim, adopted by Kuomintang-'no opposition party and no opposition within the party'- is the antithesis of democracy."

या उताऱ्यांत लिंडसे म्हणतातें कीं प्रातिनिधिक राज्यव्यवस्था चालण्याच्या दृष्टीनें दोन पक्ष असावेत कीं अधिक पक्ष असावेत असा वाद चालतो. पण ज्यांना प्रातिनिधिक राज्याची यत्किंचित्‌हि माहिती आहे त्याला असें केव्हांहि वाटणार नाहीं कीं हें राज्य एकाच पक्षावर चालूं शकेल. आपल्या पक्षांत किंवा पक्षाबाहेर विरोध असूं नये असें बोल्शेविक पक्षाचें सूत्र, कोमिन्टँग पक्षानें स्वीकारलें आहे, हें लोकशाहीच्या अगदीं विरुद्ध वृत्तीचें निदर्शक आहे. लोकशाहीचा कारभार बहुमतानुसार चालणें अपरिहार्य आहे. तो प्रत्येक बाबतींत सर्वानुमतेंच चालला पाहिजे, सर्वत्र एकच मत दिसलें पाहिजे असा आग्रह धरण्यापासून जुलमी राजवट येण्याचा धोका निर्माण होतो. सर्व बाबतींत एकच मताचा प्रभाव पडला पाहिजे असा प्रयत्न इंग्लंडांतील प्यूरिटन लोकांनीं केला व त्यांतून अखेरीस जुलमी राजवट निर्माण झाली. याचें वर्णन मि. लिंडसे हे पुढील प्रमाणें करतात :

"But then we have to ask whether that means that the Government shall spend their time in trying to discover to what proposals the people shall give as it were spontaneous consent, or in making up their minds what ought to be done or what occasion requires, and then trying to get consent to it. And if the mark of democracy is consent as nearly as possible unanimous, the second way o getting consent is much the simpler. Mass propaganda and mass persuasion will then be the real instrument of democratic Government. There is worse to follow....... There must then be a monopoly of the means of mass persuasion; minorities and opposition parties must be suppressed, and dissentients in various way discouraged. Then we shall find (as Plato observed long ago) that the attempt to get complete democracy ends in tyranny."

वरील उताऱ्याचा सारांश पुढीलप्रमाणें सांगतां येईल : लोकशाही राज्य हें लोकमतानुसार चाललें पाहिजे आणि सरकारच्या प्रत्येक कृतीला आणि धोरणाला लोकांची संमति मिळाली पाहिजे. या तत्त्वाची अंमलबजावणी करण्याचे दोन मार्ग होऊं शकतील. पहिला मार्ग म्हणजे सरकारनें लोकांची इच्छा काय आहे तें समजून घेण्याचा प्रयत्न करून त्याप्रमाणें आपलें धोरण आंखणें; आणि दुसरा मार्ग म्हणजे सरकारनें आपलें धोरण आगाऊ ठरवून त्याला लोकांची संमति मागाहून मिळविणें. अनेक वेळां सरकारला दुसऱ्या मार्गाचें अवलंबन करणें सोपें व सोयीचें वाटत असतें. या सोप्या व सोयीच्या मार्गानें जात असतां मतप्रचाराच्या सर्व साधनांवर दडपण आणण्याचा व नियंत्रण ठेवण्याचा मोह सरकार—











अनुक्रमणिका

पक्षीला होऊं लागतो. अशा प्रकारें बहुजन-समाजाचीं मतें बनविण्याचीं साधनें एकाच पक्षाच्या हातीं जाऊं लागलीं म्हणजे त्या पक्षास आपलें धोरण केवळ बहुसंख्य जनतेलाच नव्हे तर जनतेंतील सर्वांनाच तें मान्य आहे असें दाखविण्याचा मोह होतो. असें दाखविण्यासाठीं विरोधी पक्ष व विरोधी मतें उखडून काढण्याची प्रवृत्ति बळावते आणि आपले सर्व निर्णय केवळ बहुमतानेंच नव्हे तर प्रचंड बहुमतानें, किंबहुना सर्वानुमतें किंवा एकमतानें होत आहेत हें सिद्ध करण्यासाठीं अल्पसंख्य पक्ष व अल्पसंख्याकांचीं मतें दडपून टाकण्याकडे प्रवृत्ति होते. लोकशाही राज्य स्थापन करण्याच्या प्रयत्नांना जेव्हां असें विकृत स्वरूप येऊं लागतें तेव्हां 'लोकशाहीची स्थापना करतों' म्हणणारेच जुलूमशाही निर्माण करतात; आणि रामराज्याची स्थापना करणाऱ्यांच्या हातून नकळत रावणराज्याची स्थापना होते असा अनुभव इंग्लंडांतील प्यूरिटन क्रांतीच्या वेळीं आलेला आहे. तो लक्षांत घेऊन लोकशाहीच्या शुद्धीकरणासाठीं विरोधी पक्षाच्या संघटनास्वातंत्र्याचा हक्क आणि विरोधी मत असणाऱ्याचा प्रचार करण्याचा हक्क लोकशाही राज्यांतील प्रत्येक व्यक्तीनें व सरकारनें दक्षतेनें सुरक्षित ठेविला पाहिजे. ज्या वेळीं सरकारकडून अशी दक्षता घेण्यांत येणार नाहीं त्या वेळीं प्रजाजनांतील प्रत्येक सत्यनिष्ठ व्यक्तीनें सरकार-विरोधी प्रचारस्वातंत्र्याचा हक्क व विरोधी पक्ष संघटित करण्याचा हक्क शाबूत ठेवण्यासाठीं सरकारशीं न्याय्य व शांततेच्या मार्गांनीं झगडण्यास पुढें आलें पाहिजे. अशा परिस्थितींत न्याय्य व शांततेच्या मार्गांनीं प्रचलित सरकारशीं कसें झगडावें व हा झगडा चालू असतां प्रजेंत अत्याचारी वृत्ति फैलावणार नाहीं याबद्दल कशी दक्षता घ्यावी हें जनतेला दाखवून देण्याचें कार्य सत्याग्रही लोकसेवकांनीं केलें पाहिजे. हें पक्षातीत कार्य आहे. हें पक्षातीत राजकारण सत्याग्रही वृत्तीनें चालू राहिल्यास प्रजेचें आत्मबल नित्य जागृत राहून त्याचें अधिष्ठान लोकशाही राज्याला लाभत जाईल. सत्याग्रहींनीं स्वतःचा पक्ष बनवूं नये आणि देशांतील सरकार आपल्या हातीं घेण्याची आकांक्षा धरूं नये. परंतु त्यांनीं प्रत्येक व्यक्तीचें आणि पक्षाचें मतस्वातंत्र्य, प्रचारस्वातंत्र्य आणि संघस्वातंत्र्य शाबूत राहील अशी दक्षता घेतली पाहिजे. आतांपर्यंतच्या आधुनिक युरोपांतील अनुभवावरून लोकशाही राज्य चालविण्यास राज्यांत केवळ एकच राजकीय पक्ष असणें हें जसें मारक ठरलें आहे तसेंच दोहोंपेक्षां फार अधिक पक्षांचा बुजबुजाट लोकशाही राज्यांत माजला तर देशांत अराजक माजतें, असेंहि सिद्ध झालेलें आहे. म्हणून आपल्या देशांतील राजकीय प्रवाहांची प्रवृत्ति सामान्यतः दोन तुल्यबल संघटित पक्ष निर्माण करण्याकडे असावी. दोहोंपेक्षां फार अधिक पक्ष नसावेत हें जसें इष्ट आहे तसेंच सरकारपक्षाला एक तरी विरोधी पक्ष असावा हें आवश्यक आहे. हा अनुभव जमेस धरून आपल्या देशांतील राजकीय व्यवहार करीत राहिलें पाहिजे.

## न्यायासनें आणि तज्ज्ञ अधिकारिवर्ग

लोकशाही राज्यांत लोकमताचें प्रभुत्व राज्यसत्तेवर चालावें यासाठीं कायदे करणाऱ्या सभा लोकनियुक्त असाव्यात आणि मंत्रिमंडळें त्यांना जबाबदार असावींत अशी व्यवस्था केलेली असते. राजदंड धारण करणारे लोक आणि त्यांना राज्यकारभारासंबंधीं सल्ला देऊन वा जाब विचारून त्यांच्यावर देखरेख ठेवणारीं कायदेमंडळें यांना लोकांचें मत बरोबर आकलन करतां आलें पाहिजे. लोकमतांतील फेरफाराकडे लक्ष देऊन त्यांनीं राज्यनौकेचें सुकाणूं फिरविलें पाहिजे. यासाठींच लोकनियुक्त कायदेमंडळें आणि त्यांना जबाबदार मंत्रिमंडळें निर्माण केलेलीं असतात. कायदेमंडळांत लोकमताचें प्रतिबिंब पडावें आणि मंत्रिमंडळाचा कारभार कायदेमंडळानें घालून दिलेल्या धोरणानुसार चालू रहावा, हे सर्व राज्यकारभारावर लोकमताचें प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे मार्ग आहेत. मंत्रि-मंडळांत प्रवेश करून लोकांवर सत्ता चालविणाऱ्या राज्यकर्त्यांवर लोकांचा विश्वास असावा आणि हा लोकांचा विश्वास त्यांनीं न्याय्य मार्गांनें संपादन केलेला असावा, हें लोकशाही राज्याचें रहस्य आहे. लोकांवर राज्यसत्ता गाजविणारे राज्यकर्ते केवळ राज्यकारभाराच्या कलेंत तज्ज्ञ असले आणि ते स्वतःच्या बुद्धीप्रमाणें लोकहित करीत असले तरी










अनुक्रमणिका

तेवढ्यानें ते राज्य करण्यास लायक आहेत असें म्हणतां येत नाहीं; तर ते आपल्यांच मतानुसार राज्यकारभार करीत आहेत आणि ते करीत असलेला कारभार व त्याचें धोरण आपल्या हिताचें आहे असा त्यांच्यासंबंधीं लोकांत विश्वास असला पाहिजे. म्हणूनच कायदेमंडळांच्या निवडणुकी वरचेवर करण्यांत येऊन त्या निवडणुकींत यशस्वी होणाऱ्या पक्षाच्या हातीं राज्यकारभाराचें नेतृत्व देण्यांत येत असतें. राज्यकारभाराचें नेतृत्व करणाऱ्या मंत्रि-मंडळाच्या हाताखालीं प्रत्येक खात्याचा कारभार करण्यासाठीं एक कायमचा तज्ज्ञ अधिकारी वर्ग देण्यांत आलेला असतो. मंत्रि-मंडळें बदललीं तरी हा अधिकारी वर्ग बदलत नाहीं. मंत्रि-मंडळें जें धोरण घालून देतील तें धोरण अधिकांत अधिक कार्य-क्षमतेनें, सचोटीनें व निःपक्षपातीपणानें अंमलांत आणणें हें या कायमच्या अधिकारी वर्गाचें कर्तव्य आहे. या अधिकारी वर्गानें पक्षीय राजकारणापासून अलिप्त राहिलें पाहिजे. जनतेमध्यें निरनिराळ्या पक्षाचे कार्यकर्ते व नेते असतील त्यांपैकीं कोणत्याहि पक्षाच्या दडपणाला अथवा लोभाला या कायमच्या अधिकारी वर्गानें वश होतां कामा नये. लोकशाही कारभार झाला तरी लोकमताचें अवास्तव दडपण या अधिकारी वर्गावर येणें इष्ट नाहीं. त्यांनीं आपला कारभार करीत असतांना लोकमताच्या वाऱ्याबरोबर प्रवाहपतिताप्रमाणें वाहवत जातां कामा नये. हा अधिकारी वर्ग जर लोकमताच्या वाऱ्याबरोबर वाहवत जाईल अथवा त्याचेवर स्थानिक व क्षणिक लोकमताचें दडपण पडत जाईल तर मंत्र्यांनीं घालून दिलेल्या धोरणाची अंमलबजावणी योग्य प्रकारें होणार नाहीं आणि राज्यकारभाराला कायद्यांचें व तत्त्वांचें बंधनाहि राहणार नाहीं. म्हणून कोणत्याहि खात्यांतील अधिकारी वर्गावर लोकमताचें किंवा निरनिराळ्या पक्षांतील कार्यकर्त्यांचें अवास्तव दडपण येऊं नये, याबद्दल दक्षता घेतली पाहिजे. पण हा प्रकार सध्या आपल्या देशांत फार माजला आहे. हीच गोष्ट न्यायासनें व न्याय-खात्यांतील अधिकारी वर्गाला लागू आहे. न्यायासनें आणि अंमलबजावणी-खात्यांतील कायमचा अधिकारी वर्ग या दोघांचाहि कारभार पक्षातीत वृत्तीनें चालू राहिला पाहिजे आणि न्यायासनावर अंमलबजावणी-खात्याच्या कोणाहि अधिकाऱ्याचें दडपण येतां कामा नये. न्याय व अंमलबजावणी-खातें यांची संपूर्ण फारकत केल्यावांचून अधिकारी वर्गाकडून जनतेच्या हक्कांवर अतिक्रमण झाल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच न्यायाधिकारी व अंमलबजावणीचे अधिकारी यांच्यावर लोकमताचें दडपण येणार नाहीं अशी दक्षता घेतल्यावांचून व त्यांचा कारभार पक्षातीत वृत्तीनें चालेल अशी व्यवस्था केल्यावांचून लोकशाहीचें शुद्धीकरण होणार नाहीं. म्हणून लोकनियुक्त निवडणुकीचें तत्त्व न्यायाधिशांच्या नेमणुका किंवा अंमलबजावणीच्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका करण्याच्या कामीं लावण्यांत येणें इष्ट नसतें.

### भांडवलशाही व राज्याचें भ्रष्टीकरण

सरकारी अधिकारी भ्रष्ट व पक्षपाती बनण्याचा धोका अलिकडे अधिक वाढण्याचें एक विशेष कारण निर्माण झालेलें आहे. हें कारण म्हणजे राज्यांतील भांडवलशाहीवर व तिच्या आर्थिक व्यवहारांवर नियंत्रण घालण्याचे जे प्रयत्न आजचीं सरकारें करीत आहेत ते प्रयत्न विफल करण्यासाठीं भांडवलशाहीहि अधिकारी वर्गाला लालचावून भ्रष्ट बनवीत आहे हेंच होय. भांडवलशाहीला आपल्या कोणत्याहि आर्थिक व्यवहारावर नियंत्रणें नको असतात आणि आजवर भांडवलशाहीच्या सर्व व्यवहारांवर नियंत्रणें घालून आर्थिक व्यवहारांचें नियोजन करण्याचे प्रयत्न सर्वत्र चालू आहेत. यामुळें भांडवलदारवर्ग राज्यकारभार करणाऱ्या अधिकारी वर्गाला भ्रष्ट बनवून हीं नियंत्रणें धाब्यावर बसविण्याचा प्रयत्न करीत आहेत. भांडवलशाही कायम ठेवून तिच्यावर नियंत्रणें घालण्याचा प्रयत्न सरकारनें केला असतां त्यांतून अखेरीस राज्यकारभार भ्रष्ट बनून लोकशाहीचा अंत होतो आणि अनियंत्रित हुकुमशाही जन्मास येते असें समाजवादी अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. यासंबंधीं Economics of Socialism या पुस्तकांतील पुढील विचार वाचनीय आहेत :

"Finally, the peculiar bane of all state intervention that falls











short of complete socialism is political interference by sectional interests. Once the state deviates from the policy of laissez-faire, it immediately puts a premium on political corruption. It becomes advantageous for any compact economic interest to capture the machinery of the state and to use it to further its own private purposes." ... "On the international scale war and on the national scale organised political corruption will be the result. Planned capitalism will not only be a Fascist society but a gangster Fascist society." म्हणजे भांडवलशाही समाजाला नियंत्रित करून नियोजित आर्थिक घटना स्थापन करण्याचा प्रयत्न केल्यास त्यांतून राज्यकारभाराचें भ्रष्टीकरण होईल इतकेंच नव्हे तर तो समाज गुंड प्रवृत्तीचा फॅसिस्ट बनेल आणि आंतरराष्ट्रीय राजकारणांत त्याची प्रवृत्ति युद्धाकडे होईल. या आपत्ती टाळण्यास भांडवलशाहीचें समूळ उच्चाटन करून समाजवादाची स्थापना करणें हा एकच मार्ग आहे. कारण आतां सर्व नियंत्रणें उठवून भांडवलशाहीला अनियंत्रित व्यवहार करूं देणें हा फारच धोक्याचा मार्ग आहे हें सर्वमान्य झालेलें आहे. अनियंत्रित भांडवलशाही आणि अयोजित आर्थिक घटना या गोष्टी आतां इतिहासजमा झाल्या. आतां नियोजित आर्थिक घटना ही अपरिहार्य ठरली असून ती नियंत्रित भांडवलशाही स्वरूपाची असावी कीं समाजवादी असावी येवढाच वाद शिल्लक राहिला आहे. त्यांपैकीं नियंत्रित भांडवलशाही ही राज्ययंत्राला व समाजाला भ्रष्ट करते हाहि अनुभव आम्हांस आतांपर्यंत भरपूर आला असून समाजवादावांचून आम्हांस आतां गत्यंतरच उरलेलें नाहीं.

## सामाजिक नीति व राजकीय-आर्थिक घटना

आज आपल्या देशांतील राज्ययंत्र फार झपाट्यानें भ्रष्ट बनूं लागलें आहे आणि हा भ्रष्टाकार माजविण्यांत व वाढविण्यांत व्यापारी कारखानदार वर्ग अग्रेसर बनलेला आहे याबद्दल आज दुमत उरलेलें नाहीं. तथापि एकदम समाजवादाची स्थापना करणें शक्य नाहीं म्हणून समाजाची आर्थिक घटना न बदलतां समाजाला नैतिक सुधारणेचा उपदेश फार मोठ्या प्रमाणावर करण्यांत येत आहे. अशा प्रकारच्या नैतिक उपदेशाची समाजाला नेहमींच आवश्यकता असते. परंतु समाजाला शीलोन्नति करण्याचा हा उपदेश ज्यांनीं करावयाचा त्यांच्या अंगीं तसाच अधिकार असावा लागतो. हा अधिकार अंगीं नसतांना सत्ताधारी पक्षांत प्रतिष्ठा मिळवून त्या प्रतिष्ठेच्या जोरावर लोकनायकत्व व लोकनेतृत्व करूं पहाणाऱ्या व्यक्तींनीं असा उपदेश करून समाजाची नीति कशी सुधारणार ? शिवाय धीराचे सत्त्वनिष्ठ नागरिक आणि तपस्वी लोकसेवक यांनीं सुद्धां, समाजाची आर्थिक, राजकीय घटना बदलल्यावांचून त्याची खरी शीलोन्नति होऊं शकणार नाहीं, हें वास्तववादी तत्त्व स्वीकारलें पाहिजे. ज्या आर्थिक घटनेमुळें समाजयंत्र व राज्ययंत्र भ्रष्ट होत असेल त्या आर्थिक घटनेविरुद्ध शांततेनें व न्याय्य मार्गानें प्रयत्न करून सामाजिक क्रांति घडवून आणण्याचें ध्येय ज्यांनीं स्वीकारलें आहे अशांचा पक्ष प्रबल बनविला पाहिजे आणि त्या पक्षांत सामील होणारे तरुण क्रांतिकारक आपल्या अंगच्या क्रांति-निष्ठेमुळें बेभान बनून शांततेच्या मार्गापासून ढळणार नाहींत असे प्रयत्न तरुणांच्या ध्येयनिष्ठ त्यागाला आपला नैतिक पाठिंबा देऊन करीत राहिले पाहिजे. ज्या आर्थिक घटनेमुळें सामाजिक नीति भ्रष्ट होत आहे व राज्ययंत्रहि भ्रष्ट बनूं लागलें आहे त्या आर्थिक घटनेविरुद्ध क्रांति करूं इच्छिणाऱ्या तरुणांची संघटना व त्यांचा राजकीय पक्ष समाजांत ज्या मानानें प्रभावी बनत जाईल त्या मानानें आमचें लोकशाही राज्य नैतिक दृष्ट्या शुद्ध आणि उन्नत बनत जाईल. या राजकीय वास्तववादी दृष्टीनें जर आपण महात्मा गांधींनीं दाखवून दिलेला आध्यात्मिक आदर्श पुढें चालविण्याचा निर्धार केला तर आमच्या देशांत स्थापन झालेलें लोकराज्य आत्मराज्याच्या दिशेनें झपाट्यानें प्रगति करूं लागेल. असें आमचें मत असल्यामुळेंच आध्यात्मिक आदर्शवाद व राजकीय वास्तववाद या दोन नेत्रांचा अवलंब करून लोकशाही राज्यासंबंधीं थोडेंसें तात्त्विक विवेचन या लेखांत केलेलें आहे.








# लमाणांचा तांडा

(मुक्तछंद)

चालला चालला      लमाणांचा तांडा
एका गांवाहून      दुजा गांवाला
संपलीं येथलीं      उसांचीं गुऱ्हाळें, संपला येथला अन्नाचा शेर!
आतां दुजें गांव...      आतां दुजा मळा...
चला शोधूं चला
नवीन चाकरी      नवीन भाकरी !!      १

चालला उन्हांत      लमाणांचा तांडा
पाठीवरी सारें      घेउनी बिऱ्हाड.
      मरतुकडीं हीं खंगलेलीं घोडीं, खंगलेले बैल
यांच्या पाठीवर      देखा हा संसार......
चार वितींचीं तीं      उभवाया घरें घेतल्या चट्या
घेतलें खाटलें      (त्यांचा हा पलंग!) घेतलीं गाठोडीं
घोड्याच्या पाठीशीं      उलटें खाटलें अन् त्यांत घातलें रांगतें मूल,
घातलीं गाडगीं,      मडकीं, डबडीं !
चुलीला दगड      मिळतील तेथें—
नकोत ते घ्याया      बांधूनिया संगें !
घोड्याशेजारून      संसारामागून रस्ता हुंगत हीं
      धापा टाकणारीं चाललीं कुतरीं      २

चालला चालला      लमाणांचा तांडा
घोड्याशेजारून      संसारामागून चालले बापई चालल्या बायका
असंस्कृत मुद्रा...      दीनवाण्या मुद्रा... अगतिक मुद्रा......
कटिखांद्यावरी      यांच्याही लादलें संसाराचें ओझें
पहा पाठीवरी      बांधलीं बोचकीं
पहा काठीवरी      आणखीहि कांहीं उरला सुरला बांधला संसार

चालला चालला      लमाणांचा तांडा......
आणि तांड्यांतील      पाहिलीत कां ती एक लमाणीण
ओझ्यानें अगदीं      वांकली आहे थकली आहे
तिच्या खांद्यावर      तिच्या काठीवर
जड जड सारें



अनुक्रमणिका






गुळाचें गाठोडें
—परी काठीच्या त्या
राघूचा पिंजरा
अस्थिर संसारीं
त्यांत एकली ही
—ओझ्यानें वांकल्या
डोळ्यांपुढें राही
—तेवढीच तिच्या
मनाचें भोजन !
तेवढीच तिच्या
मानव्याची खूण !!

मिठाचें गाठोडें, देवाचें गाठोडें बांधलें आहे
एका टोंकाला हो
बांधला आहे……
विकीर्ण जीवन
कोमलता-खूण
लमाणाच्या स्त्रीनें
अशा रीतीनें हा जपून पिंजरा बांधला आहे
आत्म्याची ओळख

लमाण जातीच्या ४

चालला चालला
एका गांवाहून

लमाणांचा तांडा
दुजा गांवाला ! ५

—वि. म. कुलकर्णी

---

# रांजणीं रांजण

सारी आत्मशक्ति
कुबट वासानें
ठेविली गहाण
भरलें रांजण १

जेथें सांपडावी
तेथें दिव्यत्वाचा
सौंदर्याची खाण
कोंडला रे प्राण २

शांततेचें बीज
उबतें तयांत
अंकुरावें ज्यांत
युद्धाचें भाकीत ३

आणि कधीं मग
–पाशवी वृत्तीची
फुटतें रांजण
सडलेली घाण– ४

वाहतीं भरून
तयांत नाजूक
सारींच गटारें
भ्रमती पांखरें ५

—श्रीनिवास कोलेंकर










प्रा. अच्युत केशव भागवत

# टॉमस स्टर्न इलिअटचें काव्य

## नोबेल पारितोषिकाचें उद्दिष्ट

१९४८ सालच्या वाङ्मयविषयाच्या नोबेल पारितोषिकाचा मान टॉमस स्टर्न इलिअट ह्या अमेरिकन–ब्रिटिश कवीला मिळाला आहे.

जगांतील बहुमानाच्या व मौल्यवान् पारितोषिकांत नोबेल पारितोषिकें अग्रेसर ठरतील. हीं पारितोषिकें आल्फ्रेड बर्नहार्ड नोबेल (१८३३–१८९६) ह्या स्वीडन्‌मधील स्फोटक द्रव्यांच्या संशोधकानें आपल्या संपत्तींतून देऊं केलीं आहेत. पारितोषिकें एकंदर पांच असून तीं पदार्थविज्ञान, रसायन, वैद्यक, वाङ्मय आणि शांतता ह्या क्षेत्रांतील महत्त्वाच्या शोधास, ग्रंथास किंवा प्रयत्नास देण्यांत येतात. प्रत्येक पारितोषिक ४०,००० डॉलर्स (सुमारें १॥ लाख रुपये) किंमतीचें आहे. हीं पारितोषिकें स्वीडनमधील त्या त्या विषयाच्या रॉयल ॲकॅडमी-तर्फे देण्यांत येतात. पारितोषिक देतांना व्यक्तीच्या राष्ट्राकडे लक्ष न देतां तीं केवळ गुणांवरच दिलीं जातात. पारितोषिकास योग्य असलेली कृति 'गत-वर्षांतील' असावी अशा तऱ्हेचा कांहींसा भोंगळ शब्दप्रयोग नोबेलनें मृत्युपत्रांत वापरला होता. त्याचा अर्थ पुढें स्वीडनच्या राजानें नेमलेल्या खास समितीनें तयार केलेल्या नियमां( code of statuets )-मध्यें "नवा शोध किंवा ग्रंथ म्हणजे ज्याचा नवे-पणा किंवा महत्त्व पूर्वी मान्य केलें गेलेलें नाहीं" असा करण्यांत आला आहे. कोणतेंहि पारितोषिक दोघांत विभागून देतां येतें. एकाद्या वर्षी पारि-तोषिकास योग्य असा प्रयत्न झाला नाहीं असें परीक्षकांस वाटल्यास पारितोषिक न देतां त्याची रक्कम निधींत विलीन करतां येते. १९१४ व १९१८ सालीं वाङ्मयविषयाला पारितोषिकें देण्यांत आलीं नव्हतीं.

पारितोषिकांची निवड निःपक्षपाती व्हावी ह्या-साठीं स्वीडनमधील ॲकॅडमीच्या प्रत्येक विषय-समितीस ३ ते ५ सभासदांची एक खास समिति नेमण्याचा अधिकार आहे. ह्या समितींत स्वीडन्-बाहेरीलहि कांहीं सभासद असतात. उमेदवाराला स्वतःला आपल्या पात्रतेसंबंधीं अर्ज करतां येत नाहीं. त्याची शिफारस योग्य दर्जाच्या (duly qualified) व्यक्तीला करावी लागते. ही योग्य दर्जाची व्यक्ति म्हणजे स्वीडन्, फ्रान्स, स्पेन किंवा इतर देशांतील रॉयल अगर नॅशनल ॲकॅ-डमीचे सभासद किंवा विद्याप्रसार करणाऱ्या विश्व-विद्यालयासारख्या संस्था किंवा महाविद्यालयांतील सौंदर्यशास्त्र, वाङ्मय, इतिहास किंवा शास्त्रें ह्यांचे अध्यापक हे होत. उमेदवाराची शिफारस कर-तांना पारितोषिक कोणत्या विशेष गुणांसाठीं द्यावें हें विस्तारशः लिहिण्याची परवानगी आहे. दर वर्षाच्या फेब्रुआरीच्या एक तारखेपर्यंत उमेदवारांचीं नांवें समितीकडे यावीं लागतात. नोव्हेंबरमध्यें बक्षिसास पात्र ठरलेल्या व्यक्तींचीं नांवें अनौपचारिक रीत्या प्रसिद्ध होतात. त्यांना सरकारी शिक्कामोर्तब १० डिसेंबर रोजीं म्हणजे नोबेलच्या पुण्यतिथीच्या दिवशीं केलें जातें. त्या दिवशीं बक्षिसास पात्र ठरलेल्या व्यक्तींना चेकनें बक्षिसाची रक्कम, त्याबरोबर एक सुवर्णपदक व गुणवर्णनपर प्रमाणपत्र देण्यांत येतात. ह्या समारंभापासून सहा महिन्यांच्या आंत पारितोषिक मिळविलेल्या प्रत्येक व्यक्तीस आपल्या विषयासंबंधीं एक व्याख्यान स्टॉकहोम् येथें जाऊन द्यावें लागतें. परीक्षकांच्या निर्णयाविरुद्ध कोणत्याहि तऱ्हेची तक्रार चालत नाहीं. परीक्षक–समितीचें कामकाज गुप्त ठेवण्यांत येतें.

वाङ्मय–पारितोषिकासंबंधा नोबेलनें आपल्या मृत्युपत्रांत पुढील उद्गार काढले आहेत: "One share to the person who shall have produced in the field of literature the most distinguished work of an idealistic tendency." ह्यापैकीं 'लिटरेचर' ह्या शब्दाचा अर्थ केवळ ललित वाङ्मय (Polite Literature) असा नाहीं तर तंत्र व प्रकटनाची पद्धत (form and mode of expression) ह्यांच्या दृष्टीनें ज्या लिखाणांत वाङ्मयगुण दिसूं शकतील अशा लिखाणाचाहि समावेश होईल असा केला आहे. सुदैवानें आतांपर्यंत हें पारितोषिक कवि, कादंबरीकार किंवा नाटककार अशा ललित लेखकांनाच दिलें असल्यानें ह्या थोड्या निराळ्या अर्थाबद्दल वाद माजण्याचें कारणच उत्पन्न झालेलें नाहीं. परंतु "work of an idealistic tendency" ह्या शब्दप्रयोगाबद्दल मात्र अनेक आक्षेप घेण्यांत आले आहेत. Idealistic किंवा आदर्शभूत म्हणजे काय, यासंबंधीं एकवाक्यता होणें कठीण आहे. परंतु नोबेलनें वेळोवेळीं काढलेल्या उद्गारांवरून त्याच्या मनांतील आशय ओळखतां येतो. नोबेल पारितोषिकास पात्र ठरलेल्या व्यक्तीच्या प्रयत्नांचा उपयोग मानवजातीच्या उन्नतीसाठीं (for the benefit of humanity) झाला पाहिजे असें त्यानें म्हटलें आहे. ही उन्नति शांतता व बंधुभाव यांच्या प्रसारानें होईल अशी ह्या नाशक द्रव्यें व यंत्रें शोधण्यांत सर्व जन्म घालवणाऱ्या शास्त्रज्ञाची खात्री झाली होती!

वाङ्मयीन पारितोषिकें स्वीडिश ॲकॅडमी ऑफ आर्टस् ॲंड लेटर्स ह्या संस्थेमार्फत देण्यांत येतात. समितीकडे पाठवण्यांत येणारा ग्रंथ कोणत्याहि भाषेंत असला तरी चालतो. परंतु तो पाठवितांना त्याबरोबर त्याचें फ्रेंच, स्पॅनिश, स्वीडिश, इंग्रजी किंवा इटालिअन् ह्यापैकीं कोणत्या तरी एका भाषेंत भाषांतर जोडावें लागतें. ग्रंथ तपासण्याच्या कामीं नोबेल इन्स्टिट्यूटच्या ग्रंथपालाची व ग्रंथालयांतील निरनिराळ्या भाषातज्ज्ञांची मदत घेतां येते. स्वीडिश ॲकॅडमी १७८६ मध्यें स्थापन झाली असून तिचे एकंदर १८ सभासद आहेत. स्वीडनचा राजा तिचा आश्रयदाता असून त्याच्याच हस्तें वाङ्मय–पारितोषिक देण्यांत येतें.

वाङ्मय–पारितोषिकाबद्दल एक आक्षेप नेहमीं घेण्यांत येतो आणि बऱ्याच बाबतींत तो खराहि आहे. हीं पारितोषिकें देण्याचा नोबेलचा हेतु म्हणजे पारितोषिकांच्या रकमेंतून अधिकारी व्यक्तीला आपल्या चरितार्थाची विवंचना न करता आपलें कार्य अविरत करतां यावें व तिच्याकडून अधिक मोठ्या कार्याची निर्मिति व्हावी असा होता. वाङ्मयाच्या बाबतींत मात्र हीं पारितोषिकें जवळ जवळ प्रत्येक वेळेस प्रथितयश अशा वाङ्मयसेवकास त्याच्या उतारवयांत दिलीं गलीं आहेत व फारच थोड्यांकडून पुढें जास्त चांगल्या ग्रंथांची निर्मिति झाली आहे.

## इलिअट हा नववृत्तीचा अध्वर्यु

ही गोष्ट जरी खरी असली आणि नोबेल पारितोषिकांमुळें मानवाच्या उन्नतीचे व शांतता–प्रसाराचे प्रयत्न करणारांची संख्या वाढली किंवा नाहीं ह्याबद्दल जरी खात्री नसली तरी हीं पारितोषिकें जगांत सर्वोच्च समजलीं जातात हें मात्र निश्चित. पारितोषिकास पात्र ठरलेली व्यक्ति चर्चेचा व जागतिक कीर्तीचा विषय ठरते. वाङ्मयीन पारितोषिक मिळविणारी व्यक्ति साधारणपणें त्या वर्षाच्या विचार–भावना–प्रवाहाची प्रतिनिधि समजण्यांत येते व जगाच्या मनाचा कानोसा आपल्याला ह्या पारितोषिकावरून घेतां येतो. यंदाचें पारितोषिक मिळविणारा ब्रिटिश कवि इलिअट याचें काव्य आधुनिक जगांतील एका महत्त्वाच्या विचार-प्रवाहाचें प्रातिनिधिक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आधुनिक यंत्र-संस्कृतीची विषमता, तज्जन्य दारिद्र्य, उपासमार, अस्थिरता व युद्धासारखे अनर्थ, आध्यात्मिक मूल्यांबद्दल वाटणारी अश्रद्धा, मानवी जीवनाची क्षुद्रता व किळसवाणी सामान्यता (vulgarity) ह्या सर्व गोष्टींचे पडसाद अत्यंत अभिनव पद्धतीनें इलिअटच्या काव्यांत उमटले आहेत. १९१४–१८ च्या महायुद्धानंतर मनुष्याच्या पायाखालील वाळू निसरून तो अनाथ, असहाय व पंगु बनला. आधिभौतिक शास्त्रांच्या प्रगतीनें त्याची आध्यात्मिक मूल्यांवरील श्रद्धा नाहींशी झाली. आपल्या अस-








ह्यायतेमुळें तो संपत्तीची किंवा सत्तेची पूजा करूं लागला. राजकीय क्रांतीच्या साहाय्यानें सामाजिक पुनर्रचना करण्याचा रशियांतील एक प्रयोग सोडला तर सर्व युरोपभर एक तऱ्हेची असंतोषाची व अस्वस्थतेची लाट पसरली. ह्या असंतोषास कांहीं नवीन मार्गांनीं वाट द्यावी असें कलावंतांस वाटूं लागलें. सुप्त मनोव्यापारांचें फ्रॉइडचें संशोधन व त्यानें उपलब्ध केलेलें एक नवीन विचारदालन यांनीं कलेसंबंधींच्या दृष्टिकोनांत क्रांतिकारक बदल घडून आले. जुन्या काव्यविषयक संकेतांचें जोखड–जूं झुगारून नवीन माध्यमांत काव्य निर्माण करावें असें कवींना वाटूं लागलें. इलिअट अशा नवनृत्ति-वादी कवींचा अध्वर्यु आहे. आरंभींच्या त्याच्या काव्यांत मानवाच्या क्षुद्रतेबद्दल, सामान्यतेबद्दल कमालीचा उपहास दिसून येतो. परंतु शेवटीं त्याचा कल जास्तींत जास्त धार्मिक व आध्यात्मिक मूल्यांकडे वळूं लागला असून, रोमन कॅथलिक धर्माचा आश्रय ह्याच जगाच्या दुःखावर रामबाण उपाय असेंहि त्यानें प्रतिपादन केलें आहे. त्याच्या काव्याचा परिचय करून घेण्यापूर्वी त्याच्या वैयक्तिक जीवना-कडे दृष्टिक्षेप करणें योग्य ठरेल.

## संक्षिप्त चरित्र–परिचय

दक्षिण अमेरिकेंतील सेंट लुई मिसूरी येथें १६ सप्टेंबर १८८८ रोजीं इलिअटचा जन्म झाला. इलिअट कुटुंबाचा धंदा व्यापाराचा होता. परंतु इलिअटचे पणजोबा आणि आजोबा हे धमगुरू होते. इलिअटच्या आजोबांच्या प्रयत्नांनीं वॉशिंग्टन–विश्वविद्यालयाची प्रस्थापना झाली. इलिअटचे वडील हेन्री वेअर इलिअट वॉशिंग्टनचे पदवीधर असून ते व्यापार करीत. इलिअटची आई बोस्टनच्या एका व्यापाऱ्याची मुलगी होती. ती अत्यंत बुद्धिमान् होती. तिनें एक काव्य लिहिलें असून, आपल्या सासऱ्याचें एक चरित्रहि लिहिलें आहे.

इलिअटचें शिक्षण वॉशिंग्टन व हार्वर्ड विश्व-विद्यालयांत झालें. तीन वर्षांत पदवीचा अभ्यास पुरा करून इलिअटनें हार्वर्ड ग्रॅज्युएट स्कूलमध्यें तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. १९१०–११ मध्यें पॅरिस येथें जाऊन त्यानें फ्रेंच भाषा व वाङ्मय हस्तगत केलें. १९११त हार्वर्ड येथें परत येऊन त्यानें अध्यात्म (Metaphysics), तर्कशास्त्र, मानस-शास्त्र, पौर्वात्य भाषाशास्त्र (Indic Philology), संस्कृत आणि पाली ह्या विषयांत प्रावीण्य मिळ-विलें. १९१३–१४ सालीं त्याची हार्वर्ड येथें तत्त्वज्ञान-विभागांत नेमणूक झाली व महायुद्ध सुरूं होण्याच्या वेळेस एक फिरती शिष्यवृत्ति मिळून तो जर्मनीमध्यें गेला. युद्ध सुरूं झाल्यावर तो ऑक्सफर्डमधील मर्टन कॉलेजमध्यें दाखल झाला व तेथें त्यानें ग्रीक तत्त्वज्ञान, लॅटिन व ग्रीक भाषा यांचा अभ्यास केला. १९१५ मध्यें मिस् व्हिव्हिएनी हेवुड हिच्याशीं त्याचा विवाह झाला व त्याच वर्षी त्याचा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. ह्यावेळेस आपण हायगेट स्कूलमध्यें फ्रेंच, लॅटिन, गणित, चित्रकला, पोहण, व बेसबॉल हे विषय शिकवीत होतों असें त्यानें म्हटलें आहे. लौकरच व्यवसाय बदलून इलिअटनें लॉइड्स् बँकेंत नोकरी धरली व अर्थशास्त्र आणि बँकिंग यांवर कांहीं लेख लिहिले. ह्यानंतर त्यानें वृत्तपत्र-व्यवसाय केला व आजपर्यंत तो 'क्रायटेरिअन' ह्या वाङ्मयीन त्रैमासिकाचा संपादक आहे. १९२७ सालीं त्याला ब्रिटिश नागरिकत्वाचे हक्क देण्यांत आले. १९३२ मध्यें हार्वर्ड येथें काव्याचा अध्यापक म्हणून त्याची नेमणूक झाली.

इलिअटचें वर्णन "दिसण्यांत श्यामवर्णी सुंदर (darkly handsome), भावनाप्रधान, अत्यंत तरल आणि नेहमीं औपरोधिक व्याजोक्तिपूर्ण बोलणारा" असें केलें आहे. रुमाल कोटाच्या बाहींत ठेवणें ही त्याची लकब आहे. तो बर्गंडी व शेरी हीं पेयें पितो व बुद्धिबळें खेळतो (त्यांत त्याला फारसें प्रावीण्य मात्र नाहीं). तो गाईंना आणि उंच जागांना घाबरतो. उच्च वर्गांतील अमीर–उमराव (nobility), चर्चमधील अधिकारी आणि सिटवेल किंवा वूल्फसारख्या साहित्यिकांचा सह-वास त्याला प्रिय आहे.

## वार्धक्याला दचकणारा 'प्रूफ्रॉक'

'प्रूफ्रॉक अँड अदर ऑब्झर्वेशन्स' (१९१७) ह्या पहिल्या काव्यसंग्रहांत इलिअटनें काव्याच्या प्रगटना-बद्दल व वृत्तांबद्दल नवीन प्रथा सुरू केली.








इलिअटनें हल्लीं जरी ब्रिटिश नागरिकत्व पत्करलें असलें तरी अमेरिकन जीवनाचे संस्कार त्याच्या मनावर खोल रुजलेले आहेत. अमेरिकन संस्कृति ही अत्यंत नवीन असल्यानें तिच्यांत बालसदृश उच्छृंखलपणा, बेछूट वृत्ति, संपत्ति व सत्ता यांची उपासना हीं दिसून येतात. इलिअटची वृत्ति ही त्याच्या प्यूरिटन संस्काराची द्योतक आहे. त्यानें आपल्या काव्यांत ह्या सर्व गोष्टींचा अत्यंत कडवटपणें, व्याजोक्तिपूर्ण उपहास केला आहे. ही तिरस्काराची भावना योग्य प्रतीकें (symbols) निर्माण करून त्यानें व्यक्त केली आहे. आश्चर्यजनक व विरोधाभासानें भावना व्यक्त करणारीं प्रतीकें हा इलिअटच्या काव्याचा विशेष Love-Song of Alfred J. Prufrock ह्या कवितेंत स्पष्टपणें दिसतो. ह्या काव्यांत कवि आत्यंतिक संशयवादानें पछाडलेला दिसतो. मानवी आशा क्षणभंगुर तर आहेतच पण मानवाचा आत्मा नष्ट होईल असें म्हणतात म्हणजे तरी काय असा दारुण वैयर्थ्य-वादी दृष्टिकोन कवीनें ह्या काव्यांत प्रकट केला आहे. कवितेचा नायक हा एक मध्यम वयाचा,– जवळ येणाऱ्या वार्धक्याला दचकणारा– (I grow old.... I grow old/I shall wear the bottoms of my trousers rolled) अमेरिकन आहे. आपल्या प्रियेला प्रणयसाफल्याबद्दल प्रश्न टाकतां टाकतां एकदम दचकून तो थबकतो; आपली असमर्थता, असहायता त्यानें योग्य प्रतीकांनीं व्यक्त केली आहे. नायकाला विचारावा असा वाटणारा प्रश्न केवळ प्रणयसाफल्याबद्दलच नाहीं तर अखिल जीविताबद्दलच आहे. सुरुवातीचें निसर्गवर्णनच उपरोधपूर्ण आहे. 'ईथर' दिलेल्या रोग्याप्रमाणें आकाशाच्या रुग्णालयाच्या मेजावर पसरलेली संध्याकाळ, अर्धवट ओसाड पडलेले रस्ते, तीं भुक्कड हॉटेलें आणि व्यर्थ शब्दजंजाळाप्रमाणें उगीच वांकडे–तिकडे फिरणारे रस्ते हीं सर्व प्रेमिकास स्वतःच्या असमर्थतेची जाणीव करून देतात. पुढील धुक्याचें वर्णन इलिअटच्या अभिनव प्रकटनपद्धतीचें उत्तम वर्णन आहे :

The yellow fog that rubs its back upon the window panes,
The yellow smoke that rubs its muzzle on the window panes
Licked its tongue into the corners of the evening,
Lingered upon the pools that stand in drains,
Let fall upon its back the soot that falls from chimneys,
Slipped by the terrace, made a sudden leap,
And seeing that it was a soft October night,
Curled once about the house, and fell asleep.

सकृद्दर्शनीं हें वर्णन एखाद्या मांजराचें आहे; परंतु त्यांतील प्रत्येक गोष्ट धुक्याच्या बाबतींतहि खरी आहे. अशाप्रकारें रूपक किंवा उपमा हे केवळ अलंकार न ठरतां त्यांना एक स्वतंत्र अस्तित्व इलिअटच्या काव्यांत येतें. ही रूपकांची पद्धत प्रतीकवादी (Symbolist) ह्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या, मूळ फ्रान्समध्यें स्थापन झालेल्या काव्य-संप्रदायानें सुरू केली. इंग्लंडमध्यें एलिझाबेथच्या उत्तरकालीं डन् या कवीनें ह्या पद्धतीचा जास्तींत जास्त उपयोग केला आहे व डन्चे संस्कार आजच्या इंग्रज कवींवर फारच स्पष्टपणें उमटले आहेत. एलिझाबेथच्या काळांतील प्रणयकाव्यांना आलेली एक ठराविकता, स्पेन्सरसारख्या कवींनीं संगीताला दिलेलें अवास्तव महत्व, वस्तुस्थितीपासून दूर जाऊन एका काल्पनिक रम्य स्वप्नसृष्टींत रमणारी कवींची वृत्ति ह्या सर्वांविरुद्ध डन्नें बंड पुकारलें. नवीन चमत्कृतिजन्य प्रतीकें निर्माण करून बाह्यात्कारीं भिन्न असणाऱ्या गोष्टी एकत्र आणून धक्का देण्याचें तंत्र डन्नें अवलंबिलें. इलिअटचें काव्य अशा चमत्कृतींनीं भरलेलें आहे. ही चमत्कृति म्हणजे केवळ 'स्टंटबाजी' नव्हे! कविमनांमधील भावना व भीषण वस्तुस्थिति ह्यांमधील विरोध ह्याच मार्गांनीं त्याला व्यक्त करतां येतो. काव्याची रचना ही एखाद्या तरल स्वप्नासारखी भासते. त्यांत व्यक्त अर्थापेक्षां अव्यक्ताच्या छटा ध्वनियुक्त शब्दांनीं, प्रतीकांनीं, अवतरणांनीं सूचित केलेल्या असतात. कवीचे शब्द केवळ विचार किंवा भावनाच व्यक्त करीत नाहींत, तर विचारांची नागमोडी








गताहि दर्शवितात. साहजिकच जुन्या वृत्तविषयक प्रमाणबद्धतेचा ह्या काव्यांत अभाव दिसतो. जगांत कोठल्याच मूल्याची स्थिरता दिसून न आल्यामुळें विचारांच्या तरल, असंबद्ध स्वप्नसृष्टींतून एक कलात्मक रचना निर्माण करण्याची कवीची उत्कंठा ह्या पद्धतींत दिसते. त्या क्षणभंगुर संध्याकाळीं, सकाळीं आणि दुपारीं, तीं क्षणार्धांत विरून जाणारीं संभाषणें ह्या सर्वांनीं प्रूफॉकच्या मनाची विकल अवस्था वाढत जाते. आपल्या आयुष्याचें मोजमाप त्यानें आधुनिक जीवनाच्या भकास क्षुद्रतेस साजेल अशा कॉफीच्या चमच्यांनीं केलें आहे. (I have measured out my life with coffee spoons); वार्धक्याची जाणीव त्याच्या मनाला विछिन्न करते. त्याच्या असहायतेंत हॅम्लेटची धरीदात्त शोकपूर्णताहि नाहीं. "No I am not Prince Hamlet nor was meant to be......" तो सर्वकालचा नोकर (eternal footman) मृत्यु हा तर सारखा जवळ आहे... समुद्र किनाऱ्यावरील मत्स्यकन्येचें गायन आपणासाठीं नाहीं...... आधुनिक यंत्रसंस्कृतींत मानवी मनाची होणारी कुचंबणा, नागरी जीवनाची किळसवाणी क्षुद्रता, सर्व तऱ्हेच्या मूल्यांचा आधार सुटल्यामुळें मानवी मनाची झालेली असहायता ह्याचें वर्णन ह्या वेळच्या इतर कवितांतहि दिसतें. 'प्रेल्यूडस्' कवितेंतील ते चिखलानीं माखलेले रस्ते, ते वर्तमानपत्रें वाचणारे आणि पाईपमध्यें तंबाखू कोंबणारे लोक... तें व्यर्थ, निरर्थक असें अर्थशून्य दैनंदिन आयुष्य...पण ह्यांतहि कवीला एकतऱ्हेची अनुकंपा वाटून थोडें हायसें वाटतें (the notion of some infinitely gentle / Infinitely suffering thing.)! पण पुन्हा मानवी जीवनाची क्षुद्रता आणि सगळ्या जगताचें तें व्यर्थ परिभ्रमण ह्यांची जाणीव कवीला होते.....

### कलाभिव्यक्तीचीं नवनवीं क्षेत्रें

ह्या कवितांवरून इलिअटचें भावनास्पर्शी कविमन स्पष्टपणें दिसतें. हें मन आधुनिक कालाचें फार सूक्ष्म पृथक्करण करतें. जगांतील कोणतीहि गोष्ट त्याच्या नजरेंतून सुटत नाहीं. आधुनिक युगांत ज्ञानाच्या कक्षा अत्यंत विस्तृत झाल्या आहेत व त्यामुळें विचारांची निश्चितता, ध्येयनिश्चिति होणें कठिण आहे व त्यामुळें ज्ञानाकडे पाठ फिरवावी कीं काय असा संशय अनेक वेळां येतो. ज्ञान हें काव्यकलेला मारक आहे असा समज अनेकवेळां दृढ झालेला दिसतो. परंतु इलिअटनें आपल्या काव्यांत मिळविलेल्या नाना विषयांचा, भाषांचा व नानाविध अनुभवांचा उपयोग अत्यंत कलात्मकतेनें केलेला दिसतो. आयुष्यांतलि प्रश्न सोडविण्यास ज्ञानाचा उपयोग होतो कीं नाहीं कोण जाणे! परंतु जितकें ज्ञान जास्त तितकीं कवीच्या अभिव्यक्तीला नवीं नवीं क्षेत्रें मिळतात. कवी व सामान्य मानव यांत फरक हा कीं सामान्य मनुष्यास आपण मिळविलेलें ज्ञान व दैनंदिन आयुष्यांतील सामान्य गोष्टी यांची सांगड घालतां येत नाहीं. कवि ह्या सर्वांची उत्तम गुंफण करूं शकतो. स्पिनोझाचें तत्त्वज्ञान, कपबशा विसळणारी मुलगी, घरावरून चालणारें मांजर आणि केव्हांतरी वाचलेल्या अन्यभाषांतील ग्रंथांच्या ओळी, ह्या परस्परभिन्न गोष्टी जशा मनांत उत्पन्न होतात तशाच उतरवून त्यांतून एक रचना निर्माण करण्याचा यशस्वी प्रयत्न इलिअटनें केला आहे. हें करीत असतां कवि हा जाणतेपणीं हे प्रयत्न करीत असतो किंबहुना कवि आपल्या रचनेबद्दल जितका जागरूक असेल तितकें चांगलें असें इलिअटचें मत आहे. कवि ज्या अनेक गोष्टी अनुभवतो—म्हणजे प्रत्यक्ष शारीरिक अनुभव नाहीं तर कल्पनात्मक किंवा वाङ्मयीन सुद्धां—,त्यांना भावनांचें आवरण (emotional consciousness) देऊन तदनुरूप प्रतीकें, व्यक्ती किंवा प्रसंग यांचा आश्रय घेऊन त्यांचें प्रकटीकरण करणें हें कवीचें काम आहे. ह्या पद्धतीला तो Objective Correlative असें म्हणतो. कवीची भावना अनुरूप व्यक्तींत किंवा प्रसंगांत गुंफली गेल्यानें तिला एक तऱ्हेचें नाट्यात्मक स्वरूप येतें. मध्यमवर्गीय जीवनाची विफलता दाखविण्यासाठीं सुरुवातीच्या कवितांत इलियटनें आँट हेलेन्, मि. अपोलिनिक्स इत्यादि व्यक्तींचा आश्रय घेतला आहे. A Cooking Egg ह्या कवितेंत बालकाची निर्व्याज कल्पनासृष्टि आणि प्रौढांचें निरर्थक कल्पनाजंजाळ ह्यांतील








विरोध दर्शविला आहे. स्वतःचीं बालपणचीं स्वप्नें भंग पावल्याची भावना But where is the penny world I bought/ To eat with Pipit behind the screen? ह्या बालिश प्रश्नानें व्यक्त केली आहे. ह्या सर्व काव्यांत कवि दारुण संशयवादानें पछाडलेला आहे. निसर्गपूजा किंवा खिस्ती धर्म ह्यावरहि त्याचा विश्वास नाहीं (The hippopotamus; Whispers of Immortality). ज्ञानाचा उपयोग जास्तींत जास्त गोंधळ उत्पन्न होण्यांत झाला आहे, इतिहासापासून आपण कांहींच शिकूं शकलेलों नाहीं. (Gerontion) जेरोन्टिअन् (१९२०) ही इलिअटची फार महत्त्वाची कविता आहे. मानवी मनांतील तरल भावनाप्रवाह जॉइसनें यूलिसस ह्या कादंबरींत वापरलेल्या संज्ञाप्रवाहपद्धतीनें अतिविस्तारशः देतां येतील. इलिअटनें त्याउलट तंत्र वापरून ते ध्वनित केले आहेत. जेरोन्टिअन् हा म्हातारा आधुनिक मानवाचा प्रतिनिधि असून तो मृत्यु, पुनर्जन्म इत्यादींबद्दल संशय व्यक्त करतो. प्रेम, सौंदर्य इत्यादींचा अभाव असल्यानें मानवी जीवन कमालीचें शुष्क झालें आहे. त्यामुळें एक तऱ्हेची आत्यंतिक निष्क्रियता जीवनांत दिसून येते. ही निष्क्रियता इलिअटनें लैंगिक असमर्थतेचीं प्रतीकें वापरून प्रकट केली आहे. निष्क्रियतेचें कारण धर्मश्रद्धेचा अभाव असें त्याला वाटतें. कवितेची रचनापद्धति अत्यंत तरल असून कवि एकदम एका कल्पनेपासून दुसरीकडे भरारी मारतांना दिसून येतो. ह्या भराऱ्या इतक्या वेगवान् आहेत कीं वाचकाला त्यांचें आकलन होणें कठीण पडतें. इलिअटच्या काव्यावर क्लिष्टतेचा आरोप आला आहे तो याच कारणानें. इलिअटचें काव्य सोपें तर खासच नाहीं पण इलिअटच्या मतें कवीला जी पद्धत प्रकटीकरणास सुलभ वाटते तिचा तो अवलंब करतो. ही पद्धत त्याचे विचार, भावना, ज्ञान इत्यादींनीं अपरिहार्य ठरते. तेव्हां ती समजावून घेण्याची पूर्वतयारी वाचकानें ठेवली पाहिजे. शास्त्रीय संगीत समजावून घेण्यासाठीं ज्याप्रमाणें पूर्वतयारी लागते तसेंच आधुनिक काव्याबद्दल म्हणतां येईल.

**"Waste Land"-आध्यात्मिक शांतीचा शोध**

एका मेजवानीला गेलेला असतांना इलिअटला कोणीं म्हणालें कीं हा प्रसंग किती आनंददायक आहे नाहीं (If he did'nt think it interesting)! त्यावर इलिअटनें उत्तर दिलें : "हो! त्याची भीषणता लक्षांत घेतली तर वाटतो खरा (Yes! If you concentrate on the essential horror of the thing)!" नेहमींच्या आयुष्यांतील ह्या भीषणतेकडे इलिअटचें काव्य लक्ष देतें. Waste Land (1922) ही इलिअटची प्रसिद्ध कविता ह्या भीषणतेवर आधारली आहे व तींत त्यानें पूर्वी वापरलेल्या तंत्राची परिणति आहे. कवितेची कल्पना मिस् जेसी वेस्टन हिच्या From Ritual to Romance आणि सर जेम्स फ्रेझरच्या 'गोल्डन बाउ' ह्या ग्रंथांवरून सुचली आहे व ह्या दोन्ही पुस्तकांतील प्रतीकांचा इलिअटनें सढळ उपयोग केला आहे. ह्या दोन्ही पुस्तकांवरून रानटी लोकांच्या लिंगपूजेच्या कांहीं कल्पना खिस्ती धर्मांतील 'ग्रेल' (—खिस्त ज्या पेल्यानें शेवटच्या भोजनाच्या वेळीं दारू प्याला त्या—)च्या कल्पनेशीं कशा जुळतात व आधुनिक मानवांत ह्या कल्पना आजपर्यंत वेगळ्या स्वरूपांत कशा कायम आहेत हें इलिअटनें उचललें. पूर्वीची लिंगपूजा ही जशी शारीरिक पुनरुज्जीवनाचें प्रतीक तशी खिस्तपूजा ही आध्यात्मिक पुनरुज्जीवनाचें प्रतीक. 'वेस्ट लँड' ह्या कवितेचे पांच भाग असून तींत जन्म आणि मृत्यु, विनाश आणि पुनरुज्जीवन यासंबंधीं विचार केला आहे. धर्मश्रद्धेशिवाय होणारी मानवी जीवनाची शुष्कता पाण्याच्या प्रतीकानें सूचित केली आहे. पहिल्या भागांतील खडक हा श्रद्धाशून्य जगाचें प्रतीक आहे; तांबडा खडक व त्याची छाया म्हणजे कांहीं काल आश्रय देणारी अध्यात्मावरील श्रद्धा आहे; पण आधुनिक वैराण भूमींत ही श्रद्धा किती वेळ टिकणार? कारण सगळीकडे दगडांचे खच आणि झाडांचीं जीर्ण पाळेमुळें पसरलीं आहेत. मानवी प्रेम ('हायसिंथ' आणणारी मुलगी) शांति देऊं शकत नाहीं; जीवनाचा अर्थ न सांपडल्यामुळें जीवन व मृत्यु यांत फरक नाहीं; जुन्या काळीं त्रिकालाचें ज्ञान असलेली सोसॉइस् आज भविष्यकथन करून पोट भरीत आहे...अशा वेळेस फांसावर लटकलेला मनुष्य (hanged man—खिस्त) दिसत नाहीं... लंडनच्या (त्या खोट्या Unreal शहराच्या)








पुलावरून माणसांचे थवे जातांना दिसतात आणि ते जिवंत असून मृत आहेत...

दुसऱ्या भागांत आधुनिक जीवनाची भकास क्षुद्रता (vulgarity) विरोधाभासाचा आश्रय करून सूचित केली आहे. आयुष्य हा निरर्थक बुद्धिबळाचा खेळ आहे. शेक्सपिअरनें केलेलें क्लिओपात्रा राणीचें वर्णन आधुनिक मध्यमवर्गीय स्त्रीस लाविलें आहे. पूर्वीच्या रम्य वनश्रींत फिलोमेल ह्या काव्यमय नांवानें मनोरंजन करणारी नायटिंगेल आज 'जगू जगू' असा आवाज करते. आजच्या घाणेरड्या कानांसाठीं... आजच्या स्त्रीचें संभाषण 'My nerves are bad tonight' ह्या पलीकडे जात नाहीं...उद्यां काय करायचें ? आणि नंतर तरी...? रेस्टारॉमधल्या संवादांत स्त्रीचा परत येणारा नवरा, तीं निरुपयोगी ठरलेलीं वर्थ कंट्रोलचीं साधनें...आणि 'बंद करायची वेळ झाली आहे' ही वेटरची सारखी सूचना ह्यांनीं ह्या भागाचा शेवट केला आहे. पुढील 'फायर सर्मन्' हा भाग सर्वांत महत्त्वाचा आहे. 'फायर सर्मन्' ही कल्पना बुद्धाच्या प्रसिद्ध 'फायर सर्मन' वरून घेतली आहे. वासना व ऐहिक भावना ह्यांना अग्नीची उपमा अनेकांनीं दिली आहे. वैराण जगांतील भग्नतेची कल्पना सुरुवातीच्या ओळी देतात : The river's tent is

broken : the last fingers of leaf
Clutch and sink into the wet bank.
The wind
Crosses the brown land unheard.
The nymphs are departed.

ही टेम्स नदी स्पेन्सरनें वर्णन केलेली रम्य नदी नाहीं... तिच्यांत रिकाम्या बाटल्या, सँडविचचे कागद, रेशमी रुमाल, कार्डबोर्ड बॉक्सें आणि सिग्रेटचीं थोटकें तरंगतात... वैराण जगांत प्रेमाला स्थान नाहीं. त्यांत वासना-तृप्तीच्या प्रयत्नांपासून येणारी अतृप्तता आहे. टायपिस्ट मुलगी आणि तोंडावर पुळ्या असणारा कारकून यांच्या त्या शुष्क प्रणयप्रसंगानें हें स्पष्ट केलें आहे. कवितेचा शेवट अत्यंत धीरगंभीर असा असून त्यांत इलिअटच्या शब्द व वृत्त यांवरील प्रभुत्वाची साक्ष पटते. ह्या भागांत वादळाचा संदेश (What the Thunder said) सांगितला आहे. वादळ हें परमेश्वराबद्दलच्या आदरयुक्त भीतीचें प्रतीक आहे. वैराण जगांत कोठेंहि पाणी नाहीं...जिकडे तिकडे फत्तर...फुलें, संगीत, बालकें ह्यांचा अभाव आहे—इथलीं वटवाघळें मात्र बालकाच्या तोंडाचीं (baby-faced bats) आहेत !—गंगा नदी आटली आहे ....

Ganga was sunken, and the limp leaves
Waited for rain, while the black clouds
Gathered far distant, over Himavant.
The jungle crouched, humped in silence
Then spoke the thunder.
Da
Datta

दा, दत्त, दमयध्वम् (द्या, सहानुभूति बाळगा आणि दमन करा) ह्या संदेशानेंच मुक्ति मिळेल...स्वतःच्या स्वार्थाचा, दंभाचा त्याग केल्याशिवाय, व्यापक सहानुभूतीशिवाय मनुष्याची प्रगति होणें अशक्य आहे...शेवटीं कवीनें पुन्हां एकवार आतांपर्यंतची भूमिका पुनः एकवार संक्षिप्तपणें व सूचकतेनें मांडली आहे व कवितेचा शेवट 'शांतिः शांतिः शांतिः' ह्या संदेशानें केला आहे.

### पश्चात्तापदग्ध पाप्याच्या तीन अवस्था

ह्या आध्यात्मिक शांतीची अपेक्षा कवीच्या पुढच्या कवितांत स्पष्टपणें दिसते. 'हॉलोमेन' (१९२५) ह्या कवितेंत मानवाच्या दंभाचा तिरस्कार केला आहे. ह्यांतील 'बुजगबाहुलीं' (hollow men) ज्ञानचक्षूंची अपेक्षा करतात पण त्यांना निवडुंगांचे फड आणि फत्तर यांशिवाय कांहीं दिसत नाहीं. मधून मधून परमेश्वराच्या साम्राज्याची ललकारी त्यांच्या कानावर पडते. पण तीसुद्धां त्यांच्या निष्क्रियतेनें अस्पष्ट आणि अर्धवट अशी होत जाते आणि जगाचा नाश होतो पण तो तरी थोडा जोरानें होतो का ? छे !

This is the way the world ends
Not with a bang but with a whimper.

ॲश् वेन्स्डे (१९३०) ह्या काव्यांत तीच विफलता, विषण्णता दिसून येते. जडवादाच्या अश्रद्धेनें मनुष्य ज्ञानचक्षु विसरला आहे हें 'हॉलोमेन'-मध्यें सांगितलें आहे तर ऐहिक भावनांच्या आहारीं









अनुक्रमणिका

न जातां मनुष्य मुक्त होऊं शकला तर त्याला शांततेचा लाभ होईल असें 'ॲश् वेन्स्डे'मध्यें सांगितलें आहे.

कवितेच्या तिसऱ्या भागांत पश्चात्तापदग्ध पापी माणसाच्या तीन अवस्था डान्टेप्रमाणें जिन्याचें रूपक घेऊन सांगितल्या आहेत. पहिल्या वळणाला पापपुण्याच्या संभ्रमांत मनुष्य धडपडत आहे; दुसऱ्या वळणाला पापाची भीषणता त्याला कळते आणि तिसऱ्या वळणानंतर त्याला पाश्चात्ताप होऊन कांटेरी मुकुट घातलेल्या खिस्ताचा साक्षात्कार होतो. परंतु तरीहि मोहानें पुनःपुन्हां मन पापाकडे धांव घेते. परंतु आतां परत जाणें शक्य नाहीं हें तो आपल्या मनाला बजावतो : Although I do not hope to turn again/Although I do not hope... शेवटीं खिस्तमाता मेरी हिच्या प्रार्थनेनें त्याला मुक्तीचा मार्ग कळतोः

Sister, mother
And spirit of river, spirit of the sea
Suffer me not to be separated
And let my cry come unto thee.

## टीकालेख व काव्यनाट्य

ह्यापुढील कालांत इलिअटच्या कल टीकालेख व राजकीय विषय यांकडे वळूं लागला. Triumphal March ह्या काव्यांत युद्धाची निरर्थकता सूचित केली आहे; Difficulties of Statesmen ह्या काव्यांत हल्लींच्या 'कमिटी, सबूकमिटी, स्टँडिंग कमिटी'च्या राजकारणाचा उपहास केला आहे. ह्यानंतरच्या काळांत रॉक (१९३४), मर्डर इन् दी कॅथिड्रल (१९३५) आणि दी फॅमिली रीयुनिअन (१९३९) हीं काव्यनाट्यें इलिअटनें लिहिलीं आहेत. हीं नाटकें प्रयोगक्षम व्हावीं असा इलिअटचा हेतु असल्यानें त्यानें आपल्या सूचक पद्धतीचा त्याग केला आहे. 'रॉक' ह्या जुन्या खिस्ती पद्धतीच्या 'पेजंट ड्रामा'चा विषय १९३४ सालीं इंग्लंडमध्यें जें चर्च बांधण्यांत आलें त्यासंबंधींचा आहे. चर्च बांधणारे कामकरी चळवळ्यांच्या भुलथापांना बळी न पडतां चर्च बांधण्याचें आपलें काम पुरें करतात. एका जागतिक चर्चच्या साहाय्यानें 'वेस्ट लँड'मध्यें वर्णन केलेलें भग्न लंडन शहर पुन्हां बांधण्याची ते आशा करतात. असीम श्रद्धेनें जगाचे सर्व प्रश्न सोडविण्याची त्यांस आशा वाटते. इलिअटच्या काव्यांत आतांपर्यंत आलेले सर्व तात्त्विक प्रश्न अत्यंत सरळ सोप्या पण ओजस्वी भाषेंत ह्या नाटकांत आले आहेत.

'दी मर्डर इन दि कॅथिड्रल' ह्या थॉमस् ए बेकेट् ह्या १२ व्या शतकांतील धर्मगुरूच्या खुनावर रचलेल्या नाटकांत कॅथॉलिक धर्मानें महती गाइलेल्या हुतात्मपदाची तरफदारी आहे. ह्या नाटकांत इलिअट पूर्णपणें कॅथलिक बनला असून कॅथलिक धर्म हाच जगाच्या दुःखांवर तोडगा आहे असें त्याला वाटत असल्याचें दिसतें. ही धर्मश्रद्धा त्याच्या काव्याला मारक ठरेल असें भविष्य ह्या सुमारास वर्तविण्यांत आलें होतें. परंतु Four Quartets ह्या काव्यसंग्रहानें हें भविष्य खोटें ठरविलें.

## "Four Quartets" संशोधनाची दीर्घयात्रा

ह्या चार कवितांत पूर्वीचें Objective Correlative चें तंत्र सोडून इलिअटनें भावगीतात्मक रचना केली आहे. आतां त्याला एकाद्या काल्पनिक व्यक्तीचा आश्रय घेण्याची जरूर वाटत नाहीं. कविता तत्त्वज्ञानविषयक असल्या तरी त्यांत तर्कशुद्ध मांडणी नाहीं तर संगीताची लयबद्ध सूचकता आहे. प्रतीकांची पद्धतिः व कल्पनांची भरारी पुन्हां 'वेस्ट लँड' प्रमाणेंच आहे. ह्या कवितांचा विषयहि ह्यापूर्वी इलिअटनें हाताळलेला आहे. 'फॅमिली रीयुनिअन्' काव्यनाट्याचा नायक हॅरी हा स्वतःच्या कृतापराधाच्या जाणीवेपासून पळूं पहातो. परंतु अनंत अविनाशी अशा तत्त्वाची प्रतिनिधि अशी त्याची भवितव्यता 'फ्यूरीज'च्या रूपानें त्याच्या मागें येते. तिचें आवाहन स्वीकारल्यानंतर हॅरीला शांतता मिळते. अशा तऱ्हेनें आत्मसंशोधनानें मानवी आयुष्याचें कोडें उलगडण्याच्या मार्गावर तो जातो. आयुष्यांतील सुख हें इच्छित वस्तु प्राप्त करण्यांत नसून ज्याच्यापासून सुटका नाहीं अशा गोष्टींचा स्वीकार करण्यांत आहे हें त्याला कळतें. 'This is like an end' तो म्हणतो; त्यावर ॲगाथा











त्याला उत्तर देतेः 'And a beginning.' कारण ह्यापुढें संशोधनाची महायात्रा सुरू होणार...... मानवी कालमर्यादा व अनंतकाल (Eternity); इतिहासाचा अर्थ, मानवी जीविताचा हेतु व मोक्ष (Redemption)चा मार्ग ह्या विषयांवर ह्या कवितांची उभारणी केली आहे. ह्या कवितंत आतां केवळ नकारार्थी आव्हानें नाहींत तर गूढ सत्याच्या शोधांची वाटचाल करण्याचे प्रयत्न आहेत. 'बर्न्ट नॉर्टन' ह्या पहिल्या काव्यांत कवीनें आपल्या आध्यात्मिक प्रवासाचा मार्ग आंखून घेतला आहे.

Time present and time past
Are both perhaps present in time future,
And time future contained in time past.
If all time is eternally present
All time is unredeemable.

आतां पूर्वीप्रमाणें कवि एखाद्या संस्कृतीचा विचार करीत नाहीं. तर सबंध विश्वरचनेच्या उत्पत्तिस्थिति-लयासंबंधीं संशोधन करतो. व्यक्तीला नाश हा थांबवितां येत नाहीं. परंपरेनें प्राप्त झालेलें ज्ञान लंगडें पडतें. सगळीकडे अंधार दिसतो. पण ह्या अंधारांत 'वेस्ट लँड'ची दारुण व्यर्थता नाहीं. पारंपरिक ज्ञान किंवा धर्मपरंपरा (Religious Dogma) ह्यांवर आधार न ठेवतां कवि स्वतः संशोधनाचा मार्ग चोखाळतो. "ड्राय साल्व्हेज" ह्या काव्यांत समुद्र आणि खडक ह्यांचीं प्रतीकें आहेत. समुद्र हा अनंताचें प्रतीक असून खडक म्हणजे मानवी ध्येयें. मानवी आयुष्य ही नदी आहे— I think that the river / Is a strong brown god-sullen, untamed and intractable.... आणि भोंवताली समुद्र आहे. The river is within us, the sea is all about us.... खडकांवरील दिवे आपल्या समुद्रपर्यटनासाठीं आंखीव मार्ग दाखवितात. पण मानवी प्रयत्नांची झेंप ह्यांच्याहि पुढें जाते. अज्ञानाच्या मार्गावर असतां प्राप्त वस्तुस्थितीची लाट — ground swell — आपल्याला ताळ्यावर आणूं पहाते. दुरून भयसूचक घंटेचा आवाज विचलित करतो... "लिटल् गिडिंग" मध्यें हेंच तत्त्व बागेच्या प्रतीकानें सांगितलें आहे. इतिहासानें जरी मार्ग सांपडत नसला तरी पुनः पुन्हा त्याचाच आश्रय व आधार घ्यावा लागतो. कवि पुनः पुन्हा ख्रिस्तधिर्माकडे आश्रयासाठीं वळतो. परंतु पूर्वी-प्रमाणें त्याचा अनन्यस्वीकार करून तो थांबत नाहीं, तर आत्मसंशोधनाची बिकट वाट चालावयास सांगतो. प्रो. शिवनारायण रे यांनीं ह्या कवितांवरून इलिअटला संशोधक कवि (poet of exploration) म्हटलें आहे व ह्या सृजनशील अध्यात्मवादापासून नवनव्या काव्यकल्पनांची निर्मिति होईल अशी आशा व्यक्त केली आहे.

## इलिअटचें 'कल्पनांचें संगीत'

इलिअटच्या काव्याचें स्वरूप हें असें आहे. त्याच्या काव्यासंबंधीं टीका वाचून त्याच्या काव्याची कल्पना येणें कठीण आहे. त्याच्या काव्यांत अनेक-विध छटा असून त्यांचें आकलन वाचकाच्या ज्ञानावर व भावनाक्षमतेवर अवलंबून आहे. आपल्या अभिनव पद्धतीनें त्यानें इंग्रजी काव्याच्या प्रांतांत एक नवें वैभवसंपन्न दालन उघडलें आहे. त्याच्या काव्यविषयक विचारांनीं काव्य-परिशीलनाला नवीन दिशा मिळाली आहे. त्याच्या विचाराशीं एकवाक्यता न होणाऱ्या कवींनीं सुद्धा त्याचें ऋण व महती मान्य केलीं आहेत. इलिअट-वर मुख्य आक्षेप म्हणजे जीविताचे प्रश्न तो केवळ व्यक्तिवादाच्या भूमिकेवरून सोडवितो. व्यक्ति-स्वातंत्र्याच्या झगड्यांत बाह्य जड परिस्थितीची क्रान्तिकारक मार्गांनीं पुनर्रचना करणें अवश्य ठरतें, ह्या व्यवहारी सिद्धांताचा त्याला विसर पडतो असा स्टीफन स्पेंडरसारख्या मार्क्सवादी टीकाकारांच्या टीकेचा आशय आहे. वैयक्तिक उन्नति व संस्कृति ह्यांचा विचार करतां करतां इलिअट स्वतः फॅसिस्ट नसूनहि फॅसिस्टांच्या विचारसरणीजवळ कसा येतो हें स्पेंडरनें दाखवून दिलें आहे. (पहा 'दी डिस्ट्र-क्टिव्ह एलिमेंट'— स्टीफन स्पेंडर, पानें १६५–१६७). केवळ आत्मचिंतन व वैयक्तिक प्रयत्न यावर भर देणाऱ्या व्यक्तीच्या विचारांचें पर्य-वसान व्यक्ति–च्या–सत्ता–पूजनांत होतें अशीं अनेक उदाहरणें आहेत. धर्मश्रद्धा अगर व्यक्तिश्रद्धा ह्यांना सामाजिक पुनर्रचनेच्या प्रयत्नांची जोड दिली नाहीं तर मनुष्य संन्यासी तरी बनतो किंवा समाजपराङ्मुख व परावर्तनवादी किंवा प्रतिक्रान्तिवादी (reactionary) तरी होतो असा अनुभव आहे. गांधीजी हे इलिअट-








प्रमाणें अन्तःप्रेरणेवर व धर्मश्रद्धेवर भर देत असले तरी "ते कांहीं कल्पनावादी नव्हते. बाह्यजगाचें सत्यत्व त्यांनीं मानलें होतें आणि सामाजिक विकासासाठीं नाना प्रकारच्या अनुकूल बाह्य संस्था निर्मिल्या पाहिजेत ह्याची त्यांना जाणीव होती" (आचार्य भागवत ). त्यामुळें त्यांच्या क्रांतीची साधना तौलनिक दृष्टीनें जास्त पायाशुद्ध ठरते. परंतु ह्या पद्धतीच्या टीकेनें इलिअटवरील लेखाचा शेवट करणें योग्य नाहीं. कवी किंवा कलावंत यांचेकडून समाजक्रांतीच्या योजनेची अपेक्षा कोणीच करीत नाहीं. मानवी मनाचे सूक्ष्मतर पापुद्रे उघडून त्यांतील अज्ञात स्थलांवर प्रकाश पाडण्याचें, परिस्थितीचें निर्भीड पृथक्करण करण्याचें जें कलावंताचें काम तें त्यानें उत्तम पार पाडलें आहे ह्यांत शंका नाहीं. इलिअटच्या काव्यांत 'कल्पनांचें संगीत' दिसते. ही आय. ए. रिचर्डस्‌ची उक्ति त्याच्या काव्याचें योग्य मूल्यमापन करते.

---

## धर्मातीत राज्य व भारतीय परंपरा

आपल्या या देशाच्या प्राचीन परंपरेशीं धर्मातीत राज्याची कल्पना विसंगत आहे असें ज्यांना वाटतें ते चुकत आहेत. ख्रिस्ती शतकापूर्वी ३००० वर्षे भारतानें मानवी अंतःकरण ईश्वरमय होणें हेंच मानवीजीवनाचें ध्येय ठरविलें व आपल्या धर्मानें आपल्याला कधींच अंध व विचारहीन श्रद्धेनें कोणतीहि गोष्ट स्वीकारण्यास सांगितलें नाहीं. ऋग्वेदानें मननाची महती पटवून दिली आहे. गीता 'मनालाच गुरु कर' असें सांगतें. तेव्हां असें आपण समजूं नये कीं बुद्धीचा मृत्यु ही आध्यात्मिकतेची आवश्यक बाब आहे.

धर्मातीत याचा अर्थ धार्मिक दृष्ट्या पक्षपात न करणारी वृत्ति व सर्व धर्मांना समान संधि देऊन एकाद्या विशिष्ट धर्माला प्राधान्य न देणें.

आपल्या धर्मांत जें चमत्कृतिपूर्ण वैशिष्ट्य आहे तें हें कीं आपल्या धर्मीयांचा दृष्टिकोन स्वागतशील होता. त्यांचा असा समज झालेला नव्हता कीं आपलाच धर्म ईश्वरत्व प्राप्त करून घेण्याला समर्थ आहे. धार्मिक ध्येयवादाशीं ही वृत्ति विसंगत आहे. आज पूर्व व पश्चिम या दोहोंमध्यें जो मानवी मूल्यांत फरक आढळून येतो त्याचें प्रमुख कारण धर्माच्या कार्यक्षमतेचा अभाव व शास्त्राची अफाट वाढलेली प्रगति.

निसर्गातील गूढ तत्त्वें शोधून काढण्यात मानवी बुद्धि अतिशय उत्कटतेनें व्यग्र झाली व त्यामुळें माणसाचें धर्माकडे दुर्लक्ष झालें. जीवनाच्या एकाच अंगावर माणसाचें मन केंद्रित झालें व दुसऱ्या–आत्म्याच्या उपासनेच्या–भागाकडे दुर्लक्ष झालें.

याउलट भारतानें या दोन्हीं गोष्टींकडे लक्ष दिलें. हें अगदीं अलीकडे नव्हे. तर ख्रिस्तीसनापूर्वी ३ हजार वर्षे भारतानें आध्यात्मिक मूल्यांची किंमत बरोबर ओळखली. मोहेनजेदारो येथील शिवाची मूर्ति कमलाच्या आसनावर पाय वेढून बसली आहे. तिचे डोळे मिटलेले आहेत. याचा अर्थ असा कीं इतर कांहीं जिंकण्यापेक्षां मन जिंकणें हें महत्त्वाचें आहे. अशा या परंपरेच्या भारतीय लोकांना शास्त्रीय बुद्धीबरोबर आत्म्याचें चिंतन करणें कठीण नाहीं. या गोष्टी एकमेकांपासून विलग करणें योग्य होणार नाहीं.

—डॉ. **सर्वपल्ली राधाकृष्णन्**, बडोदें येथील भाषणांतून, मार्च १९४९








श्री रवींद्रनाथ ठाकूर, अनुवादिका* : प्रा. सौ. सिंधु जोशी

# सौं द र्य बो ध

## रसासाठीं नीरसतेचा स्वीकार

आयुष्याच्या पूर्व भागांत ब्रह्मचर्याचें पालन करून नियम व संयम यांच्या द्वारें जीवन घडवावें लागतें. भारतवर्षाच्या या प्राचीन उपदेशाची गोष्ट निघतांच अनेकांच्या मनांत असा विचार येईल कीं, ही फार कठोर साधना आहे. हिच्यामुळें नाहीं निर्माण होणार कोणी खूप सशक्त मनुष्य, कीं नाहीं उत्पन्न होणार वासनेचे पाश तोडणारा मस्त साधु-पुरुष! मग या साधनेमध्यें रसाला स्थान कोठें आहे? कोठें आहे साहित्य, चित्र, संगीत? मनुष्याला जर पूर्णावस्थेला न्यावयाचें असेल तर सौंदर्य-चर्चेची अवहेलना करून चालणार नाहीं.

हें म्हणणें बरोबर आहे. सौंदर्य तर पाहिजेच. आत्महत्या कांहीं साधनेचा विषय होऊं शकत नाहीं. आत्म्याचा विकास हेंच साधनेचें लक्ष्य असतें. वस्तुतः विद्यार्थिदशेंत होणारें ब्रह्मचर्यपालन म्हणजे कांहीं शुष्कतेची साधना नाहीं. शेताचें ओसाड वाळवंट करून टाकण्यासाठीं शेतकरी परिश्रम करीत नसतो. शेतकरी जेव्हां नांगरानें जमीन नांगरतो; खुंट्यांच्या औतानें ढेकळें फोडून चकाचूर करतो, खुरप्यानें सगळें गवत नि बारीकसारीक झुडुपें उपटून एखाद्या वेळीं तें उजाड करून टाकतो, तेव्हां अडाणी लोकांच्या मनांत येईल कीं जमिनीवर जुलूम चालला आहे! परंतु असें करूनच फळ मिळवावयाचें असतें. यथार्थपणें पुढील रसग्रहणाचा अधिकार मिळवावयाचा तर आरंभीं कठीण शेतीची जरूरी असते. रसाकडे जाणाऱ्या मार्गावरच त्या मार्गाचा विसर पाडणारीं अनेक विघ्नें असतात. त्या मार्गावरील सर्व अडचणी टाळून पूर्णतेचा लाभ करून घेण्याची ज्यांना इच्छा आहे त्यांनाच नियम-संयमाची अधिक आवश्यकता असते. रसासाठींच या नीरसतेचा स्वीकार करावा लागतो.

## निवृत्तिच प्रचंड प्रवृत्ति बनते!

मनुष्याचें हेंच दुर्भाग्य होय कीं गौण हेतूमुळें मूळ हेतु प्रायः झांकला जातो. गाणें शिकावयाचें असतें तो उस्तादी शिकून घेतो, धनवान व्हावयाचें असतें तो पैसा जमवून कृपणेचा विषय होऊन बसतो, देशाचें हित करावयाचें असतें तो कमिट्यांमध्यें ठराव पास करून स्वतःला मनांतून कृतार्थ समजतो. याप्रमाणें नियमसंयमच अंतिम हेतूची जागा अडवून बसले आहेत हें आपण नेहमीं लक्ष्यांत घेतलें पाहिजे. नियमांनाच जे लाभ किंवा पुण्य मानतात ते नियमांच्या लोभानें एकदम लुब्ध होऊन जातात. नियमलोलुपता ही षड्रिपूंव्यतिरिक्त सातवा रिपु झालेली दिसते.

हें मनुष्याच्या जडत्वाचें एक लक्षण आहे. संचय करण्यास सुरुवात केली कीं माणसाला थांबावेंसें वाटतच नाहीं. विलायतेंतील गोष्ट आपण ऐकली आहे. तेथें कित्येक लोक वेड्याप्रमाणें देशविदेशांत छापलेल्या पोस्टाच्या तिकिटांचा संग्रह करतात, त्यासाठीं होणारा पूसतपास आणि खर्च याला अंत नसतो. याप्रमाणें संग्रहवायूमुळें पागल बनून कोणी चिनीमातीचीं भांडीं, तर कोणी जुने जोडे—पादत्राणें, यांचा संग्रह करण्यास धडपडत असतात. उत्तरमेरू (उत्तरध्रुवा)च्या अगदीं केन्द्र-स्थानीं जाऊन कांहींहि झालें तरी एक निशाण रोवून येणें हें एक प्रकारचें कार्यच आहे. तेथें

---

* "साहित्य" नामक निबंधसंग्रहांतील "सौंदर्यबोध" या निबंधाच्या पूर्वार्धाचा अनुवाद.








बर्फाच्या भूमीशिवाय दुसरें कांहीं नसतें. तरी मन परावृत्त होत नाहीं. त्या मेरू (ध्रुवा)च्या केंद्रबिन्दू-जवळ कोण किती मैल गेले याचे आंकडे मांडण्यांतच ते मस्त होऊन जातात. पर्वतावर ते जेवढे फूट उंच चढतात तेवढा तो एक प्रकारचा लाभ मानून हिशेब करीत असतात. या शून्य लाभासाठीं स्वतः मरतात आणि कित्येक इच्छेविरुद्ध आलेल्या मजुरांना जुलुमानें मारतात. पण थांबायची इच्छा त्यांना होत नाहीं.

अपव्यय आणि क्लेश जेवढे आधिक तेवढाच प्रयोजनहीन सांठा आणि परिणामशून्य जयप्राप्ति यांचा गौरव अधिक असें मानलें जातें. नियमसाधनेचा लोभ सुद्धां क्लेशाच्या प्रमाणाचा हिशेब करून आनंदाचा उपभोग घेतो. कठिण शय्येवर झोंपण्याचें व्रत सुरू होतें तेव्हां (प्रथम) मातीवर बिछाना पसरून, नंतर फक्त एक कांबळें आंथरून व त्यानंतर कांबळेंहि टाकून केवळ मातीवर झोपणें असा (कठीण शय्येवर झोंपण्याचा) लोभ क्रमाक्रमानें वाढत जातो. कृच्छ्र—साधनेलाच (देहदंडप्रधान साधनेला) लाभ मानणें म्हणजे शेवटीं आत्मघातापर्यंत तराजू झुकविणें होय. यांत दुसरेंतिसरें कांहीं नसून निवृत्तीलाच एक प्रचंड प्रवृत्ति बनवून टाकणें, गळ्याचा फांस सोडविण्याच्या प्रयत्नांतच गळ्याला फांस लावून मरणें होय.

म्हणून जेव्हां केवळ नियमपालन करणें हीच एक लोभनीय गोष्ट समजली जाते तेव्हां मात्र कठोरतेचें दडपण वाढल्यामुळें स्वाभाविकपणें सौंदर्यबोध एकदां पिसून काढून बाहेर प्रकट करणें शक्य होतें, यांत शंका नाहीं. परंतु पूर्णतेच्या लाभाकडेच दृष्टि ठेवून संयमचचैलाहि योग्य रीतीनें संयम करून ठेवतां आलें म्हणजे मनुष्यत्वाच्या कोणत्याहि अविभाज्य घटकास आघात पोंचणार नाहीं, उलट तें परिपुष्ट होईल.

## आनंदाचा पाया संयम

खरी गोष्ट अशी आहे कीं पाया मात्र मजबूत झाला पाहिजे; कारण तो तसा न झाल्यास आश्रय देऊं शकणार नाहीं. जें धारण करणारें असतें, जें आकार देणारें असतें, तें कठिण असतें. मनुष्याचें शरीर अतिशय नरम असणार नाहीं. कां ? तर बळकट हाडांवर त्याच्या वाढीचा आरंभ न झाल्यास तें एक गोळा होईल, त्याच्या आकृतीचा विकास होणार नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञानाचा पायाहि मजबूत आहे. आनंदाचा पायाहि मजबूत आहे. ज्ञानाचा पाया मजबूत नसेल तर तें एक केवळ असंबद्ध स्वप्न होईल, आणि आनंदाचा पाया मजबूत नसेल तर तो एक केवळ वेडाचा किंवा मत्ततेचा प्रकार होईल.

हा जो पाया आहे तोच संयम. यांमध्यें विचार आहे, बल आहे, त्याग आहे. यांमध्यें निर्मम दृढता आहे. हा संयम देवतेप्रमाणें एका हातानें वर देतो आणि दुसऱ्या हातानें संहार करतो. हा संयम आरंभीं जेवढा दृढ असतो तेवढाच शेवटीं कठिणहि असतो. सौंदर्याचा पूर्ण उपयोग घ्यावयाचा असल्यास या संयमाचें विशेष प्रयोजन आहे. नाहींतर ज्याप्रमाणें मूल भाताची ताटली घेऊन अन्न नुसते आंगावर माखून, मातींत मिसळून, उलट रास करून ठेवतें आणि त्यापैकीं थोडेसेंच त्याच्या पोटांत जातें त्याप्रमाणेंच आम्हींहि, प्रवृत्ति असंयत असल्यास, उपभोगाची सामग्री घेऊन त्याच अवस्थेला जातो. आपण ती केवळ शरीरावर माखतो, तिच्यापासून लाभ करून घेऊं शकत नाहीं.

सौंदर्य निर्माण करणें हेंहि असंयत कल्पनावृत्तीचें कार्य नाहीं. सगळ्या घराला आग लावून देऊन कांहीं कोणी संध्याकाळचा दिवा लावीत नाहीं ! एकदम अग्नि आवाक्याबाहेर जाऊं नये म्हणूनच घरांत दिवा लावावयाच्या वेळेला अग्नीवर ताबा ठेवायला हवा. प्रवृत्तिसंबंधांतहि हीच गोष्ट बरोबर आहे. प्रवृत्तीला जर एकदम पूर्णपणें प्रज्वलित होऊं दिलें तर ज्या सौंदर्याला केवळ आरक्त करण्यासाठीं तिचें प्रयोजन त्यालाच ती जाळून भस्म करील; फूल तोडायला जाऊन तें उपटून टाकून धुळीस मिळवील.

## सौंदर्य हें गरजेहून अधिक आहे

ही गोष्ट खरी कीं जगांत आपल्या क्षुधित प्रवृत्तीनें जेथें जेथें वर्षाव केला आहे तेथें तेथें तिच्या जवळपास एक प्रकारच्या सौंदर्याचें आयोजन पाहावयास मिळतें. फळानें केवळ आपलें पोटच भरतें असें नाहीं, तर तें स्वाद, गंध आणि दृश्य याबाबतींतही सुंदर असतें. तें मुळींच सुंदर नसतें तरी



अनुक्रमणिका








आपण तें पोटाच्या गरजेसाठीं खाल्लेंच असतें. आपली ही एक मोठी गरज असूनहि केवळ पोट भरण्याच्या दृष्टीनेंच नव्हे, तर सौंदर्यभोगाच्या दृष्टीनेंहि तें आपल्याला आनंद देतें. हा आपल्या गरजेहून अधिक असा लाभ आहे. जगांत सौंदर्य म्हणजे तें होय कीं जें आपणांस, एक प्रकारचा, गरजेच्या गोष्टीहून अधिक असा लाभ देतें. तें आपल्या मनाला कोणत्या दिशेला नेत आहे? क्षुधातृप्तीकडे गेलेला झोक सर्वाधिकारी होऊन बसणार नाहीं, आपल्या मनावरील तिचा (क्षुधेचा) फांस सैल होईल म्हणून सौंदर्याचा चाललेला प्रयत्न पाहावयास मिळतो. चंडी क्षुधा अग्निमूर्ति होऊन म्हणते, 'तुला खाऊन टाकलेंच पाहिजे, यावांचून दुसरी गोष्ट नाहीं.' दुसऱ्या बाजूला सौंदर्यलक्ष्मी हंसत मुखानें सुधेचा वर्षाव करून अत्युग्र गरजेच्या लालभडक डोळ्यांवर आवरण टाकते, पोटाच्या अग्नीला खालच्या मजल्यावर ठेवून वरच्या महालांत आनंदभोगोत्सवाची योजना करते. अनिवार्य गरजेमध्यें मानवाची एक प्रकारची मानखंडना आहे; परंतु सौंदर्य हें गरजेहून कांहींतरी अधिक नाहीं का? म्हणूनच तें आपली मानखंडना दूर करून टाकतें. आपल्या क्षुधातृप्तीबरोबरच सौंदर्य नेहमीं एक उच्चतर सूर लावीत असतें. म्हणूनच जे एके काळीं असंयमी बर्बर होते ते आज मनुष्य झाले आहेत; जे केवळ इंद्रियाधीन होते ते आज प्रेमाला वश झाले आहेत. आज भूक लागली तरी आपण पशूसारखें, राक्षसासारखें, कांहींतरी बनवून खात बसत नाहीं. सौंदर्याचें रक्षण केलें नाहीं तर आपली खाण्याची प्रवृत्तीहि नाहींशी होईल. म्हणून आतां आपली केवळ खात बसण्याचीच प्रवृत्ति नाहीं, सौंदर्यानें तिला नरम बनविली आहे. मुलाला लाज वाटावी म्हणून आपण म्हणतो "छीः! छीः! असें आधाश्यासारखें खातोस! असें खाणें वाईट दिसतें!" सौंदर्य आपल्या प्रवृत्तीला संयमित करीत आलें आहे. तें जगाबरोबर आपला केवळ प्रयोजनाचा संबंध न ठेवतां आनंदाशींहि संबंध जोडतें, प्रयोजनाच्या संबंधांत आपलें दैन्य, आपलें दास्य असतें; आनंदाच्या संबंधांत आपली मुक्ति असते.

## 'सुखार्थी संयतो भवेत्'

म्हणूनच असें दिसून येतें कीं परिणामीं सौंदर्य माणसाला संयमाकडेच ओढीत असतें. माणसाला तें एक असें अमृत देतें कीं ज्याचें प्राशन करून माणूस भुकेचा व्यवहार दिवसेंदिवस जिंकीत जातो. असंयमाचा अमंगल म्हणून परित्याग करावयास जेव्हां एखाद्याचें मन बंड करीत असतें तेव्हां तें त्याचा असुंदर म्हणून इच्छापूर्वक त्याग करूं पाहतें.

सौंदर्य ज्याप्रमाणें आपल्याला क्रमाक्रमानें सुंदरतेकडे–संयमाकडे आकर्षीत असतें, त्याप्रमाणेंच संयमहि आपली सौंदर्याच्या उपभोगाची गंभीरता वाढवीत असतो. निस्तब्ध भावनेंत चित्त एकाग्र कसें करावें तें आपल्याला माहीत नसलें तर आपणाला सौंदर्याच्या मर्मस्थलांतून रस वर काढतां येणार नाहीं. एकनिष्ठ सती स्त्रीलाच प्रेमाच्या यथार्थ सौंदर्याची प्राप्ति होऊं शकेल, स्वैरिणीला होणार नाहीं. सतीत्व त्याला म्हणावें कीं जो चांचल्यविहीन संयम असतो, ज्याच्या द्वारें गंभीर भावानें प्रेमाच्या निगूढ रसाचा लाभ करून घेणें संभवनीय असतें. आमच्या सौंदर्यप्रियतेमध्येंहि जर या सतीत्वाचा संयम नसेल तर काय होईल? ती केवळ सौंदर्याच्या आजूबाजूला चंचल बनून घिरट्या घालीत राहील; उन्मत्तपणालाच आनंद मानण्याची चूक करील; जें मिळाल्यानें एकदम सर्व सोडून ती स्थिर होऊन बसली असती तें तिला मिळणार नाहीं. यथार्थ सौंदर्य एकाग्रचित्त साधकालाच प्रत्यक्ष दिसेल; लोलुप, भोगी माणसाला नव्हे. जे लोक अधाशी असतात ते भोजनाचे रसज्ञ होऊं शकणार नाहींत.

पौष्यराजानें ऋषिकुमार उत्तंकाला म्हटलें, "जा, अंतःपुरांत जा. तेथें राणीला पाहूं शकशील." उत्तंक अंतःपुरांत गेला पण राणीला पाहूं शकला नाहीं. अपवित्र असतांना कोणीहि सतीला पाहूं शकत नाहीं. उत्तंक तेव्हां अपवित्र होता. विश्वाच्या अखिल सौंदर्याच्या, सर्व माहिम्याच्या अंतःपुरांत जी सती–लक्ष्मी विराजत आहे तीहि आमच्या समोरच आहे. पण पवित्र न बनल्यास तिला पाहतां येणार नाहीं. जोंपर्यंत विलासांत गटंगळ्या खात आहोंत, भोगाच्या नशेंत उन्मत्त

होऊन फिरत आहोंत, तोंपर्यंत सबंध विश्वाची, प्रकाशाचें वस्त्र नेसलेली सती लक्ष्मी आपल्या दृष्टी-पुढून अंतर्धान पावते.

ही गोष्ट मी धर्मनीतिप्रचाराच्या दृष्टीनें सांगत नाहीं. आनंदाच्या दृष्टीनें—ज्याला इंग्रजींत 'आर्ट्' म्हणतात त्याच दृष्टीनें—सांगत आहे. आमचीं शास्त्रेंहि सांगतात कीं केवळ धर्मासाठीं नव्हे तर सुखासाठींहि संयमी झालें पाहिजे. "सुखार्थी संयतो भवेत्।" अर्थात् इच्छेची कृतार्थता हवी असेल तर इच्छेला ताब्यांत ठेवा, सौंदर्याचा उपभोग घ्याव-याचा असेल तर भोगलालसेचें दमन करून पवित्र व्हा, शांत व्हा. प्रवृत्तींचें दमन करणें माहीत नसेल तर प्रवृत्तीच्या कृतार्थतेला सौंदर्यबोधाची कृतार्थता मानण्याची चूक आपण करतों. जी चित्ताची गोष्ट आहे तीच जणूं मिळवली असें दोन्ही हात चोळीत म्हणतों. म्हणूनच म्हटलें कीं सौंदर्यबोधाच्या खऱ्या उद्बोधनासाठीं ब्रह्मचर्याचें साधनच आवश्यक आहे.

## प्रत्यक्षाचा बराचसा भाग अप्रत्यक्ष असतो

ज्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकणें कठीण ते एकदम संशयित होऊन बोलूं लागतील कीं हें केवळ कवित्व आहे. ते म्हणतील कीं जगांत जे सर्व कला-कुशल गुणिजन सौंदर्यसृष्टि निर्माण करीत आले आहेत त्यांच्यापैकीं अनेक संयमाचें उदाहरण मागें ठेवून गेलेले नाहींत; त्यांचें जीवनचरित्र पठण करणें शक्य नाहीं; तेव्हां कवित्व बाजूला ठेवून या वास्तव सत्याचा विचार करण्याची जरूरी आहे.

माझें म्हणणें असें कीं वास्तवावर आपण इतका जास्त विश्वास कां ठेवतों ? कारण तें प्रत्यक्ष इंद्रिय-गोचर आहे. परंतु अनेक ठिकाणीं मनुष्याच्या संबंधांत आपण ज्याला वास्तव म्हणतो त्याहून बराचसा भाग आपल्याला अप्रत्यक्षच असतो. एवढेसें पाहावयास मिळालें तर मनांत म्हणतो कीं सगळेंच जणू पाहावयास मिळालें! हा मनुष्यनिर्मित वास्तवाचा वृत्तांत पाहिला म्हणजे एकजण ज्याला गोरा म्हणतो त्याला दुसऱ्यानें भुरकट रंगाचा म्हटलें तरी आपण बचावलों ! पण तो त्याला एकदम काळा म्हणून बसतो ! नेपोलियनला कोणी म्हणतात देवता, कोणी म्हणतात राक्षस. अकबराला कोणी म्हणतात उदार, प्रजेचें हित चिंतिणारा, तर कोणी म्हणतात कीं त्याच्या हिंदू प्रजेच्या बाबतींत तोच विनाशाचें मूळ होता. कांहीं म्हणतात वर्णभेदच आमचा हिंदु-समाजाचें रक्षण करतो, कोणी म्हणतात वर्णभेदाच्या प्रथेनेंच आपल्याला धुळीला मिळविलें आहे. तरीहि दोन्ही पक्ष वास्तव सत्याची शपथ घेत असतात !

वस्तुतः मनुष्यनिर्मित व्यवहारांत एकाच ठिकाणीं आपल्याला अनेक उलटसुलट घटना पहावयास मिळतात. माणसानें पाहिलेल्या भागांत जे कांहीं सर्व विपरीतच प्रकट झालेलें असेल त्याचा माणसानें न पाहिलेल्या भागांत निश्चितपणें एक प्रकारचा निगूढ समन्वय असेल. म्हणून खरें सत्य प्रत्यक्षावरच तरंगतें असें नाहीं; तर तें अप्रत्यक्षामध्येंच बुडलेलें असतें. म्हणूनच त्याच्यासाठीं इतके तर्क आणि इतकी मारामारी होते. आणि त्यामुळें एकाच इतिहासाला दोन विरुद्ध पक्षांमध्यें वकीलपत्रें मिळतात.

जगांतील कलानिपुण गुणी जनांच्या बाबतींतहि आपणाला उलटसुलट घटना दिसतात. तेथें वास्तव सत्याची बढाई मारून लगेच कांहीं विरुद्ध गोष्टी आपणाला बोलतां येणार नाहींत. सौंदर्यदृष्टि दुर्बल-तेंतून, चंचलतेंतून, असंयमांतून उत्पन्न होतें हें म्हणणें एक अगदीं विरुद्ध गोष्ट आहे. वास्तव सत्यानें साक्ष दिली तरी आम्हीं म्हणूं, "खरोखर, सर्वच साक्षीदार हजर होणें शक्य नाहीं, अस्सल साक्षीदार तर पळून गेला आहे." जरी आपणाला आढळलें कीं कोणी एखादी लुटारूंची टोळी आपली खूप उन्नति करीत आहे, तरी त्या वास्तव सत्याच्या मदतीनें असा सिद्धांत मांडतां येणार नाहीं कीं, दस्युवृत्ति हाच उन्नतीचा उपाय आहे ! तेव्हां एक गोष्ट तरी प्रमाणावांचूनहि सांगतां येईल कीं लुटारूंची जी थोडीशी क्षणिक उन्नति दिसते आहे तिचें मूळ कारण त्यांच्यामधील ऐक्य, अर्थात् त्यांच्या टोळींतील प्रत्येकाचें एकमेका-बरोबरचें धर्मपालन होय. आतां ही उन्नति नष्ट होईल तेव्हां ती नष्ट होण्याचें कारणहि हें ऐक्यच असें न मानतां असें म्हणूं कीं, इतरांबरोबरचें अधर्माचरण हें त्यांच्या पतनाचें कारण होय. असें दिसलें कीं कोणी एकादा माणूस व्यापारांत खूप पैसा मिळवून विलासांत तो उडवीत आहे तर मी








असें नाहीं म्हणणार कीं जे पैसे उडवूं शकतात त्यांनाच धनोपार्जनाचा मार्ग माहीत असतो; पण असें म्हणेन कीं पैसा मिळविण्याच्या कामीं तो माणूस हिशोबी होता, तेथें त्याचा संयम व त्याची विचारशक्ति हीं साधारण लोकांच्या पेक्षां जास्त होतीं, आतां पैसा उडविण्याच्या वेळीं त्याचा उधळपट्टीच्या बाजूचा कल हिशोबी बुद्धीला खलास करून टाकीत आहे.

## सौंदर्य चराचराशीं आपला सूर मिळवितें

कलावान् गुणी लोकहि खरोखर गुणी असतात. तेथें ते तपस्वीहि असतील. तेथें स्वैराचार चालणार नाहीं; तेथें चित्ताची साधना व संयम हीं असणारच. थोडे लोकच संपूर्णपणें बलवान् असतात, जे स्वतःच्या नीतितत्त्वांना सोळा आणे कामीं आणूं शकतात. कांहींना कांहीं भ्रष्टता येतेच. कारण आपण सर्वच हीनतेकडून पूर्णतेकडे अग्रेसर बनून चाललों आहोंत, शेवटाला येऊन उभे राहिलों नाहीं. परंतु जीवनांत आपण ज्या कांहीं स्थायी महान् गोष्टी घडवितों त्या आपल्या अंतरांतील धर्मबुद्धीच्या साहाय्यानेंच निर्माण होतात; भ्रष्टतेच्या साहाय्यानें नव्हे. गुणी व्यक्तींहि जेव्हां आपली कलारचना करतात तेव्हां आपलें चरित्रच व्यक्त करीत असतात. जेथें त्यांनीं आपलें जीवन नष्ट केलेलें असतें तेथें चरित्राचा अभाव प्रकट होतो; तेथें त्यांच्या मनामध्यें धर्माचा जो एक सुंदर आदर्श असतो तो शत्रूच्या आकर्षणानें त्याच्या विरुद्ध जाऊन शेवटीं आपणच पीडला जातो. कांहींहि घडविण्यास संयमाची जरूरी असते, नष्ट करण्यांत असंयम असतो. धारणा करण्यास संयम पाहिजे, मिथ्या-ज्ञानांत असंयमच असतो.

येथें प्रश्न असा उत्पन्न होईल कीं जेव्हां एकाच मनुष्याच्या ठायीं सौंदर्याच्या विकासाची शक्ति व चरित्राचा असंयम हीं एकत्र नांदून परिणत होतील तेव्हां तर असें आढळेल कीं वाघ व गाय एकाच घाटावर पाणी पीत आहेत! अर्थात् वाघ व गाय एका घाटावर पाणी पिऊं शकतील. पण केव्हां? जेव्हां वाघहि पूर्णता मिळवील, गायहि पूर्ण गाय होईल तेव्हांच! बाळपणीं दोघेंहि एकमेकांबरोबर खेळूं शकतील, मोठीं झाल्यावर वाघ झडप घालील व गायहि पळून जाण्याचा प्रयत्न करील.

याप्रमाणें सौंदर्यबोधाचा यथार्थ परिणत भाव केव्हांहि प्रवृत्तींचा विक्षोभ, चित्ताचा असंयम यांजबरोबर एके ठिकाणीं राहूं शकणार नाहीं. कारण दोन्ही एकमेकांचे विरोधी आहेत.

तुम्ही म्हणाल कीं ते कां विरोधी आहेत? तर त्याला कारण आहे. विश्वामित्रानें विधात्याबरोबर स्पर्धा करून एका जगाची निर्मिति केली. ती त्याच्या क्रोधाची सृष्टि, दंभाची सृष्टि होती. म्हणून तें जग विधात्याच्या जगाशीं एकत्व पावूं शकलें नाहीं. त्याच्याशीं स्पर्धा करून आघात करूं लागलें. तें सौंदर्यहीन, सृष्टिहीन असें झालें. चराचराबरोबर त्याला आपला सूर मिळवितां आला नाहीं. शेवटीं त्रास देऊन, त्रास करून घेऊन तें नष्ट झालें.

आपली प्रवृत्ति उग्र बनली तर विधात्याच्या जगाविरुद्ध आपली जणूं (निराळी) सृष्टीच उभी करून ठेवील. त्यावेळीं चोंहों बाजूशीं तिचा मेळ बसणार नाहीं. आपला क्रोध, आपला लोभ चोंहोंबाजूला असे कांहीं विकार निर्माण करतात कीं ज्यामुळें लहान मोठें झालेसें वाटतें, मोठें लहान होऊन बसतें, जें क्षणकालीन असतें तेंच चिरकालाचें आहे असें मनाला वाटतें, जें चिरकालाचें असतें तें नजरेस पडत नाहीं! ज्याच्या ठायीं आपणाला लोभ उत्पन्न होतो तें आपण इतक्या असत्य रूपांत घडवीत असतों कीं जगांतील मोठमोठ्या सत्यांना तें आच्छादून टाकतें, चंद्रसूर्यतार्‍यांना तें म्लान करून टाकतें. याप्रमाणें आपली सृष्टि विधात्याशीं विरोध करूं लागते.

समजा, नदी वाहत आहे. तिची प्रत्येक लाट स्वतंत्रपणें मस्तक वर उचलीत असली तरी सर्व मिळून त्या एकाच समुद्राकडे गाणें गात जातात. कोणी कोणालाहि अडचण करीत नाहीं. पण यामध्येंच जर कांहीं भ्रमण सुरूं झालें तर तोच भोंवरा एका जागींच थांबून उन्मत्तासारखा फिरूं लागतो, प्रवाहांत अडथळा उत्पन्न करून बुडवून टाकण्याचा प्रयत्न करतो. सर्व नदीची जी गति आहे, जो हेतु आहे, त्यांत अडचण उत्पन्न करून







त्याला स्थिरताहि लाभत नाहीं कीं तो अग्रेसरहि होत नाहीं !

आपली एखादी प्रवृत्ति उन्मत्त झाली तर ती आपल्याला समस्त जगाच्या प्रवाहापासून दूर ओढून एकाच बिंदूभोंवतीं फिरायला लावून नष्ट करूं लागते. आपलें मन स्वतःला त्या एकाच केंद्राच्या चारी बाजूंना बांधून घेऊन त्यामध्येंच आपलें सर्वस्व विसर्जन करूं पाहतें व दुसऱ्याचें सर्वस्व नष्ट करूं इच्छितें. या उन्मत्ततेमध्यें एका संप्रदायाचे लोक एकाच प्रकारचें सौंदर्य पाहतात. एवढेंच नव्हे तर युरोपीय साहित्यांत अशा पिंगा घालणाऱ्या प्रवृत्तीच्या भ्रमणनृत्याच्या प्रलयोत्सवांतूनच, त्याचा कांहीं परिणाम होत नसतांहि, त्यामुळें कसलीहि शांति उत्पन्न होत नसतांहि, जणूं अधिक सुख मिळविलें जातें ! परंतु याला आपण शिक्षणाची संपूर्णता म्हणूं शकणार नाहीं, ही स्वभावाची विकृति आहे. संकुचित मर्यादांमध्यें पाहिलें तर जें एकदम मनोहर असें वाटतें, तेंच समग्र जगाशीं मेळ घालून पाहिलें तर त्यांतील सौंदर्याचा विरोध नजरेसमोर येतो. सुरापानाच्या बैठकींतील प्रमत्त मनुष्य चराचर जगाला विसरून जाऊन आपल्या सभेला वैकुंठपुरी म्हणत असतो; परंतु अप्रमत्त अशा द्रष्ट्यानें तिचा चारी बाजूंनीं जगाशीं मेळ घालून पाहिलें म्हणजेच तिची बीभत्सता समजून येते. आपल्या प्रवृत्तींतहि जेव्हां उत्पात घडून येतो तेव्हां तिला एक अस्वाभाविक अशी दीप्ति लाभत असते; तरी पण विशाल अशा विश्वामध्यें तिला पाहिलें म्हणजे तिची बीभत्सता दिसून येण्यास वेळ लागत नाहीं. अशा रीतीनें ज्याला स्थिरपणें मोठ्याशीं लहानाचा, सबंध जगाशीं प्रत्येकाचा (व्यक्तीचा) मेळ घालून पाहतां येत नाहीं तो क्षोभालाच आनंद व विकृतीलाच सौंदर्य म्हणून भ्रमांत सांपडतो. म्हणूनच सौंदर्यबोधाचा संपूर्णपणें लाभ करून घ्यावयाचा असेल तर चित्ताची शांति आवश्यक आहे. ती असंयमाच्या द्वारा मिळण्याची शक्यता नाहीं.

## डोळ्यांच्या दृष्टीला मनाच्या दृष्टीची जोड

सौंदर्यबोधाची संपूर्णता कोणत्या दिशेला जात आहे तें पाहूंया. आपल्याला हें माहीत आहे कीं रानटी लोक जें सुंदर म्हणून सन्मानितात तें सुधारलेले लोक टाकून देतात. याचें मुख्य कारण असें आहे कीं रानटी लोकांचें मन जेवढ्या क्षेत्रांत वावरतें तेवढ्याशा क्षेत्रांत सुधारलेल्या लोकांचें मन वावरत नसतें. आंत व बाहेर, देशांत व कालांत सुधारलेल्या जातींचें जग मोठें झालेलें असतें आणि त्याचीं अंगप्रत्यंगें अत्यंत विविध असतात. म्हणूनच रानटी लोकांच्या जगांत व सुधारलेल्या लोकांच्या जगांत वस्तूंचें मूल्यमापन एक असूं शकणार नाहीं.

चित्रकलेसंबंधीं जी व्यक्ति अडाणी आहे ती फलकावर खूप रंगबिरंग आणि गोलगोल आकृति पाहून खूष होऊन जाईल. तो मनुष्य चित्र मोठ्या क्षेत्रामध्यें ठेवून पाहूं शकत नाहीं. त्याच्या इंद्रियांचा लगाम खेंचून धरील अशी एखादी उच्चतर विचारशक्ति त्याच्यांत नसते. मुळांतच जें त्याला आमंत्रण देतें त्यालाच तो वश होतो. राजवाड्याच्या देवडीवरील दरवानाचा बिल्ला व भपकेदार पोषाक पाहून त्यालाच तो सर्वश्रेष्ठ व्यक्ति मानून बेचैन होतो. देवडी ओलांडून आंत सभेमध्यें जाणें जरूरीचें असतें याचा त्याला अनुभवच येत नाहीं. पण जे लोक इतके ग्राम्य नाहीत ते इतक्या सहज भुलले जाणार नाहींत. त्यांना माहीत असतें कीं दरवानाचा महिमा एकदम खूप नजरेंत भरतो. याचें कारण नजरेंत भरण्याच्या पलीकडील जो महिमा आहे तो त्याच्याजवळ नसतो. राजाचा महिमा ही केवळ नजरेंत भरण्याची गोष्ट नव्हे. तो मन लावूनच पाहिला पाहिजे. म्हणूनच राजाच्या महिम्यांत एक प्रकारची शक्ति, शांति व गांभीर्य असतें.

म्हणून जी व्यक्ति माहीतगार असते ती रंगाच्या झगझगाटानें बेचैन होणार नाहीं. असा मनुष्य मुख्याशीं गौणाचा, मध्यभागीं बसलेल्याशीं आजूबाजूच्यांचा, पुढल्याबरोबर मागल्याचा एक प्रकारचा सुसंवाद (सामंजस्य) शोधूं लागतो. रंगावर डोळे खिळून राहतील, तरी पण सुसंवादाची सुषमा पाहण्याची मनाला जरूर वाटते. त्याला गंभीर भाव ठेवून पाहावें लागतें, आणि म्हणूनच त्याचा आनंद गंभीरतर असतो.

याच कारणामुळें अनेक असे कलावंत दिसून








येतात कीं ज्यांना बाहेरील लालित्याला मान देणें आवडत नाहीं. त्यांच्या सृष्टीमध्यें जणूं एक प्रकारची कठोरता असते. त्यांच्या ध्रुपदामध्यें ख्यालाची तान नसते. एकदम त्यांची बाह्य रिक्तता दिसतांच इतर लोक त्यांना सोडून जाऊं पाहतात. पण त्या निर्मल रिक्ततेचें गंभीरतर ऐश्वर्यच विशिष्ट लोकांच्या मनाला फार मोठा आनंद देतें. म्हणूनच असें आढळून येतें कीं केवळ डोळ्यांची दृष्टि चालत नाहीं; जर तिला मनाच्या दृष्टीची जोड दिली नाहीं तर सौंदर्याला समृद्ध बनवून पाहतां येणार नाहीं. ही मनाची दृष्टि अंगीं येणें हें विशेष प्रकारच्या शिक्षणाचें कार्य आहे.

### मनुष्य हा फुलापेक्षां अधिक आकर्षक कां ?

आणखी मनांतहि अनेक थर आहेत. केवळ विचारशक्तिच्या द्वारें आपण जेवढें पाहूं शकतों त्याला हृदयभावाची जोड दिली तर हें क्षेत्र आणखी वाढतें, धर्मबुद्धीची जोड दिली तर अधिक दूरवर नजर पोंचते, अध्यात्मदृष्टि उघडली तर दृष्टिक्षेत्राला पुढें सीमाच राहात नाहीं.

म्हणूनच जें पाहण्यांत आपल्या मनाचा अधिकांश भाग अधिकार चालवितो तें पाहण्यांतच आपल्याला अधिक तृप्ति मिळते. फुलाच्या सौंदर्यापेक्षां आपल्याला मनुष्याचा चेहेरा जास्त आकर्षित करतो; कारण मनुष्याच्या मुखावर केवळ आकृतीची सुषमा नसून त्यावर चेतनेची दीप्ति, बुद्धीची स्फूर्ति, हृदयाचें लावण्य हीं असतात; त्यांचा आपल्या चैतन्यावर, बुद्धीवर, हृदयावर अधिकार चालतो. तो आपल्यापासून लौकर नाहींसा होऊं इच्छीत नाहीं.

मनुष्यामध्यें जे नरश्रेष्ठ असतात, जे ईश्वराच्या मंगलरूपाचा पृथ्वीतलावरील प्रकाश होत, ते आपल्या मनाला इतक्या दूर नेऊं पाहतात कीं तेथें पोंचणें आपणालाच अशक्य असतें. म्हणूनच जो राजपुत्र मनुष्याच्या दुःखनिवारणाच्या उपायाचें चिंतन करण्यासाठीं राज्याचा त्याग करून निघून गेला, त्याच्या मनोहरतेनें मनुष्याला किती काव्यें, किती चित्रें यांची रचना करायला लाविलें आहे त्याला सीमा नाहीं.

या ठिकाणीं संशयवादी लोक म्हणतील कीं सौंदर्यावरून पुन्हा धर्मनीतीची गोष्ट आली. दोन्हींची गढूळ भेसळ करायची काय जरूरी आहे ? जें चांगलें तें चांगलेंच, त्याचप्रमाणें जें सुंदर तें सुंदरच असतें. चांगलें आपल्या मनाला एक प्रकारें आकर्षित करतें, सुंदर आपल्या मनाला अन्य प्रकारें वेधीत असतें. दोहोंच्या आकर्षणरीतींत भिन्नता आहे, म्हणूनच भाषेनें दोहोंना दोन नांवें दिलीं आहेत. जें चांगलें असतें त्याची जरूरी आपल्याला मुग्ध करतें, आणि जें सुंदर असतें तें कशासाठीं आपणाला मुग्ध करतें तें आपल्याला माहीत नसतें.

या संबंधांत एक गोष्ट मला सांगावयाची आहे. मंगल आपलें भलें करतें म्हणूनच त्याला आपण चांगलें म्हणतों, एवढें म्हणून सर्व सांगितलेसें होणार नाहीं. जें यथार्थ मंगल असतें तें आपल्या प्रयोजनाची सिद्धि करून देतेंच, पण शिवाय तें सुंदर असतें. अर्थात् प्रयोजनपूर्तीच्या व्यतिरिक्त असें एक निर्हेतुक आकर्षण असतें. नीतिपंडित जगाच्या प्रयोजनाच्या दृष्टीनें नीति–उपदेशाच्या द्वारें मंगलाचा प्रचार करण्याचा प्रयत्न करतात आणि कवि तें मंगल त्याच्याच अनिर्वचनीय सौंदर्यमूर्तीच्या द्वारें लोकांसाठीं प्रकट करीत असतात.

---

महत् साहित्य भोगाच्या लोभापासून, सौंदर्याच्या आसक्तीपासून, चित्ताचा नित्याच्या गरजांच्या दंडधाऱ्यांपासून उद्धार करितें. रावणाच्या घरीं सीता लोभामुळें बंदी होती, तर रामाच्या घरीं सीता प्रेमामुळें मुक्त होती. तिचा सत्यप्रकाश तेथेंच प्रकट झाला होता. प्रेमाजवळ देहाचें अपूर्व रूप प्रकट होतें, लोभापाशीं त्याचें स्थूल मांस दिसून येतें. —रवीन्द्रनाथ ठाकूर

[आचार्य भागवत यांच्या 'जीवन आणि साहित्य' यांमधील 'रवीन्द्रदर्शनामधून']








प्रा. रा. भि. जोशी

# कला-निष्ठा आणि जीवन-निष्ठा

इंदूरच्या महाराष्ट्र साहित्यसभेच्या शारदोत्सवाचे अध्यक्ष ह्या नात्यानें श्री. वि स. खांडेकर ह्यांनी ता.१४ फेब्रुवारी रोजीं एक भाषण केलें. त्यांत त्यांनी १८७५ पासून आजतागायतच्या मराठी साहित्याचें सिंहावलोकन केलें आहे. त्यासाठीं त्यांनीं बराच विचार केलेलाहि दिसतो. अर्थातच अशा विवेचनांत मतभेदाला जागा असणारच. त्याप्रमाणें ह्या त्यांच्या भाषणांत देखील अशीं पुष्कळ विधानें आहेत कीं, ज्यापैकीं अनेकांसंबंधीं प्रत्येक चार-दोन परिच्छेद तरी लिहितां येतील. तथापि त्या सर्वांचा परामर्श न घेतां त्यांतून जे एक-दोन महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात त्यांचीच चर्चा येथें प्रस्तुत आहे.

विवेचनाच्या सोयीसाठीं, श्री. खांडेकरांनीं आधुनिक मराठी वाङ्मयेतिहासाचें १८७५–९५, १८९५–१९२०, १९२०–३९ आणि १९३९ ते आजतागायत—असे चार कालखंड पाडले आहेत. आणि त्यांत १९२० हें वर्ष वाङ्मयप्रवाहाचें वळण किंवा स्वरूप बदलणारें वर्ष कसें आहे तें दाखविलें आहे. १९२० नंतर वाङ्मयांत पडलेल्या फरका-संबंधीं त्यांनीं जी मीमांसा केली आहे तिचाच ह्या लेखांत विचार येणार आहे.

## खांडेकरांच्या चर्चेंतील विसंगति व अस्पष्टता

१९२० पूर्वीच्या आणि नंतरच्या मराठी साहित्यामधला फरक सांगतांना श्री. खांडेकर म्हणतात कीं, १९२० पूर्वीच्या वाङ्मयांत जी निष्ठा होती ती पुढल्या वाङ्मयांत राहिली नाहीं. ही निष्ठा विविध होती. एक कलाविषयक आणि [दु]सरी जीवनविषयक. कलाविषयक निष्ठेचें [स्व]रूपहि द्विविध आहे. एक, आपली कलाकृति [श]क्य तितकी निर्दोषच नव्हे तर सुंदर व्हावी म्हणून पडतील ते श्रम करण्यासाठीं लागणारी कलाकृति-विषयक निष्ठा; आणि दुसरी, कलानिर्मिति किंवा साहित्यनिर्मिति हें भाडोत्री काम नसून ती आत्माविष्काराची, आत्मविकासाची एक साधना आहे अशी साहित्यहेतुविषयक निष्ठा. कला किंवा साहित्यविषयक निष्ठा यांच्या या विविध स्वरूपाची श्री. खांडेकरांना जाणीव आहे. पण त्यासंबंधीं त्यांनीं जी चर्चा केली आहे तींत मात्र विसंगति आणि अस्पष्टता आली आहे.

आपली कलाकृति शक्य तितकी सुंदर व्हावी म्हणून पडतील ते श्रम करण्याची तयारी १९२० पूर्वीच्या काळांत दिसत असे, तशी पुढें दिसेनाशी झाली असें ते म्हणतात; आणि त्याबरोबरच ह्या पुढल्या काळांत बहिरंगाकडे, ठाकठिकीकडे अधिक लक्ष लागलें असेंहि ते सांगतात. आणि ही गोष्ट खरीहि आहे. कथा, कादंबरी आणि कविता ह्यांच्या रचनेची ठाकठिकी, रचनेचे विविध प्रकार १९२० नंतरच्या काळांतच विशेषपणें आले. कथारचनेच्या विविध प्रकारांचे प्रयोग करण्यांत तर खुद्द श्री. खांडेकरांचाच फार मोठा हात आहे. आणि प्रा. फडक्यांची कामगिरी तर सर्वश्रुतच आहे.

ह्या काळांत बहिरंगावर भर दिला गेला आणि अंतरंगाची मात्र उपेक्षा झाली हें श्री. खांडेकरांचें म्हणणेंहि तितकें निर्विवाद नाहीं. मराठी लघुकथेला भावोत्कटता देण्याचें काम श्री. ''दिवाकर कृष्णां''–नीं १९२० नंतरच्या काळांतच केलें. वरेरकर–खांडेकरांच्या कादंबऱ्यांच्या विषयांत जें नावीन्य दिसतें तें याच काळांतलें आहे. स्वभाव–चित्रणा-साठीं मनोव्यापारांत खोल शिरण्याचा प्रयत्न कर-णाऱ्या पु. य. देशपांड्यांच्या कादंबऱ्या याच काळांतल्या आहेत. मध्यम वर्गांतल्या तरुणींचें








कुचंबलेलें जीवन पूर्वी कोणींहि केलें नसेल इतकें धीटपणें उघड करणारें " विभावरी शिरूरकरां "चें वाङ्मय यांच काळांतलें आहे. आणि मर्ढेकरांची " रात्रीचा दिवस " ही अगदीं वेगळ्या स्वरूपाची-अंतर्बाह्य वेगळ्या स्वरूपाची कादंबरीहि ह्याच काल-खंडांतली आहे.

वैयक्तिक विचार-भावनांना वाव देणारा " गुज-गोष्टी " हा वाङ्मयप्रकार यांच काळांत प्रकट झाला त्यांतहि फडके-काणेकरांबरोबर खांडेकरांचा हिस्सा आहेच. आणि नाट्यछटा हा वाङ्मयप्रकार तर आला आणि गेलाहि याच काळांत.

व्यापक सामाजिक आशय असलेल्या डॉ. केत-करांच्या कादंबऱ्या आणि तात्त्विक-सामाजिक-नैतिक चर्चात्मक वा. म. जोश्यांच्या कादंबऱ्याहि याच काळांत येतात. पण श्री. वि. स. खांडेकर त्या अपवाद समजूं इच्छितात म्हणून सोडून देऊं.

ह्याउलट कल्पकतेनें खचलेली पण संयमाचा अभाव असलेली अशी कितीतरी रचना १९२० च्या पूर्वी दाखवतां येईल.

अर्थात् अशा तऱ्हेचें कोष्टक रचणें बरोबर नाहीं हें मला समजतें. श्री. खांडेकरांचा आशय असा आहे कीं, १९२० पूर्वीच्या काळांत ह. ना. आपटे, केशवसुत इत्यादिकांचें वाङ्मय जसें प्रभावी ठरलें आणि त्यानें जसा महाराष्ट्रीय मनावर खोल ठसा उठवला तशा योग्यतेचें वाङ्मय १९२० नंतरच्या काळांत निर्माण झालें नाहीं. पण आपला हा आशय सांगतांना त्यांनीं १९२० नंतरच्या लेखकांवर जो बहिर्मुखतेचा आरोप केला आहे ( —बहिर्मुखता हा शब्द ते बहिरंगावर भर देणें ह्या अर्थी वापरतात असें दिसतें— ) तो मला योग्य वाटत नाहीं. कारण ह्या काळांत बहिरंगाकडे जसें लक्ष दिलें गेलें तसेंच अंतरंगांतहि बरीच नवीन भर पडली.

## १९२० नंतरचीं विविध आंदोलनें

१९२० नंतरच्या काळांत आणि विशेषतः गेल्या दहा पंधरा वर्षांत जी निष्ठा खरोखर ढासळली ती जीवननिष्ठा. आणि तेंहि श्री. खांडेकरांनीं सांगितलें आहे. पण ती निष्ठा कां गेली याची त्यांनीं जी मीमांसा केली आहे तींतहि शैथिल्य आणि वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष केलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, महाराष्ट्राच्या ज्या मध्यम-वर्गांतून ह्या कालखंडांतले कलावंत निर्माण झाले त्यांच्या प्रगतिशून्य झालेल्या जीवनाचें तें प्रतिबिंब होतें. " इंग्रजांचें राज्य महाराष्ट्रांत स्थापन झाल्यापासून तब्बल एक शतक आमचा मध्यमवर्ग एका नव्या दिशेनें विकास पावत होता. या विकासांत जशीं मोठीं वैगुण्यें होतीं तशीं प्रभावी वैशिष्ट्येंहि होतीं. हा विकास लोकमान्य टिळकांच्या मृत्यूबरोबर थांबला. रशियांतली राज्यक्रांति (१९१७), टिळकांचा मृत्यु (१९२०) व असहकारितेच्या रूपानें भार-तांत उदय पावलेला गांधीवाद (१९२१) या घटना जवळजवळ एका वेळीं घडल्या. पण त्यांचें मर्म...... महाराष्ट्रांतल्या मध्यमवर्गाला आकलन करतां आलें नाहीं. " म्हणून आपल्या साहित्याला त्यापुढल्या काळांत अवकळा आली असा त्यांचा अभिप्राय दिसतो. इंग्रजी राज्य स्थापन झाल्यापासून महाराष्ट्रीय मध्यमवर्गाचा जो विकास होत होता त्याचीं वैशिष्ट्यें आणि वैगुण्यें कोणतीं तें श्री. खांडेकरांनीं सांगितलें नाहीं. तसेंच, लोकमान्य टिळकांच्या मृत्यूबरोबर हा त्यांचा विकास थांबला ह्या विधानामुळें अशी समजूत होण्याचा संभव आहे कीं, लो. टिळक महाराष्ट्रांतल्या मध्यमवर्गाचें बोट धरून त्याला विकासाच्या वाटेनें नेत होते, पण १९२० मध्यें त्यांचें बोट सुटल्यामुळें हा समाज जागच्या जागींच थांबला ! पांढरपेशा महाराष्ट्रीय समाजाच्या मनावर लो. टिळकांची पकड होती हें जरी खरें असलें तरी ते त्याला विकासाच्या मार्गानें नेत होते असें म्हणणें—निदान सामाजिक बाबतींत तरी—वस्तुस्थितीला सोडून होईल. राजकीय क्षेत्रांत मात्र जनतेचा राष्ट्रीय अहंभाव कायम राहून राजकीय हक्कांविषयीं त्यांच्या ठिकाणीं जागृति उत्पन्न व्हावी हें कार्य ते करीत होते. त्यांच्या मृत्यू-नंतर महाराष्ट्रांत तें कार्य थांबलें असें श्री. खांडे-करांना म्हणावयाचें आहे काय ? राजकीय क्षेत्रांतलें लोकमान्य टिळकांचें कार्य गांधीजींनीं पुढें नेलें कीं नाहीं यासंबंधीं गायकवाडवाड्यांत आणि त्याच्या परिसरांत संशय असेल; पण गांधीजींनीं प्रदर्शित केलेल्या राजकीय आंदोलनापासून महाराष्ट्राचा








मध्यमवर्ग अलिप्त राहिला नाहीं असें त्या चळवळीच्या इतर इतिहासतज्ज्ञांचें मत आहे. टिळकांचे समकालीन अशा गंगाधरराव देशपांडे, लोकनायक अणे, खाडिलकर, शिवरामपंत परांजपे यांच्यापासून शाळेंतल्या पोरांपर्यंत आणि शिरोळ्यापासून नागपूरपर्यंत महाराष्ट्रांतले लोक ह्या आंदोलनांत होते. गांधीवादाचें मर्म महाराष्ट्रीयांना आकलन झालें नाहीं म्हणावें तर आचार्य विनोबा भावे, देव, कालेलकर, धर्माधिकारी, जावडेकर, भागवत असे महाराष्ट्रीय गांधीवादाच्या मीमांसकांत अग्रपंक्तींत आहेत. आणि अप्पासाहेब पटवर्धन, सानेगुरुजी, प्रेमाबाई कंटक यांसारखी निस्सीम श्रद्धावान् कार्यकर्ती माणसेंहि त्या पंथांत आहेत. अर्थात् खांडेकरांच्या मतें यांनाहि गांधीवादाच्या मर्माचें आकलन झालें नसणें शक्य आहे.

रशियन क्रान्तीचा संदेश आपल्या देशांत आणून पोंचविणाऱ्यांत तर महाराष्ट्रीय सदैव अग्रभागींच राहिले आहेत. मीरतकटांत गोंवले गेलेल्यांची यादी किंवा या चळवळींतले आतांपर्यंतचे आणि आजचेहि कार्यकर्ते ह्यांच्याकडे नुसता दृष्टिक्षेप केला तरी त्यांत महाराष्ट्रीयांचें स्थान प्रमुख आहे कीं नाहीं तें दिसून येईल. त्यांनाहि रशियन क्रांतीचें मर्म कळलें नाहीं असें श्री. खांडेकर म्हणूं शकतील. पण निदान एवढी गोष्ट खरी कीं, गांधीवादाच्या आणि साम्यवादाच्या पुरस्कर्त्यांत जे महाराष्ट्रीय आहेत ते सगळे, ज्या महाराष्ट्रीय मध्यमवर्गांतून लेखक निर्माण होतात, त्याच वर्गांतले आहेत. १९२० पूर्वीच्या सामाजिक, राजकीय विचारप्रणालींचें त्या वर्गाला त्यावेळीं जितकें आकलन झालें असेल तितकेंच ह्या नवीन विचारप्रणालींचें झालें असेल असें मानावयाला प्रत्यवाय नाहीं.

## १९२०नंतरचें वाङ्मय प्रभावशाली कां नाहीं?

तरी देखील ह्या कालखंडांतलें वाङ्मय पूर्वीच्या-सारखें प्रगाढ, प्रभावशाली वाटत नाहीं ही गोष्ट राहतेच. त्याची मीमांसा करणें साहित्यनिर्मितीशीं संबद्ध पण साहित्यक्षेत्राबाहेरचें काम आहे. ह्या परिस्थितीचें मूळ सामाजिक-राजकीय-आर्थिक असें संमिश्र आहे. "वाङ्मय ही शुद्ध सामाजिक किंवा केवळ वैयक्तिक अशी अनुभूति नाहीं. ती जितकी सामाजिक तितकीच वैयक्तिक अशी कला आहे" असें श्री. खांडेकर म्हणतात. हें त्यांचें म्हणणें नीट मांडलें गेलें नसलें तरी, साहित्य ही वस्तु सामाजिक परिस्थिति आणि तीसंबंधींची व्यक्तींची प्रतिक्रिया यांच्या परस्पर संघर्षांतून किंवा संवादांतून निर्माण होणारी वस्तु आहे, हें सत्य त्या विधानांत आहे. त्यांपैकीं सामाजिक बाजूचा सविस्तर विचार केल्याखेरीज आजच्या परिस्थितीचा अर्थ कळणार नाहीं.

## १९२० पूर्वीची सुरक्षितता व स्वस्थता

१९१८ ते २० च्या काळांत एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट घडली ती अशी कीं, पूर्वीच्या जगाची उलटापालट होऊन जगाची बैठकच विसकटली. आणि ती अजूनहि नीट बसली नाहीं. इंग्रजांचें राज्य इथें स्थापन झाल्यापासून पहिलें महायुद्ध होईपर्यंत आपण एक प्रकारच्या स्वस्थ आणि सुरक्षित जगांत होतों. आपण नाना प्रकारच्या राजकीय आणि सामाजिक चळवळी करीत असलों तरी त्यामुळें समाजाची घडी विघडून जाईल, त्याचा पायाच उखडून जाईल, इतक्या त्या उत्पातकारक होतील अशी कल्पना नसे. आपला देश अमेरिकेसारखा स्वतंत्र होईल असें जरी लोकहितवादींना वाटलें असलें तरी पहिलें महायुद्ध होऊन जाईपर्यंत वसाहतींचें स्वराज्य आपल्याला पुरेसें वाटत होतें. १९२६ सालीं सुध्दां इतिहासाचार्य राजवाड्यांना देखील इंग्रजांचें राज्य इथें आणखी दीडशें वर्षें तरी राहील असें वाटत होतें. यावरून आपली सुरक्षिततेची आणि स्वस्थतेची भावना १९२० पूर्वी किती दृढ असली पाहिजे याची कल्पना येईल. सामाजिक बाबतींत बेंथॅम्-मिलचा सर्वहितवाद पर्याप्त वाटत होता. हिंदी लोकांना मोठ्या पगाराच्या सरकारी नोकऱ्या मिळत नसल्या आणि व्यापार-धंद्यांत महाराष्ट्रीय लोक मागें असले तरी एकंदरींत, महत्त्वाकांक्षा ठेऊन उद्योग करणाऱ्याला वैयक्तिक उन्नति साधणें अशक्य किंवा दुरापास्तहि नव्हतें. आणि आपला पोटाचा व्यवसाय सांभाळून साहित्यसेवा, समाजसेवा वगैरे वैयक्तिक कक्षेबाहेरची किंचित् व्यापक स्वरूपाचीं कामें करून आध्यात्मिक समाधान हि मिळवतां येत असे. आणि एकदां वसाहतींचें










स्वराज्य मिळालें म्हणजे उरलेसुरले प्रश्नहि सुटणार होते.

### जीवनमूल्यांतील अलीकडील उलथापालथ

१९२० नंतर ही परिस्थिति हळूंहळूं पण निश्चितपणें, निर्घृणपणें पालटत गेली. पहिल्या महायुद्धांत जर्मनीचा कायसर ब्रिटिशांना खडे चारील अशी कांहीं ब्रिटिशद्वेष्ट्यांना मनांतून आशा वाटत होती (तशीच आशा त्यांना दुसऱ्या महायुद्धांत हिटलरसंबंधींहि वाटली होती). पण प्रकार उलटा होऊन कायसरलाच हॉलंडमध्यें डूर्नला पळून जावें लागलें. ऑस्ट्रियन साम्राज्याचीं आणि तुर्की साम्राज्याचीं शकलें झालीं. पोलंडपासून पॅसिफिकपर्यंतच्या प्रदेशाचा अप्रतिहत स्वामी रशियाचा झार–बादशहा पांचव्या जॉर्जचा नातेवाईक–बंदुकीच्या फैरीला सहकुटुंब बळी पडला आणि रशियावर लोहार–चांभारांचें (किंवा आपल्या भार्षेत बोलायचें तर तेल्या–तांबोळ्यांचें) राज्य झालें. त्यानंतर वीस वर्षांच्या आंतच जर्मनी–इटली–जपानचा कधीं नव्हता एवढा सामर्थ्यविस्तार झालेला दिसला आणि दुसऱ्या महायुद्धांत नाहींसाहि झाला. या नव्या दिव्यांतून ब्रिटिश राष्ट्र बचावलें पण त्याचें पूर्वीचें महत्त्व राहिलें नाहीं. युद्ध समाप्त होत असतांनाच साम्राज्य बंधनें शिथिल होत चाललीं. मध्य युरोपांतून फॅशिझम–नात्सीझम् गेला; पण पूर्वयुरोपांत साम्यवादच फॅशिस्ट झाला. भांडवलशाही राष्ट्रांत व्यक्तिस्वातंत्र्य कायम राहिलें पण तें उपाशीं मरण्याचें स्वातंत्र्य ठरूं लागलें. आपल्याला स्वातंत्र्य मिळालें; पण म्हणजे खरोखर काय झालें हें आपल्याला अजून नीट कळलें नाहीं.

एकूण ह्या पंचवीस वर्षांत राजकीय, सामाजिक, आर्थिक, नैतिक विचारांत, किंबहुना जीवनमूल्यांतच इतकी प्रचंड उलथापालथ झाली कीं, कशावर विश्वास ठेवावा आणि ठेवूं नये, कोणत्या मार्गानें गेलें असतां व्यक्तीचें आणि समाजाचें परस्परविरोध न येतां हित साधेल हें कळेनासें झालें. माणसानें निर्माण केलेल्या शक्ती त्याच्या आटोक्याबाहेर गेलेल्या दिसूं लागल्या. सबंध जगाच्या जीवनाचे मूलबंधच उच्छिन्न झाल्यासारखे झाले! आणि 'किं कर्म किमकर्म' याविषयीं गाढ शंका उत्पन्न झाली!

ह्याचा परिणाम सर्वच देशांतल्या विचारवंतांवर आणि वाङ्मयावर कमी–अधिक प्रमाणांत झाला आहे. आल्डस हक्स्ली आणि क्रिस्टॉफर ईशरवुड ह्यांच्यासारखें अव्वल दर्जाचे इंग्रज ललित लेखक आज वेदान्ताकडे वळले आहेत. सॉमरसेट मॉम–सारख्या वयोवृद्ध वाङ्मयसेवकानें–ज्यानें कलेकरतां कला ह्याच तत्त्वानुसार सर्व लेखन केलें त्यानें–आपल्या एका अमेरिकन नायकाला सत्यशोधनार्थ भरतभूमींत पाठवलें आहे! जोडसारख्या विचारवंताला जीवन निरुद्देश झाल्याचें आढळून येत आहे. आणि खुद्द अमेरिकेंत अमेरिका हा देश कलावंतांना आणि साहित्यिकांना वसतियोग्य वाटत नाहींसा झाला आहे.

### साहित्यिक आणि प्रचारक यांच्या भूमिका

ज्यांचें आजपर्यंतचें सर्व राष्ट्रीय जीवनच परावलंबी होतें त्या आपल्यांतहि ह्यापेक्षां वेगळी स्थिति नाहीं. आपला बहुसंख्य लेखकवर्ग कोणत्याहि "वादां"त नसलेला असा आहे. कोणत्याहि एका "वादां"त शिरल्यानें आपण उद्दिष्टस्थानीं निश्चित पोंचूं शकूं अशी त्याला खात्री वाटत नाहीं; कदाचित् त्यानें विचार केला नसेल; कदाचित् त्याची तशी पात्रता नसेल. श्री. खांडेकरांचें म्हणणें असें दिसतें कीं, विविध सामाजिक संघर्षांत भाग घेतल्यानें किंवा त्याच्याशीं समरस झाल्यानें वाङ्मय श्रेष्ठ होतें. पण असा अनुभव नाहीं. साम्यवादी तत्त्वज्ञान आणि कार्यपद्धति ह्यांविषयीं निस्सीम श्रद्धा असूनसुद्धां क्रान्तीनंतरच्या काळांत रशियांत चांगलें वाङ्मय निर्माण झालें नाहीं. आपल्या इकडे साम्यवादी आणि गांधीवादी कार्यांत प्रत्यक्ष भाग घेणाऱ्यांनीं जें कांहीं थोडें ललित साहित्य निर्माण केलें आहे तें वाङ्मयदृष्ट्या श्रेष्ठ दर्जाचें झालें आहे असें म्हणतां येत नाहीं. या लेखकांमध्यें प्रचारकाला लागणारा आवेश आणि आत्मीयता असली तरी साहित्यिकाला लागणारी अलिप्तता आणि सम्यग्दृष्टि नसल्यामुळें त्यांच्या हातून श्रेष्ठ कृति निर्माण होऊं शकली नाहीं. साम्यवादी दृष्टींतून दिसणारे कांहीं प्रश्न










( विशेषतः आर्थिक विषमतेचे ) घेऊन वरेरकर–खांडेकरांनीं कांहीं कादंबऱ्या लिहिल्या. पण या प्रश्नांच्या वास्तविक स्वरूपाचें यथार्थ आकलन न झाल्यामुळें आणि मानवी जीवनाच्या द्वारां तें नीट व्यक्त न करतां आल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्या एक प्रकारें ' रोमँण्टिक ' कादंबऱ्याच झाल्या. गांधीवादी लेखकांपैकीं साने गुरुजी अतीव भावनाप्रवण असल्यामुळें त्यांचा ध्येयवाद पौगंडदशेंतच राहिला आणि प्रेमाबाई कंटकांचा ध्येयवाद कार्यकर्तीचा प्रचारवाद बनला.

हें असें होतें ह्याचें कारण साहित्यिकाची भूमिका आणि प्रचारकाची भूमिका यांत मुळांतच फरक आहे. अमुक एका सामाजिक–राजकीय विचारप्रणालीविषयीं श्रद्धा असणें किंवा नसणें ह्याकडे साहित्यिकाचें लक्ष नसून तें मानवी जीवनाकडे असतें. जीवनच जगण्यासारखें वाटतें किंवा नाहीं ! हा प्रश्न आहे. आज सगळीकडेच जीवन असें विचित्र झालें आहे कीं तें जगण्याविषयीं उत्कट उल्हास नाहीं किंवा त्यासंबंधीं उत्कट उद्वेग नाहीं. जणूं जीवनांतला रसच गेला आहे ! सर्वत्र औदासीन्याची दाट छाया पसरली आहे.

## उद्ध्वस्त व अगतिक झालेलें जीवन

आपल्या प्रज्ञाचक्षूंच्या साहाय्यानें या अंधकारमय अराजकाच्या पलीकडे पाहूं शकणारा म्हणजेच जीवनाविषयीं श्रद्धा उत्पन्न करूं शकणारा लेखक आज हवा आहे. साहित्यनिर्मिति हा ज्याचा केवळ एक अंश आहे अशा व्यापकतर जीवनाविषयीं निष्ठा उत्पन्न होईल अशी परिस्थिति निर्माण करणें ललित लेखकाचें काम नाहीं. तें तत्त्वचिंतकांचें आणि सत्ताधाऱ्यांचें काम आहे. आपल्याकडले कांहीं मीमांसक ते करीतहि आहेत. ज्या सूर्याचे किरण दिसूं लागले आहेत त्याचें ''उदु त्यं जातवेदसं'' इत्यादि ऋचांनीं सौरसूक्त गाणारे कवि निघतील. पण जो सूर्य उगवलाच नाहीं किंबहुना ज्याच्या उपश्च्छटाहि दृगोचर होत नाहींत त्याचें दर्शन घेऊं शकणारा द्रष्टा वेगळ्या जातीचा पुरुष असतो.

ललित लेखकानें हें करूं नये किंवा तो करणार नाहीं असें नाहीं. ललित लेखक हा आपल्या भोंवतालचें जीवन त्याला जसें जाणवतें तसें चित्रित करतो. त्यांतली अगतिकता, उद्ध्वस्तता, व्यर्थता हीं तो व्यक्त करील. मर्ढेकरांच्या कवितेंत आपल्याला ह्याचा प्रत्यय येतोहि. इतरहि कांहीं लेखकांच्या कविता-कथांतून तो येतो. पण त्यानें हें करून तत्त्वदर्शनहि करावें असें म्हणणें त्याच्यावर त्याचा नसलेला बोजा देण्यासारखें आहे. टॉलस्टॉय–सारखा एखादा तत्त्वदर्शी ललित लेखकहि दुहेरी भूमिका करणार नाहीं असें नाहीं. पण सर्व ललित लेखकांनीं असें करावें असें म्हणणें म्हणजे जो त्याचा धर्म नाहीं तो त्यानें आचरावा असें म्हणण्यासारखें होईल. तो तो आचरीत नाहीं म्हणून दुःख करणें साहित्यिक आणि समाज-सुधारक ह्यांच्या भूमिकांची गल्लत करणें आहे. साहित्याची मीमांसा करतांना त्यामागल्या व्यापक भूमिकेचा विचार अवश्य व्हावा. पण त्या दोहोंतली भिन्नताहि दृष्टीआड होऊं देतां उपयोगी नाहीं.

---

परिस्थितीच्या पाषाणावर सत्त्वनिष्ठेच्या पोलादाचा आघात करून प्रकाशाची दिव्य ठिणगी पाडणारीं पोलादी मनेंच क्रांतिकार्यांत उपयोगी पडणारीं असतात. त्यांना फक्त आपल्या अंगच्या दिव्य तेजाचा उपयोग कसा करावा, आपल्या किरणांचें सहकार्य वा केंद्रीकरण कसें साधावें, एवढेंच क्रांतिकारकानें दाखवून द्यावयाचें असतें....... प्रत्येक मानवाच्या अंगीं परिस्थितीवर मात करण्याचें हें सामर्थ्य येऊं शकतें, ही श्रद्धा क्रांतिकारकाला प्रयत्न करण्यास उद्युक्त करीत असते. हीच मानवाच्या मनांतील आत्मप्रेरणा होय.

—आचार्य जावडेकर, ' पुरोगामी साहित्य ' पा. २१–२२








श्री. शंकरराव देव

# गांधीवाद्यांचें कर्तव्य

नवभारताच्या मार्चच्या अंकांत 'गांधीवादाचें भवितव्य' हा आचार्य जावडेकरांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. प्रस्तुतचा लेख या लेखाला उत्तर म्हणून लिहिलेला नाहीं. तो वाचून जे विचार सुचले, ते या लेखांत व्यक्त केले आहेत. गांधीजींच्या सिद्धान्तावर श्रद्धा ठेवणाऱ्या कार्यकर्त्यांची एखादी संघटना असावी किंवा नसावी याविषयीं गांधीजी हयात असतांनाच चर्चा सुरू होती. ३० जानेवारी १९४८ ला त्यांचा खून झाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं या कार्यकर्त्यांचें सेवाग्रामला एक संमेलन भरलें व त्यांत 'सर्वोदय समाज' नांवाची एक सैल (loose) संघटना स्थापावी असें ठरलें. या संघटनेला कोणतें नांव द्यावें या बाबतींत जमलेल्या मंडळींत उदंड चर्चा झाली. पुष्कळांचें मत असें होतें कीं या संघटनेच्या नांवांत गांधी हा शब्द कोणत्याही स्वरूपांत न आलेला बरा. अखेर या संघटनेसाठीं सर्वोदय समाज असें आदर्शसूचक तत्त्वप्रधान नांव पसंत करण्यांत आलें. स्वतः गांधी नेहमीं असें म्हणत कीं गांधीवाद अशी कांहीं वस्तु नाहीं व गांधीवादी अशी व्यक्ति नाहीं. याचें कारण, 'आपण कांहीं नवीन तत्त्वांचा वा विचारांचा शोध लावला आहे व तो जगापुढें मांडला आहे' असें स्वतः गांधीजींना कधींही वाटलें नाहीं. सत्य व अहिंसा हीं सनातन तत्त्वें असून आपण फक्त देश-काल-परिस्थितीला सुसंगत अशा रीतीनें त्यांचें व्यावहारिक स्वरूप जगापुढें मांडीत आहोंत असें ते मानीत. याच अर्थानें ते स्वतःला सनातनी म्हणवून घेत.

## गांधीवादी व कॉंग्रेसवादी हे एक नव्हेत.

मानवी व्यवहार सत्य व अहिंसेच्या तत्त्वानुसार चालला पाहिजे असें गांधीजींचें मत असल्यामुळें वैयक्तिक आणि सामाजिक अगर सांघिक जीवनांत जें परिवर्तन घडवून आणावयाचें तें सक्तीनें वा दंडानें घडवून न आणतां हृदयपालट करून घडवून आणावें असा त्यांचा आग्रह होता तो स्वाभाविकच होता. अर्थात् त्यासाठीं जरूर तर आत्मत्यागाच्या व क्लेशाच्या मार्गाचा अवलंब करावा हें त्यांना मान्य होतें. त्यालाच ते सत्याग्रह असें म्हणत. असें असल्यामुळें ज्या पद्धतींत वा संघटनेंत वैयक्तिक वा सांघिक जीवनांत परिवर्तन घडवून आणण्यासाठीं सक्तीचा अगर दंडाचा उपयोग केला जातो त्यांत गांधीवादी माणसानें सामील होऊं नये हें सहजच सिद्ध होतें. अनुशासनावर आधारलेला राजकीय पक्ष वा दंडावर उभारलेली शासनपद्धति यांमध्यें गांधीवादी हा सदस्य अगर अधिकारी होऊं शकत नाहीं; कारण ही गोष्ट त्यानें स्वीकारलेल्या मूलभूत तत्त्वांशीं विसंगत आहे. पण जो न्याय गांधीवाद्याला लागू तो कॉंग्रेसवाद्याला लागू नाहीं; कारण राष्ट्रसभा संपूर्णार्थानें गांधीवादी केव्हांच नव्हती. एकच उदाहरण द्यावयाचें तर युद्धाचें देतां येईल. गांधीजींची युद्धाविषयींची अहिंसात्मक भूमिका कॉंग्रेसनें कधीं मान्य केली नव्हती. त्याचप्रमाणें सत्ता काबीज करणें हें कॉंग्रेसचें प्रथमपासून प्रत्यक्ष (direct) ध्येय होतें व १९३७ सालीं कॉंग्रेसनें गांधीजींच्या सल्ल्यानें व आशीर्वादानें प्रांतिक स्वायत्ततेचा स्वीकार करून प्रांतिक मंत्रिमंडळें बनविलीं होतीं. १९४७ सालीं मध्यवर्ती सत्ताही तिनें ताब्यांत घेतली. जेव्हां कॉंग्रेसनें कायदेमंडळांतील काम हें आपल्या कार्यक्रमाचें एक महत्त्वाचें व अविभाज्य असें अंग बनविलें तेव्हांच ही गोष्ट अपरिहार्य झाली होती.

म्हणून गांधीवादी व कॉंग्रेसवादी हे पर्यायवाचक शब्द होऊं शकत नाहीत. कारण या दोन शब्दांनी सूचित होणाऱ्या व्यक्ती वा विचारसरणी एक नाहीत. (—महाराष्ट्रांत या दोन व्यक्तींमधील वा विचारसरणींमधील भेद अथवा वेगळेपणा जनतेला आग्रहपूर्वक समजावून सांगून महाराष्ट्रीय जनतेची कॉंग्रेसनिष्ठा जागृत व दृढ करून कॉंग्रेस-संघटना मजबूत करण्याचें फार मोठें श्रेय श्री. शंकरराव जावडेकर यांना आहे.—) गांधीवाद हा कॉंग्रेसचा आदर्श आहे हें खरें; पण तिनें त्याचा आज संपूर्ण स्वीकार केलेला नाहीं. कॉंग्रेस जेव्हां स्वातंत्र्यासाठीं इंग्रजांशीं लढत होती तेव्हां आपल्या लढ्याचें तिनें अहिंसा हें साधन केलें होतें. साध्य म्हणून तिनें त्याचा केव्हांही स्वीकार केला नव्हता. राजकीय सत्ता आपल्या हातांत आली तर अंतर्गत कारभारांत अगर परकीय आक्रमणाविरुद्ध आपण लष्कर व पोलिस यांचा उपयोग करणार नाहीं अशी कॉंग्रेसची कधींही प्रतिज्ञा नव्हती. सत्ता व तिच्याशीं संबद्ध अशी अपरिहार्य हिंसा यांचा सद्यःकालीं अनिवार्य म्हणून उपयोग करून अहिंसात्मक लोकशाहीप्रधान समाज स्थापन करणें हें कॉंग्रेसनें आपलें पुढील ध्येय ठरविलें आहे. कॉंग्रेसच्या या कामांत गांधीवादी तिला काय व कशी मदत करूं शकतील हा हिंदी राजकारणांतील एक अत्यंत महत्त्वाचा कूट प्रश्न आहे.

## गांधीवाद्यांपुढील महत्त्वाचा प्रश्न.

राज्ययंत्र आपल्या ताब्यांत घेऊन जनतेचें हित करण्याचें जें काम कॉंग्रेसनें स्वीकारलें आहे त्यांत पाशवी बलाचा यत्किंचितही उपयोग न करतां केवल नैतिक बलानेंच सामाजिक वा राजकीय परिवर्तन घडवून आणावयाचें असें ज्यांचें व्रत आहे ते गांधीवादी प्रत्यक्ष भाग घेऊं शकत नाहींत हें उघड आहे. तथापि याचा अर्थ असा नव्हे कीं गांधीवाद्यांचा राजकारणाशीं मुळींच संबंध येणार नाहीं. जीवनाचा सर्व व्यवहार अहिंसेनें व सत्यानें चालविणें हा गांधीवादाचा हेतु आहे आणि याला राजकीय व्यवहारहि अपवाद नाहीं, हें त्याचें खास वैशिष्ट्य आहे. तेव्हां "राजकीय व्यवहारांत अहिंसावृत्तीचा प्रभाव अधिकाधिक प्रमाणांत कसा पडत जाईल, आणि राजकीय अहिंसेचा विकास एकसारखा कसा होत राहील याची जे काळजी वाहतात, त्या अहिंसेचा प्रभाव पाडण्यासाठीं जे नित्य प्रयत्न करतात आणि जनतेचीं अंतःकरणें अनासक्त सेवेनें व प्रेमानें वश करून जे जनतेला आपली गाऱ्हाणीं दूर करून घेण्याचे अहिंसेचे मार्ग दाखवून देतात व आचरून दाखवितात त्यांनाच गांधीवादी म्हणतां येईल" हें श्री. शंकररावांचें म्हणणें कोणीही खरा गांधीवादी मान्यच करील. त्याचप्रमाणें असें करतांना राजकारणाशीं संबंध अपरिहार्य आहे हेंही गांधीवादी नाकबूल करणार नाहीं. गांधीवादी हा राज्ययंत्राचा एक भाग होऊं शकत नाहीं हें जितकें सिद्ध आहे, तितकें तो एकाद्या राजकीय पक्षाचाहि घटक होऊं शकत नाहीं हें सिद्ध नाहीं. कारण सत्ताधारी म्हणून, लष्कर अगर पोलीस यांचा उपयोग करणारा पक्ष जोंपर्यंत आपल्या अंतर्गत व्यवहारांत पक्षविरोध अगर पक्षद्रोह यांबद्दल सभासदत्व रद्द करण्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याही शासनाचा उपयोग करीत नाहीं तोंपर्यंत गांधीवाद्यानें अशा पक्षाचे सभासद व्हावें किंवा नाहीं हा एक विचारार्ह प्रश्न आहे. गांधीजींनीं अहिंसेचा ध्येय म्हणून म्हणजेच सर्व कालीं व सर्व परिस्थितींत उपयोग करावयाचा असें ठरविलें असूनहि ते कॉंग्रेसचे कित्येक वर्षें सभासद होते, ही गोष्ट येथें लक्षांत घेणें जरूर आहे. १९३५ सालानंतर त्यांनीं कॉंग्रेस सोडली तरी अखेरपर्यंत ते तिचे 'मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञानी' होते. एवढेंच नव्हे तर राजकीय, सामाजिक व आर्थिक बदल घडवून आणण्याचें त्यांचें कॉंग्रेस हेंच एकमेव साधन होतें. स्वतः गांधीजी ध्येयवादी व धोरणवादी असे अहिंसावाद्यांचे दोन वर्ग करीत. राजकीय वा सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचें साधन म्हणून जगांत अहिंसेचा प्रथमच उपयोग करण्याचा प्रश्न उत्पन्न झाला असल्यामुळें राजकीय पक्ष व राज्ययंत्र यांचें एक नवीनच संघटनाशास्त्र निर्माण होणें अपरिहार्यच आहे. अनुभवानेंच हें शास्त्र बनणार असल्यामुळें त्याच्या बाबतींत कोणीहि कोणत्याही मताचा अभिनिवेशपूर्वक आग्रह न धरणें हेंच बरें.








# गांधीवाद्यांचें कर्तव्य

## गांधीवादी आणि राजकीय पक्ष

स्वतःचा असा एक स्वतंत्र राजकीय पक्ष स्थापावयाचा नाहीं पण राजकारणाशीं सतत संबंध ठेवावयाचा असें अवघड काम गांधीवाद्यांना करावयाचें आहे. देशांतील कोणत्या तरी राजकीय पक्षाशीं सहकार्य वा सहयोग करूनच गांधीवाद्यांना हें काम करावें लागेल हें अगदीं उघड आहे. अर्थात् ज्याच्याशीं हें सहकार्य करावयाचें तो पक्ष शांतिमय व लोकशाही मार्गानेंच सामाजिक व आर्थिक बदल घडवून आणण्याच्या मताचा व प्रामाणिकपणें तसा प्रयत्न करणारा असला पाहिजे हें सांगण्याची जरूरीच नाहीं. देशांत सांप्रत कॉंग्रेस, समाजवादी व साम्यवादी असे जे अखिल-भारतीय स्वरूपाचे तीन राजकीय पक्ष आहेत, त्यांत शेवटचा पक्ष वरील कसोटीला कधींही उतरणें शक्य नाहीं; म्हणून गांधीवाद्यांनीं त्यांच्याशीं सहकार्य करण्याचा प्रश्नच उत्पन्न होणार नाहीं. उरले कॉंग्रेस व समाजवादी हे दोन पक्ष. सद्यःस्थितींत यांपैकीं कोणत्या पक्षाशीं गांधीवाद्यांनीं सहकार्य केल्यास गांधीजींची आदर्श स्वराज्याची वा समाजाची कल्पना प्रत्यक्ष सृष्टींत उतरण्याची अधिकांत अधिक शक्यता आहे ? या प्रश्नाला उत्तर देण्याची व त्याप्रमाणें काम करण्याची जबाबदारी गांधीवाद्यांवर आहे व त्यावर निदान नजीकच्या काळांत तरी या देशाचें बरें-वाईट भवितव्य अवलंबून आहे, ही गोष्ट सर्वमान्य होण्यासारखी आहे.

आजच्या स्थितींत गांधीवाद्यांनीं कॉंग्रेस पक्षाची निवड करणें स्वाभाविक आहे; इतकेंच नव्हे, तर शहाणपणाचें आहे. आजची कॉंग्रेस गांधीजींची पुत्री असून तिचें पालनपोषण त्यांनींच केलें आहे. जयपूर कॉंग्रेसच्या 'संदेश' या ठरावांत कॉंग्रेसनें पुढील प्रतिज्ञा केलेली आहे : "गांधीजींच्या नेतृत्वाखालीं अनत्याचारी साधनांनीं राजकीय स्वातंत्र्य मिळविल्यानंतर आतां कॉंग्रेसला सामाजिक आणि आर्थिक स्वातंत्र्य साध्य करून घेण्यासाठीं प्रयत्न करावयाचा आहे. कारण त्या योगानेंच तमाम हिंदी जनतेला जातिधर्मनिरपेक्ष अशी उन्नति व समान संधि प्राप्त होईल." कॉंग्रेसनें आतां हें आपलें ध्येय ठरविलें आहे. पण साध्यापेक्षांहि साधनाचें महत्त्व अधिक आहे. कॉंग्रेसनें जयपूरला हिंदी जनतेला असें वचन दिलें आहे कीं नवजीवनप्रदान करणाऱ्या गांधीजींच्या संदेशाच्या अनुरोधानेंच हें साध्य प्राप्त करून घेण्याचा ती प्रयत्न करील. ही प्रतिज्ञा व हें अभिवचन साम्यवादी, समाजवादी आणि कॉंग्रेस यांच्यामधील मौलिक भेद दाखवितात. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रश्नांकडे पहाण्याची पहिल्या दोघांची दृष्टि प्राधान्यतः मार्क्सवादी आहे तर कॉंग्रेसची गांधीवादी आहे. आणि वर म्हटल्याप्रमाणें हें अगदीं स्वाभाविक आहे. कारण कॉंग्रेसची मूर्ति गांधीजींनीं बनविली असून त्यांनींच तिच्यांत प्राणप्रतिष्ठा केली आहे. जोंपर्यंत कॉंग्रेस गांधीजींचीं तत्त्वें व कार्यक्रम यांना सोडीत नाहीं व तीं प्राप्त करण्यासाठींच प्रयत्न करीत आहे, तोंपर्यंत गांधीवाद्यांनीं तिच्याशीं सहकार्य करणें हेंच अधिक श्रेयस्कर आहे. उद्यां कॉंग्रेसनें दुसरा मार्ग पत्करला तर गांधीवाद्यांना कोणत्या राजकीय पक्षाशीं सहकार्य करावयाचें याचा पुनर्विचार करावा लागेल.

शिवाय १९४७ च्या ऑगष्टमध्यें हिंदी लोकांच्या हातांत सत्ता आल्यानंतर या देशांत जी आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली व थोड्याबहुत प्रमाणांत अद्यापिही जी चालू आहे, तींत या देशांतील राज्ययंत्र चालविण्याचें जोखमीचें व अवघड काम कॉंग्रेस करीत आहे; अशा परिस्थितींत सर्व शांतिप्रिय प्रगतिशील पक्षांचें तिला सहकार्य मिळणें अत्यंत जरूर आहे. कॉंग्रेसच्या राज्यकारभारांतील गुणदोषांचें विवेचन करीत असतांना या देशांतील सर्वच पक्ष या कामांत अननुभवी आहेत व सर्वांनाच अनुभवानें शहाणपण येणार आहे; या गोष्टीचें जितकें स्मरण ठेवावयास पाहिजे तेवढें आपण ठेवीत नाहीं. आजच्या आपल्या दुःखांना जणूं कॉंग्रेस ही एकमेव जबाबदार आहे अशा भावनेनें जनता कॉंग्रेसच्या कार्याचा हिशोब घेते व सत्ताभिलाषी पक्ष तिला या बाबतींत वाममार्गावर जाण्याला प्रोत्साहन देतात.

वरील विवेचनावरून ही गोष्ट लक्षांत येईल कीं, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर एक समाजवादी धोरण स्वीकारणें नाहींतर सत्याग्रही लोकसेवासंघांत आपलें रूपांतर








करणें–एवढे दोनच मार्ग कॉंग्रेसपुढें होते असें नाहीं. तिसराही एक मार्ग मोकळा होता. आणि तो म्हणजे मिळालेल्या सत्तेचा उपयोग करून गांधीजींच्या कल्पनेंतील स्वराज्य स्थापन करणें. कॉंग्रेसनें हा तिसरा मार्ग स्वीकारणें हें स्वाभाविकच होतें; एवढेंच नव्हे तर योग्यही होतें. हा तिसरा मार्ग कॉंग्रेसनें स्वीकारला असता तिची स्थिति लोंबणाऱ्या त्रिशंकूप्रमाणें झाली असें कसें म्हणतां येईल ?

## कॉंग्रेसचें साध्य व साधन

आपल्या पासष्ट वर्षांच्या दीर्घ आयुष्यांत कालपरिस्थित्यनुरूप कॉंग्रेस सदा आपला कायापालट करीत आलेली आहे आणि ज्याप्रमाणें वृक्षाची नवीन वाढ जुन्या वाढीवरच होऊन तो उंच वाढतो त्याप्रमाणें कॉंग्रेसचा प्रत्येक नवीन कालखंड जुन्या कालखंडांतून शक्ति घेऊनच पुढें विकास पावला आहे. १८८५ ते १९०९, १९०९ ते १९२०, १९२० ते १९३७ व १९३७ ते १९४७ असे आतांपर्यंत कॉंग्रेसचे स्थूलमानानें चार कालखंड झाले असून आतां १९४७ नंतर स्वतंत्र भारतांत कॉंग्रेसचा पांचवा कालखंड सुरू झाला आहे. असें असल्यामुळें नौरोजीं, टिळक व गांधी यांनीं वाढविलेली कॉंग्रेसच आज पं. जवाहरलाल व त्यांचे साथी पुढें चालवीत आहेत. स्वातंत्र्य संपादून या देशांत तावडतोब लोकशाही राज्यपद्धति स्थापन करण्यासाठीं ज्याप्रमाणें गांधीजींनीं कॉंग्रेसचा साधन म्हणून उपयोग केला, त्याचप्रमाणें पंडितजी व त्यांचे साथी संपादिलेल्या स्वातंत्र्याचा सामाजिक व आर्थिक लोकशाही स्थापन करण्यासाठीं साधन म्हणून उपयोग करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत आहेत. सामाजिक व आर्थिक लोकशाही हेंच जर कॉंग्रेसचें ध्येय आहे तर मग ती आपलें ध्येय 'समाजवाद' आहे असें कां म्हणत नाहीं ? या प्रश्नाला उत्तर दिलें पाहिजे. तें उत्तर असें: दुर्दैवानें आज समाजवादांत राजकीय स्वातंत्र्यापेक्षां आर्थिक स्वास्थ्य वा सुरक्षितता (economic security) यावर अधिक भर असून लोकशाहीपेक्षां हुकूमशाहीची वाढ होण्याकडे कल आहे असें मानण्यास जागा आहे. हा दोष समाजवादाचा नाहीं; तर तो स्थापन करण्यासाठीं उपयोगांत आणलेल्या हिंसात्मक क्रांतीचा आहे. मानव व मानव-समाज यांच्या सर्वांगीण विकासासाठीं 'अर्था'ची आवश्यकता आहे यांत मुळींच संशय नाहीं. पण त्याचबरोबर स्वातंत्र्याची अधिक नसली तरी तितकीच जरूरी खास आहे. आणि शांतीच्या व लोकशाहीच्या साधनानेंच स्वातंत्र्य टिकूं शकेल याविषयीं कोणाचा मतभेद नाहीं आणि यदाकदाचित् असला तरी तो आमच्या भूमिकेहून मूलतःच भिन्न असल्यामुळें त्याचा विचार करण्याची आवश्यकता नाहीं. आज साध्य सर्वमान्य झालें आहे तितकें साधन झालेलें नाहीं. म्हणून समाजवादापेक्षां लोकशाही शब्दच वापरणें कॉंग्रेस पसंत करते. पण कॉंग्रेसच्या साधनाला संमति देऊन जर कोणीं 'समाजवाद' हा शब्द वापरणें पसंत केलें तर त्याला कॉंग्रेसचा विरोध असण्याचें कारण नाहीं. सर्व क्षेत्रांत संपूर्ण लोकशाही प्रस्थापित झाली म्हणजे त्यांतून अखेर सर्वोदय समाज किंवा सत्ययुग निर्माण होईल अशी श्रद्धा बाळगण्याला सध्यां हरकत नाहीं.

## वर्गविग्रहानें वर्गविरोध नष्ट होईल का ?

अर्थात् अशा प्रकारची लोकशाही व त्यांतून निर्माण होणारा सर्वोदय समाज स्थापन करणें केवळ कायदेमंडळांतून केलेल्या घटनात्मक कार्यानें (Parliamentary and Constitutional Method or Activity नें) शक्य होईल का ? या प्रश्नाचें निश्चित उत्तर देणें आज घटकेला कठिण आहे. जगामध्यें इंग्लंड हा एकच असा देश आहे कीं जेथें हा प्रयोग सुरू असून कदाचित् तो तेथें यशस्वी होण्याचा संभव आहे. पण त्याच्या मार्गांत इतक्या अडचणी आहेत कीं तेथें सुरू असलेला प्रयोग यशस्वी होईलच असें म्हणणें धाष्टर्याचें होईल. अर्थात् कायदेमंडळाचा मार्ग असफल झाला तर मग रक्तक्रांति अगर सत्याग्रह यांपैकीं एक कोणता तरी मार्ग जगाला स्वीकारावा लागेल. रक्तक्रांतिचे धोके व तिची असफलता अनुभवानें सिद्ध झाली आहे. श्री. शंकररावांनाही हा मार्ग मान्य नाहीं. सार्वत्रिक संप व सत्याग्रह हे शांततेचे मार्गच त्यांना मान्य आहेत. गांधीवाद्यांची श्रद्धा व साधना पण तीच आहे. अर्थात् सत्याग्रहांत व सर्वोदय समाजांत 'वर्ग-








कलहाच्या ' सिद्धांताला किती स्थान आहे हा प्रश्न विचारणीय आहे. सत्याग्रहाला व सर्वोदय समाजाला शेतकरी आणि कामकरी व मालक आणि मध्यमवर्ग असे समाजाचे परस्परविरोधी दोन तुकडे पाडणें पसंत नाहीं हें सांगण्याची जरूरी नाहीं. समाजाच्या दोषाला कांहीं अंशानें आपणहि जबाबदार आहोंत ही सत्याग्रह्याची भावना असते. त्याचप्रमाणें सर्वोदय समाजाच्या कल्पनेंत प्रत्येक व्यक्ति स्वतःला सुधारूं शकते या तत्त्वाला मान्यता आहे. म्हणून समाजांत सद्यःस्थितींत वर्गविरोध असला तरी तो नष्ट करण्याचा मार्ग वर्गविग्रह होय असें सत्याग्रही व सर्वोदयसमाजी मान्य करीत नाहीं. तथापि संपूर्ण लोकशाही व सर्वोदय समाज स्थापन करण्यासाठीं जरूर तर सत्याग्रहाची आवश्यकता आहे हें तत्त्व अमान्य करणें गांधीवाद्यांच्या श्रद्धेशीं विसंगत होईल. जनतेला सत्याग्रहाचें शिक्षण देणें हें त्यांच्या चित्तशुद्धीची सामाजिक साधनाच आहे.

गांधीजींच्या मार्गदर्शनाखालीं केलेली सत्याग्रहाची साधना स्वराज्यप्राप्तीसाठीं खर्च झाली आहे. १९४२ सालच्या चळवळींत लढ्याचें जें विशिष्ट तंत्र कांहीं प्रमाणांत अवलंबिण्यांत आलें त्यामुळें ही सत्याग्रही साधना स्वराज्यप्राप्तीला थोडी कमीच पडली असें म्हणणें भाग आहे. आणि त्याचे अनिष्ट परिणाम देश अद्यापही भोगीत आहे. १९४२ सालच्या 'चले जाव'च्या चळवळींत व १९४७ ऑगस्टपूर्वी व नंतर या देशांत ज्या भीषण घटना घडल्या त्यांच्यांतून एक बोध घेणें जरूर आहे. तो हा कीं आज घटकेला सार्वत्रिक संपाची वा सत्याग्रहाची भाषा बोलणें व तो करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे या देशांत अराजकाला आमंत्रण देणें होय. यापुढें करावयाच्या सामाजिक क्रांतीसाठीं जरूर तर शांतिमय सार्वत्रिक संप व सत्याग्रहाचा अवलंब करावयाचा तर त्यासाठीं पुन्हां देशाला रचनात्मक कार्यक्रमाच्या द्वारा उदंड साधना केली पाहिजे. मध्यंतरींच्या कालांत जो राजकीय पक्ष देशांत कायद्याचें राज्य प्रस्थापित करणें व कायदेमंडळाच्या द्वाराच इष्ट ते सामाजिक व आर्थिक बदल घडवून आणणें या धोरणाचा पुरस्कार व अंमल करील त्याच्याशीं सहकार्य करणें हें गांधीवाद्यांचें कर्तव्य ठरतें. अर्थात् विशिष्ट आर्थिक मागणी मान्य करून घेण्यासाठीं संप व सत्याग्रह करण्याच्या हक्काला गांधीवाद्यांनीं केव्हांहि मान्यता दिली पाहिजे.

## रचनात्मक कार्यक्रमाची साधना आवश्यक

समाजांत कोणताहि मोठा बदल शांतीनें घडवून आणावयाचा तर त्याला अनुकूल अशी लोकांची मनःस्थिति व बाह्य परिस्थिति रचनात्मक कार्याच्या साधनेनें व समाजसेवेनें निर्माण केली पाहिजे फळ पिकलें म्हणजे तें जोरानें ओढून तोडावें लागत नाहीं तर तें थोडें हलविलें म्हणजे आपोआपच गळून पडतें. शांतीनें घडवून आणलेल्या सामाजिक ' परिवर्तनाला हाच न्याय लागू आहे. वैयक्तिक जीवनांत स्वयंस्फूर्तीनें व सामाजिक जीवनांत समाजाच्या मतानें व सरकारी कायद्यानें तो बदल स्थायी झाला पाहिजे. गांधीजींनीं राष्ट्राकडून अहिंसात्मक राजकीय क्रांतीसाठीं अखंड तीस वर्षें ही साधना व सेवा करविली, तरी सुद्धां त्यांत दोष राहिले व स्वातंत्र्याच्या लढ्यांत असत्य व हिंसा यांनीं प्रवेश केला. राजकीय क्रांतीपेक्षां सामाजिक क्रांति अधिक कठीण आहे. कारण तिच्यामुळें समाजांतील विशिष्ट वर्गांच्या हितसंबंधांवर आघात होणार आहेत. म्हणून तिला आंतून कसून विरोध होणें अपरिहार्य असल्यामुळें यादवी व अराजक यांची तिला अधिक भीति आहे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या लढ्यांत सुद्धां शेवटीं शेवटीं काँग्रेस-लीग विरोधामुळें या देशांत यादवी व अराजक माजण्याचा फार मोठा धोका उत्पन्न झाला होता हा अगदीं ताजा अनुभव आहे. आज सत्याग्रहाच्या ऋषीच्या मार्गदर्शनालाही आम्ही मुकलेले आहोंत. अशा स्थितींत सामाजिक क्रांति शांतीनें व लोकशाहीच्या मार्गानें वैयक्तिक स्वातंत्र्य गमावून न बसतां घडवून आणावयाची तर त्याला लोकांचीं मनें व बाह्य परिस्थिति अनुकूल करण्याकरितां, लोकांमध्यें सांघिक म्हणजेच नागरिक वृत्ति व सहकारी जीवनाची आवड उत्पन्न करण्याकरितां जरूर ती साधना व सेवा करणें अवश्य आहे. श्री. शंकररावांना सत्याग्रहाचा सिद्धांत बुद्धीनें पटला आहे. ८० त्याची साधना जो रचनात्मक कार्यक्रम त्याला










त्याची प्रकृति तितकीशी अनुकूल नाहीं. सत्याग्रहासाठीं विधायक कार्याची साधना त्यांना फारशी पटल्याचें दिसत नाहीं व म्हणून त्यांनीं तिचा कधीं फारसा प्रचारहि केलेला नाहीं. पण यांत त्यांचा दोष नाहीं. मला वाटतें त्यांचा मार्क्सवादावर गांधीवादाचें कलम करण्याच्या प्रयत्नाचा हा अपरिहार्य परिणाम आहे.

श्री. शंकरराव काय किंवा त्यांच्या मताचे अन्य मित्र काय, त्यांच्या विचारसरणींत माझ्या अल्पमतीप्रमाणें आणखीहि एक दोष आहे. देशांत जी राजकीय क्रांति घडत आहे, तिचेंच सामाजिक क्रांतींत रूपांतर करण्याचा उतावळा व म्हणून अविवेकी प्रयत्न न कळत त्यांच्या हातून होत आहे. राजकीय क्रांतीनें मिळालेल्या लोकशाही स्वातंत्र्याचा, देशांत सामाजिक क्रांतीला अनुकूल अशी परिस्थिति निर्माण करण्यासाठीं, कांहीं काल उपयोग करून घेतल्यावर मग सामाजिक क्रांतीला प्रत्यक्ष सुरुवात करण्याचें तंत्र अवलंबिण्याला ते तयार नाहींत. आणि त्यामुळेंच कॉंग्रेसचे या बाबतींत जे प्रयत्न सुरू आहेत त्याबद्दल त्यांच्या मनांत असावी तितकी गुणग्राहकता (appreciation) नाहीं.

## वाद आहे साधनें व कार्यपद्धति यांबद्दल

श्री. शंकररावांची प्रकृति मुख्यतः तत्त्वचिंतक असल्यामुळें त्यांची विचारसरणी व कार्यपद्धति व्यवहारनिष्ठ असण्यापेक्षां तत्त्वनिष्ठच अधिक असते यांत नवल नाहीं. कॉंग्रेसची वाढ व विकास, तिच्यामधील गांधीवादी व समाजवादी यांचें स्थान, भूमिका आणि परस्परसंबंध या विषयींच्या श्री. शंकररावांच्या कल्पना बाह्यवस्तुनिष्ठ असण्यापेक्षां आत्मनिष्ठ अधिक असतात. हिंदी राजकीय परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर कॉंग्रेसच्या राजकीय कार्याचा हिशेब व आढावा घेतांना समाजवाद व समाजवादी पक्ष यांच्यातील सूक्ष्म पण महत्त्वाचा भेद जितका लक्षांत घ्यावयास पाहिजे तितका श्री. शंकरराव घेत नाहींत. त्यामुळेंच गांधीवाद्यांचा अगर कॉंग्रेस वाद्यांचा समाजवादी पक्षाला विरोध म्हणजे समाजवादाला विरोध असा ते स्वतःचा चुकीचा समज करून घेतात व इतरांचा करून देतात. कॉंग्रेस व समाजवादी पक्ष यांच्यामध्यें हल्लीं जो मतभेद व विरोध आहे तो कॉंग्रेसनें समाजवाद स्वीकारावा किंवा नाहीं व समाजवाद स्वीकारण्यांतच देशाचें खरें हित आहे किंवा नाहीं या विषयांसंबंधीं नाहीं. वर एके ठिकाणीं जें विवेचन केलें आहे त्यावरून कॉंग्रेस व समाजवादी भिन्न शब्द योजीत असले तरी त्यांना एकच अर्थ अभिप्रेत आहे हें कोणीहि मान्य करील. वाद आहे तो साधनांचा व कार्यपद्धतीचा आहे. त्याचप्रमाणें देशाच्या सद्यःस्थितींत कॉंग्रेसचें नेतृत्व समाजवादी पक्षाच्या हातीं दिलें म्हणजे या देशांत शांततेच्या मार्गानें समाजवाद हमखास प्रस्थापित होईल या विचारसरणीला व्यवहारापेक्षां केवळ तत्त्वनिष्ठेचाच अधिक आधार आहे. शिवाय समाजवादी पक्ष देशांत अति अल्पसंख्य असतांना त्यानें कॉंग्रेससारख्या देशव्यापी संस्थेचें नेतृत्व करण्याची महत्त्वाकांक्षा कां बाळगावी? देशांतील म्हणजेच कॉंग्रेसमधील बहुमत आपल्या बाजूचें करण्याची साधना करण्यांत कांहीं काळ खर्च करण्यांत समाधान कां मानूं नये? म. गांधी हयात होते तोंपर्यंत त्यांचें व त्यांच्या मागें पंडितजींचें नेतृत्व कॉंग्रेसनें मान्य केलेलें आहे. ही परिस्थिति समाजवादी पक्षाच्या दृष्टीनें कॉंग्रेसला आपल्या मताची करून घेण्याला अनुकूल नाहीं का? 'समाजवादी तत्त्वावर माझी श्रद्धा आहे व हिंदुस्थानलाच काय पण सर्व जगाला कोणत्या ना कोणत्या प्रकारचा समाजवाद पत्करण्याशिवाय गत्यंतर नाहीं' असें पंडितजी उघड उघड बोलत नाहींत का? पण पंडितजी हे क्रांतिकारी नाहींत व खरे समाजवादीहि नाहींत असें जेथें बालबुद्धि समाजवाद्यालाही प्रामाणिकपणें वाटतें, तेथें इलाज काय?

समाजवादी तत्त्वावर श्रद्धा ठेवणारे पंडितजी स्वतंत्र भारतांतील नव्या कॉंग्रेसमध्यें राहूं शकतात तर जयप्रकाशजी कां राहूं शकत नाहींत? कॉंग्रेसनें जें नवीन ध्येय व धोरण ठरविलें आहे त्यांत समाजवादाचा प्रचार व आचार यांना प्रतिबंध नाहीं. प्रतिबंध आहे तो समाजवादी व अन्य राजकीय पक्ष कॉंग्रेसमध्यें बनविण्यांत आहे.

ज्या राजकीय संस्थेला शासनयंत्र ताब्यांत घेऊन देशाचा कारभार हाकावयाचा असतो, त्या संस्थेंत







एकापेक्षां अधिक पक्ष राहूं शकत नाहींत हें श्री. शंकररावांसारख्या राज्यनीतिशास्त्रज्ञाला माझ्यासारख्यानें सांगणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घांस घेण्याच्या प्रमादाला पात्र होण्यासारखें आहे. समाजवादी पक्षानें कॉंग्रेसमधून बाहेर पडूं नये म्हणून माझ्यासारख्यांनीं आपल्या अल्पशक्तीप्रमाणें केलेल्या प्रयत्नांची ज्यांना माहिती आहे ते या गोष्टीची साक्ष देऊं शकतील कीं, समाजवादी पक्षानें एका विचार—प्रवर्तक-व-प्रचारक अशा गटामध्यें आपलें रुपांतर करावें म्हणून त्याच्या नेत्यांचें मन वळविण्याचा खूप प्रयत्न झाला व एक क्षण असा आला होता कीं श्री. जयप्रकाशजी या मताकडे झुकलेहि होते. पण— पक्षांत नेता झाला तरी तो थोडाच स्वतंत्र असतो !

## समाजवाद केवळ आर्थिक परिवर्तन नव्हे

समाजवादी किंवा साम्यवादी पक्षाच्या हातांत सरकार आलें कीं, समाजवाद स्थापित झाला असें नाहीं ही गोष्ट आज सर्वजण मान्य करतात हें लक्षांत ठेवलें पाहिजे. केवळ एक विशिष्ट आर्थिक पद्धति म्हणजे समाजवाद नव्हे; समाजवाद ही एक गांधीवादाप्रमाणें जीवन-दृष्टि-वा-पद्धति आहे. सत्ता आणि संपत्ति हस्तगत केली कीं, ही जीवनदृष्टि येते अशांतला मुळींच भाग नाहीं. समाजवाद किंवा साम्यवाद हा समाजाचें एक केवळ आर्थिक परिवर्तन घडवून आणण्याचा प्रश्न नसून तो मुख्यतः नैतिक परिवर्तनाचाच प्रश्न आहे. नीति व सत्ता आणि संपत्ति यांचा सवती-संबंध आहे असें म्हटलें तर त्यांत फारशी अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं. समाजांत नैतिक परिवर्तन घडवून आणावयाचें तर तें सेवेनें व त्यागानेंच घडवून आणणें अधिक शक्य आहे. म्हणून त्यासाठीं प्रदीर्घ संघटित व सतत सेवेची जरूरी आहे. दुर्दैवानें समाजवादी पक्षानें अन्य सत्ताभिलाषी राजकीय पक्ष ज्या मार्गानें गेले किंवा जातात त्या मार्गानेंच जावयाचें ठरविलेलें दिसतें. तसें नसतें तर मला वाटतें कॉंग्रेसचा त्याग करून देशांतील क्रांतिकारक शक्ति दुर्बल करण्याचा दोष त्यांच्या हातून घडला नसता ! आणि सखेदाश्चर्याची गोष्ट अशी कीं श्री. शंकरराव जावडेकरांसारखे तत्त्वचिंतक त्यांना या उतारावर उत्तेजन देत आहेत ! महाराष्ट्र मागें कां पडला, या प्रश्नाला उत्तर म्हणून 'मौज'मध्यें श्री. शंकररावांनीं कांहीं प्रश्नांना जीं उत्तरें दिलीं आहेत त्यांत त्यांनीं असा सल्ला दिला आहे कीं, पुढच्या निवडणुकीसाठीं श्री. गोरे, श्री. मोरे, डॉ. आंबेडकर, डॉ. धनंजयराव गाडगीळ, अशोक मेहेता, मेहरअल्ली, श्री. ना. म. जोशी यांची युति वा एकजूट घडवून आणावी व या जुटीचें मुख्य ध्येय कॉंग्रेस पक्षाला पुढील निवडणुकींत हाणून पाडणें हें असावें. श्री. शंकररावांनीं ज्या गृहस्थांचीं नांवें सुचविलीं आहेत, ते सर्व गृहस्थ कर्तृत्ववान् असून आपापल्या क्षेत्रांत मोठे आहेत यांत शंका नाहीं. परंतु ज्या समाजवादाच्या प्रस्थापनेच्या कार्याकरितां त्यांना एकत्र आणण्याची श्री. शंकररावांची सूचना आहे त्याचा विचार करतां ही आंवळ्यांची मोट ठरणेंहि शक्य आहे ! संयुक्त प्रांतांत समाजवादी पक्षानें ॲसेंब्लीच्या वा स्थानिक-स्वराज्य-संस्थेच्या ज्या निवडणुका लढविल्या त्यांतील अनुभव अशा प्रकारच्या एकजुटीपासून काय निष्पन्न होतें तें दाखवीतच आहे.

महाराष्ट्रांत काय किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रांतांत काय अशा प्रकारच्या जुटीपासून सत्ता हातीं लागेल किंवा नाहीं हें सांगणें कठीण आहे. पण एक गोष्ट मात्र निश्चित कीं, अशा प्रकारची युति या देशांत समाजवादाच्या एका नवीन विकृतीला जन्म मात्र खास देईल ! उलट अशा रीतीनें सत्तेशीं आसुरी विवाह करण्याचा आग्रह सोडून जर समाजवादी पक्ष देशांत समाजवाद आणण्याकरितां आवश्यक ती सामाजिक परिस्थिति निर्माण करण्यासाठीं कांहीं काल विधायक कार्य करीत राहील तर मला वाटते, त्यांना प्रिय तो समाजवाद ते कल्पना करतात त्याच्यापेक्षांहि आधीं या देशांत प्रस्थापित होईल. समाजवादी पक्ष हें धोरण स्वीकारतील तर आणखीहि एक मोठा फायदा होईल. तो म्हणजे या धोरणामुळें त्यांची व गांधीवादी पक्षाची युति घडून येईल व कॉंग्रेसला शुद्ध व सरळ मार्गावर नेण्यांत दोघांनाहि कमालीचें यश येईल. माझ्या अल्प श्रद्धेप्रमाणें, असें होईल तर गांधीजींची इच्छाहि पुरी होईल. कॉंग्रेसला समाजवादी आज







विरोध करीत आहेत ही गोष्ट त्यांच्या व गांधीवादाच्या सहकार्याच्या आड येत आहे. आणि या विरोधाचें कारण सत्ता काबीज करण्याची मनीषा हें आहे. जर समाजवादी ही मनीषा कांहीं काल धरणार नाहींत, गांधीवाद्यांप्रमाणेंच समाजवादीहि कांहीं काल सत्ताभिलाषाचा मोह सोडतील व सेवेचा मार्ग पत्करतील, तर या दोघांचें सहकार्य होईल व या देशांत दोघांचेंहि भवितव्य उज्ज्वल आहे असें भाकित करण्यांत मुळींच भीति नाहीं. असें होईल तर या देशांत शांततेच्या मार्गानें सर्वोदय समाज स्थापन होण्याची शक्यता निर्माण होऊन जगाला शांतीचा व सुहृद्भावाचा एक नवीन मार्ग दाखविण्याचें श्रेय भारताला मिळेल. समाजवादी आपलें धोरण ठरविण्याला स्वतंत्र आहेत. गांधीवाद्यांना अन्य मार्ग नाहीं. "एष पन्थाः एतत् कर्म।"

[ प्रस्तुत लेखकानें २० फेब्रुवारी, २७ फेब्रुवारी व ६ मार्च १९४९ च्या इंग्रजी 'हरिजन' मध्यें 'कॉंग्रेस व रचनात्मक कार्यकर्ते' या अर्थाच्या शीर्षकाखालीं तीन लेख लिहिले आहेत; त्याचप्रमाणें 'गांधीजी व रचनात्मक कार्यक्रमाचें पुढील कार्य' या अर्थाच्या शीर्षकाखालीं श्री. प्यारेलाल यांचा ६ मार्च १९४९ च्या 'हरिजन'-मध्यें लेख आला आहे. 'नवभारतां'तील प्रस्तुत लेखांतील भूमिका व विचारसरणी अधिक समजण्याच्या दृष्टीनें 'हरिजन'मधील वरील लेख वाचण्याची वाचकांना शिफारस आहे. — लेखक ].

---

## हिंदचें परराष्ट्रीय धोरण

आशियाला इंडोनेशियाबद्दल अतिशय जिव्हाळा असल्यामुळें इंडोनेशिआची धग अतिशय जाणवते. पाश्चिमात्य राष्ट्रांना त्याची फिकीर वाटत नाहीं. त्यांची ही उदासीनता अथवा बेपर्वाई देखील आमच्या दृष्टीनें दोषास्पद आहे. युरोप व अमेरिकेची या प्रश्नावर कसोटी लागणार आहे.

वांशिक विषमतेचा प्रश्नसुद्धां तितकाच ज्वलंत आणि तांतडीच्या महत्त्वाचा आहे. आज जगांत अनेक ठिकाणीं ही वंशभेदाची तिरस्करणीय वृत्ति आढळून येते. द. आफ्रिकेंत हिंदी लोकांना ज्या घृणास्पद व अपमानास्पद जीवनांत खितपत पडावें लागतें, तें पाहिलें म्हणजे मन संतापानें पोळून निघतें.

पण हा प्रश्न केवळ द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांपुरतांच मर्यादित नाहीं. अखिल जगतांतील एक मानवसमूह विरुद्ध दुसरा मानवसमूह असें स्वरूप त्याला प्राप्त होऊन संघर्ष निर्माण होण्याची शक्यता वाटते.

हिंद एक महान् आणि अति पुरातन देश आहे. जगांतील कोणत्याहि आढ्यताखोर शक्तीसमोर हिंद मस्तक झुकविणार नाहीं. अर्थात् हिंदलाहि कोणावर आक्रमण करण्याची अथवा जगांतील दोन राष्ट्रसमूहरूपी मस्त रेड्यांच्या टक्करींत सहभागी होण्याची इच्छा नाहीं. जगांतील सर्व राष्ट्रांशीं सलोख्याचे संबंध जोडून परस्पर उन्नतीच्या मार्गानें प्रयत्न करणें हेंच आमचें ध्येय राहील. मात्र हा मध्यमार्ग अथवा उदासीनवृत्ति नव्हे. आमचा हा मार्ग अतिशय विधायक असून जागतिक शांततेसाठीं प्रयत्न करणारा आहे. पण हें देखील तितकेंच खरें आहे कीं, एकाद्या राष्ट्रापेक्षां दुसऱ्याशीं आमची मैत्री अधिक निकटची असेल. ही निकट मैत्री आमच्या व त्या राष्ट्राच्या राजकीय व आर्थिक जीवनांतील साम्यनिदर्शक गोष्टींवर अवलंबून राहील.

—पं. जवाहरलाल नेहरू, 'इंडिअन कौन्सिल ऑफ वर्ल्ड अफेअर्स'च्या वार्षिक सभेपुढील भाषणांतून (२३।३।४९)







श्री. कृ. शं हिंगवे

# महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयें

सार्वजनिक मराठी ग्रंथालयांपैकीं एक अत्यंत जुनें ग्रंथालय जें पुण्याचें नगर वाचनमन्दिर त्याचा शतवार्षिक उत्सव मे १९४९ मध्यें साजरा होणार आहे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचा सुवर्ण महोत्सव नुकताच साजरा झाला. या अभिनंदनीय उत्सवांच्या निमित्तानें महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयांचा इतिहास, त्यांची सद्यःस्थिति, अपेक्षा यांबाबत या लेखांत संक्षिप्त समालोचन करावयाचें योजिलें आहे.

ग्रंथालयांबद्दल विचार करीत असतांना एक गोष्ट अशी लक्षांत ठेवली पाहिजे कीं सर्वच ग्रंथालयांचें स्वरूप सारखें नसतें. शाळा--कॉलेजांचीं, सार्वजनिक, संशोधक, बाल, वृत्तपत्रीय, औद्योगिक, रुग्णालयीन अशा निरनिराळ्या प्रकारचीं ग्रंथालयें असतात व त्यांचें कार्यक्षेत्रहि वैशिष्ट्यपूर्ण असतें. प्रस्तुत लेखांत वरीलपैकीं फक्त सार्वजनिक मराठी ग्रंथालयांचाच विचार करावयाचा असल्यानें प्रथम 'सार्वजनिक' या शब्दाची व्याख्या ठरविणें सयुक्तिक ठरेलः ' जें ग्रंथालय कोणाहि व्यक्तीच्या मालकीचें नसून ज्याची व्यवस्था सर्वसाधारणपणें समाजांतील कांहीं सार्वजनिक कार्यकर्त्यांच्याकडून बघितली जाते व ज्याचा फायदा समाजांतील कुणाहि व्यक्तीला, मोबदला देऊन अथवा फुकट घेतां येतो त्यांस सार्वजनिक ग्रंथालय म्हणतात.'

हिंदुस्थानांत ग्रंथसंग्रह करण्याची आवड फार प्राचीन काळापासून होती, परंतु या संग्रहांचा उपयोग ठराविक लोकांनांच होत असे. खाजगी ग्रंथसंग्रह असत परंतु त्यांचा उपयोग फारच मर्यादित असे. १३ व्या शतकांत 'वस्तुपाल' नांवाच्या राजानें तीन ग्रंथालयांवर १८ कोट रुपये खर्च केल्याचा उल्लेख सांपडतो.[1] नालंद, तक्षशिला इ. विद्यापीठांचीं जीं ग्रंथालयें होतीं त्यांचा उपयोग मात्र विद्यार्थ्यांना व विद्वानांना होत असे.

## महाराष्ट्र व ग्रंथालयें

सार्वजनिक ग्रंथालयांची कल्पना आपण पाश्चात्यांच्याकडून घेतली यांत संशय नाहीं. ब्रिटिशांचा अंमल सुरू होण्यापूर्वी बहुजनसमाजास उपयुक्त अशा सार्वजनिक ग्रंथालयांचा उल्लेख विशेष सांपडत नाहीं. कदाचित् छापण्याची कला त्या काळीं तेवढीशी प्रगत झाली नसल्याकारणानें व सुशिक्षित लोकांचें प्रमाणहि बोटावर मोजण्याएवढें असल्यानें सार्वजनिक ग्रंथालयांची वाढ न होणें स्वाभाविक व परिस्थितीस अनुरूप असेंच होतें. महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें म्हणजे महाराष्ट्रांत १९ व्या शतकाच्या मध्यास सार्वजनिक ग्रंथालयांच्या स्थापनेस सुरुवात झाली. याउलट इंग्लंडमधील पहिलें मोफत सार्वजनिक वाचनालय ब्रिस्टल येथें इ. स. १६१४ मध्यें स्थापन झाल्याचा पुरावा मिळतो. इंग्लंडपेक्षां हिंदुस्थानची लोकसंख्या कितीतरी पट मोठी असूनहि या देशांत मात्र १९ व्या शतकापर्यंत सार्वजनिक ग्रंथालयांची स्थापना कां झाली नाहीं याचें कारण सोपें आहे. अध्यात्मविद्येचें माहेरघर, अनेक विद्या, कला व शास्त्रें यांचें उत्पत्तिस्थान अशा आपल्या या प्राचीनतम भारतवर्षांत वास्तविक पुराणवस्तुसंग्रहालयें सर्वांत अधिक व सर्वांत जुनीं असावयास पाहिजेत. परंतु वस्तुस्थिति अगदीं उलट आहे.

1. Naranarayanananda of Vastupala. (G. O. S., 2). पृ. ७.








समाजांत कोणत्याहि सांस्कृतिक चळवळीचा फैलाव होण्यास देश नुसताच स्वतंत्र असून भागत नाहीं; तर त्यासाठीं शांततेचा काळहि आवश्यक असतो. शिवाजीच्या उदयापासून पेशवाईच्या अखेरीपर्यंत महाराष्ट्राला मोंगल, निझाम, दक्षिणेतील मुसलमानी राज्यें व इंग्रज यांच्याशीं स्वतःचें अस्तित्व टिकविण्यासाठीं सतत झगडावें लागलें. या राजकीय घटनांमुळें सांस्कृतिक सुधारणेकडे लक्ष देण्यास मराठ्यांना फावलेंच नाहीं. अव्वल इंग्रजी आमदानींत सार्वजनिक ग्रंथालयें केव्हां सुरू झालीं व त्यांच्या स्थापनेस कुणाचे परिश्रम कारणीभूत झाले याचा इतिहास देण्यापूर्वीं त्या काळच्या समाजाच्या आकांक्षा, विचार कशा तऱ्हेचे होते याचें परीक्षण करणें क्रमप्राप्त आहे. पेशवाईच्या अस्तानंतर समाजांत निष्क्रियता वाढली. ज्ञान संपादन करण्याचा हक्क तेवढा ब्राह्मणांनाच आहे ही तर्कट विचारसरणी याहि काळांत जीव धरून होती व केवळ या संकुचित धोरणामुळेंच बहुजनसमाज अंधकारांत खितपत पडला होता. या काळच्या बहुजनसमाजास विद्या नव्हती, वाचनाची अभिरुचि नव्हती व ग्रंथालयांच्याबद्दल आस्थाहि नव्हती.[२] श्रीमंतांच्या मोठेपणाच्या कल्पना हास्यास्पद होत्या. या काळीं ग्रंथालयाकडे पहाण्याचा समाजाचा काय दृष्टिकोन होता याचें चित्र पुढील एका उताऱ्यावरून स्पष्ट होईल. "अद्याप गृहस्थांपैकीं कोणी ग्रंथ वाचावयास व ज्ञान संपादन करावयास येत नाहींत. सरदार लोक येत नाहींत. त्याविषयीं मला असें वाटतें कीं आम्ही थोर, चार शिपाई, घोडे, अबदागीर बरोबर घेतल्याशिवाय बाहेर कधीं पडत नाहीं; तेव्हां लायब्ररींत मुलांसारखें शिकण्यास जावयाची त्यांस लज्जा वाटत असेल; परंतु अज्ञानामुळें आणि अनश्रुतपणामुळें त्यांची अशी अवस्था जहाली."[३]

## १८३८ ते १९११ पर्यंत

अशा निराशाजनक परिस्थितींतही डॉ. सर भांडारकर, रा. ब. देशमुख (लोकहितवादी), न्या. मू. म. गो. रानडे, न्या. मू. तेलंग यांच्या खटपटीमुळें महाराष्ट्रांत इ. स. १८३८ ते इ. स. १९११ पर्यंत जीं मराठी सार्वजनिक ग्रंथालयें स्थापन झालीं, त्यांपैकीं कांहीं मोठ्या प्रमुख ग्रंथालयांचा त्रोटक इतिहास खालीलप्रमाणें आहे:

महाराष्ट्रांतील पहिलें सार्वजनिक ग्रंथालय अहमदनगरला इ. स. १८३८ मध्यें स्थापन झालें. लोकाश्रयाच्या अभावीं ही संस्था मध्यंतरीं बंद होती. परंतु १८४७ पासून या संस्थेचें कार्य अखंडितपणें चालू आहे. या ग्रंथालयाची सुरुवात 'दुधिया' नांवाच्या मुसलमानी पद्धतीच्या इमारतींत झाली. १९१० सालीं या छोट्याश्या इमारतीला लागूनच नवीन प्रशस्त इमारत बांधण्यांत आली व तेथें ग्रंथालय हालविण्यांत आलें. यानंतर 'नाशिकला नाशिक सार्वजनिक वाचनालय' या संस्थेची स्थापना दोनच वर्षांनीं म्हणजे इ. स. १८४० मध्यें झाली. ग्रंथसंग्रहाव्यतिरिक्त वेगवेगळ्या विषयांवर उद्बोधक व्याख्यानेंहि भरविण्याचें कार्य आजतागायत या संस्थेतर्फें चालू आहे. महाराष्ट्रांतील तिसरें प्रमुख ग्रंथालय म्हणजे पुण्याचें नगर-वाचन-मंदिर हें होय. या ग्रंथालयाच्या स्थापनेचा अधिकृत वृत्तांत पुढीलप्रमाणें आहे: "पुण्यासारखे शहरांत विद्याशाळा वगैरे बऱ्याच आहेत; परंतु ग्रंथ वाचण्याची जागा अद्याप लोकांस माहीत नव्हती व तिचा उपयोग कोणा नेटिव्ह लोकांस माहीत नव्हता; परंतु सांप्रतचे गव्हर्नरसाहेब सर जार्ज क्लार्क यांनीं लोकांचे सुधारणेकडे लक्ष देऊन जड्ज साहेब हेनरी ब्रौन यांस सुचाविलें कीं, पुण्यांत लायब्ररी स्थापण्याचा बेत करावा. त्याजवरून त्यांनीं २८ जाने. १८४८, साल मजकुरीं सर्व लोकांची सभा जमवून त्यांस हा मजकूर निवेदन केला. तेव्हां बुधवारचे वाड्यांतील इंग्रजी शाळेंतील अभ्यासी लोकहि पुष्कळ हजीर होते, त्या सर्वांनीं अनुमोदन दिलें. सभेपैकीं दहा असामी कमेटींत नेमून लायब्ररीचे कायदे ठरविल्यानंतर पुनरपि ता. ४ फेब्रु. दुसरी सभा भरली. यावेळेस कमिटीपैकीं एके गृहस्थानें विद्येचे उपयोगाविषयीं महाराष्ट्र-भाषेंत एक निबंध केला

२ कोल्हापूर नेटिव्ह लायब्ररीचा इतिहास. पृ. १.

३ लोकहितवादींचीं शतपत्रें. पृ. ११०.








# महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयें

होता तो वाचून दाखविला. जास्त पैसा जमला नाहीं. परंतु असें ठरविलें कीं लायब्ररीचें काम ठरविण्यास एक लहान कमिटी असावी. लायब्ररीयन एक असामी नेमून बुधवारचे वाड्यांत कलेक्टर-साहेब यांनीं कृपाकरून जागा दिली आहे, त्या ठिकाणीं ता. ७ फेब्रु. १८४८ पासून लायब्ररी सुरू झाली.'[४] इ. स. १८४८ पासून इ. १८७९ पर्यंत ही संस्था बुधवार वाड्यांतच होती. या संस्थेशीं न्या. मू. म. गो. रानडे व ऑ. गोपाळ हरि देशमूख (लोकहितवादी) यांचा प्रथमपासून संबंध आला. संस्थेच्या पहिल्या कार्यकारी मंडळांत कृष्णशास्त्री चिपळूणकर, प्रो. केरोपंत छत्रे, ऑ. गो. ह. देशमूख, रा. ब. वि. मो. भिडे, रा. ब. वि. प. रानडे, रा. ब. सोन्याबापु मांडे व संस्थेचे पहिले चिटणीस रा. ब. दाजी नीलकंठ नगरकर इ० मंडळी होती. इ. स. १८७९ च्या आगींत या ग्रंथालयाचें अपरिमित नुकसान झालें. परंतु त्या वेळच्या कार्यकर्त्यांनीं डगमगून न जातां आपली स्वतःची इमारत बांधली व या नवीन इमारतींत वाचनालय ता. १ एप्रिल १८८९, चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या सुमुहूर्तावर नेण्यांत आलें. या इमारतीच्या निधीसाठीं पुणें नगरपालिकेनें रु. २५००/– देणगी दिली होती. पुणें नगरपालिका व पुणें नगर-वाचन-मंदिर या दोन संस्थांचा संबंध प्रथम इ. स. १८८२ मध्यें आला. तो सतत इ. स. १९४१ पर्यंत चालू राहिला. संस्थेच्या सुरुवातीपासून इ. स. १९२१ पर्यंत म्हणजे ७३ वर्षें या संस्थेचें नांव 'पुणें नेटिव्ह जनरल लायब्ररी' असें होतें. पुढें पुढें या 'नेटिव्ह' शब्दाबद्दल अनेक कारणांमुळें लोकांच्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला. शेवटीं २३ ऑक्टोबर १९२१ रोजीं भरलेल्या सर्वसाधारण सभेंत मूळच्या नांवांतील 'नेटिव्ह' शब्द काढून त्याच्याऐवजीं 'सिटी' हा शब्द घालून 'पुना सिटी जनरल लायब्ररी' असें नांव कायम करण्यांत आलें. या संस्थेचे पहिले Benefactor होण्याचा मान श्री. नारायण श्रीपाद राजहंस ऊर्फ बालगंधर्व यांना मिळाला. हें ग्रंथालय स्थापन झालें त्यावेळीं ग्रंथालयांत फक्त ३०० ग्रंथ होते.[५] या ग्रंथालयाची दरवर्षी प्रगति होऊन आजमितीस या ग्रंथालयाचे सुमारें १७०० वर्गणीदार असून ग्रंथसंख्या जवळ-जवळ १५,००० हजार आहे. वर्गणीवर चालणारें पुण्यांतील हें सर्वांत मोठें असें सार्वजनिक ग्रंथालय आहे. या संस्थेचा शतसांवत्सरिक उत्सव १२ ते १५ मे १९४९ पर्यंत साजरा होणार आहे.

पुण्याच्या नगर-वाचन-मंदिराच्या स्थापनेनंतर दोनच वर्षांनीं म्हणजे इ. स. १८५० मध्यें कोल्हापूरला 'कोल्हापूर नेटिव्ह लायब्ररी' या सार्वजनिक ग्रंथालयाची स्थापना झाली. या ग्रंथालयाची स्थापना कर्नल एच्. एल्. अँडरसन, पोलिटिकल सुपरिंटेंडेंट कोल्हापूर यांचे हस्तें झाली. संस्थेचे पहिले कार्यवाह मि. जमशेटजी नवरोजी ऊनवाला हे होते. यानंतर इ. स. १८९३ मध्यें ठाण्यास 'ठाणें मराठी ग्रंथालया'ची स्थापना झाली. श्री. विनायक लक्ष्मण भावे या थोर वाङ्मयाभ्यासक तरुणानें एकदम प्रचंड साहस करून 'ठाणें मराठी ग्रंथसंग्रहालया'ची स्थापना केली. त्या संस्थेचा हेतु 'पुस्तकांचा एक अजबखाना करावा व तेथें कोणतेंहि मराठी भाषेंतील पुस्तक सांपडावें' हा होता. १९०३ सालीं श्री. भावे यांनीं ठाण्याच्या ग्रंथसंग्रहालयामार्फत, प्राचीन मराठी अप्रकाशित काव्यांच्या प्रकाशनासाठीं, 'महाराष्ट्र कवि' या नांवाचें एक संशोधनात्मक मासिक सुरू करून तें चार वर्षें अखंड चालविलें. या मासिकांत फक्त एक रुपया वर्गणींत वाचकाला डेमी आकाराच्या ६०० पृष्ठांचा मजकूर मिळत असे. याशिवाय 'वच्छहरण' व 'शिशुपालवध' हीं दोन महानुभावी काव्येंहि त्यांनीं संग्रहालयातर्फे प्रकाशित केलीं. भाव्यांचा प्रयत्न केवळ एक साधें ग्रंथालय स्थापावयाचा नसून, मराठी वाङ्मयसंशोधन-संस्था स्थापण्याचा त्यांचा उदात्त हेतु होता असें म्हणावें लागतें. कै. भावे यांचा हा प्रयत्न महाराष्ट्रांतील

---

४ लोकहितवादींचीं शतपत्रें पृ. १०९.

५ लोकहितवादींचीं पत्रें पृ. १११.








मराठी ग्रंथालयांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा आहे.[६] त्यानंतर लगेच इ. स. १८९८ मध्यें मुंबईस 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'ची स्थापना झाली. अहमदनगरच्या सार्वजनिक ग्रंथालयाच्या स्थापनेनंतर जवळजवळ पन्नास वर्षांचा अवधि लोटला होता. या काळांत महाराष्ट्रांत चैतन्य निर्माण होऊं लागलें होतें. नवीन विचार, आकांक्षा व ध्येयें यांचा नवीन महाराष्ट्र निर्माण होत होता. समाजाच्या उन्नतीसाठीं आपणहि कांहीं हातभार लावावा अशी इच्छा अनेक तरुणांच्या मनांत डोकावूं लागली व त्यामुळेंच या काळांत ज्या अनेक सार्वजनिक संस्था जन्माला आल्या त्यापैकीं 'मुंबई मराठी ग्रंथालय' ही एक होती. ही संस्था नांवारूपाला आणण्यासाठीं आरंभापासून न्या. मू. रानडे, श्री. नानासाहेब देशमुख, रा. गजाननराव वैद्य, सर भालचंद्र भाटवडेकर, रा. नानु नारायण कोठारे इ० सद्गृहस्थांनीं फारच परिश्रम केले. संशोधक, विद्वान् यांनीं ज्याप्रमाणें ही संस्था आपली मानली त्याचप्रमाणें नाटक, सिनेमा कंपन्या व सर्कशी यांनीं पण या संस्थेला सढळ हातानें मदत केली. मागच्या पिढीप्रमाणें आजच्या पिढींतील डॉ. बाबासाहेब जयकर, पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर, म. म अण्णासाहेब काणे इत्यादि श्रेष्ठ महाराष्ट्रीयांची पण या संस्थेवर कृपादृष्टि आहे. ही संस्था प्रथमपासून धर्म–जात–निरपेक्ष असल्यामुळें या ग्रंथालयास प्रथमपासूनच सर्वांचें सहकार्य मिळालें. दुर्मिळ व बहुमोल पुस्तकें नेहमींच चोरीस जातात व त्यामुळें संशोधकांची फार गैरसोय होते. ही नासाडी लक्षांत घेऊन, सामान्य वाचकाला न मिळणारी अशी प्रत्येक पुस्तकाची 'स्थळप्रत' जतन करून ठेवण्याची कल्पना इ. स. १८९६ मध्यें निघाली. सुरुवातीस या ग्रंथालयांत ४०० पुस्तकें होतीं. परंतु आजची संख्या २०,००० जवळ आहे. ही संस्था आज नुसतीच ग्रंथसंग्रह करण्याची जागा राहिली नसून तीस आज संशोधनकेंद्राचें स्वरुप प्राप्त झालें आहे. मुलांसाठीं व स्त्रियांसाठीं येथें मोफत वाचनालयाची सोय आहे. ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें या संस्थेमार्फत साहित्यसंमेलनें, व्याख्यानें, चर्चा, पुस्तकांचीं व चित्रांचीं प्रदर्शनेंहि भरविलीं जातात. श्री. अंबादास पुणतांबेकर यांच्या नांवाचा उल्लेख केल्याशिवाय मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेचा इतिहास पूर्णच होऊं शकत नाहीं. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयास आजची स्थिति प्राप्त होण्यास या एकनिष्ठ स्वयंसेवकाचे प्रयत्न कारणीभूत झाले.

इ. स. १९११ मध्यें पुण्यास 'पुणें मराठी ग्रंथालय' या संस्थेचा उदय झाला. इ. स. १९३० मध्यें स्वतःची इमारत होईपर्यंत या ग्रंथालयास तीन निरनिराळ्या ठिकाणीं आपलें वास्तव्य ठेवावें लागलें. या संस्थेला कै. नारायणराव भवानराव पावगी, कै. न. चिं. केळकर, कै. शि. म. परांजपे या विद्वान् मंडळींचें सहकार्य मिळालें. त्याचप्रमाणें या संस्थेस आजची परिस्थिति प्राप्त करून देण्यास म. म. दत्तो वामन पोतदार व श्री. ज. स. करंदीकर यांनींहि फार परिश्रम केले. या ग्रंथालयांत आज सुमारें १०००० ग्रंथ असून वर्गणीदारांची संख्या सुमारें हजार आहे.

## महाराष्ट्र ग्रंथालय

वरील प्रसिद्ध ग्रंथालयाशिवाय इ. स. १९२३ पर्यंत लहान-मोठीं, मोफत अशीं अनेक सार्वजनिक ग्रंथालयें महाराष्ट्रांत सुरू झालीं. परंतु त्या सर्वांची यादी येथें स्थलाभावीं देणें शक्य नाहीं. महाराष्ट्रांतील सार्वजनिक ग्रंथालयांच्या इतिहासाचें नवीन दालन इ. स. १९४७ मध्यें निर्माण झालें. मुंबई सरकारनें इ. स. १९३९ मध्यें नेमलेल्या 'ग्रंथालय-प्रसार-समिती' च्या शिफारशी-अन्वयें पुण्यास मार्च १९४७ मध्यें 'मुक्तद्वार' या सरकार-पुरस्कृत 'प्रादेशिक' ग्रंथालयाची स्थापना झाली. ज्यांच्या परिश्रमानें हें प्रादेशिक ग्रंथालय स्थापन झालें ते आपल्या प्रांताचे पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर यांच्याच हस्तें या ग्रंथालयाचा उद्घाटनसमारंभ दि. २१-१२-४७ ला झाला. या ग्रंथालयाची सर्व व्यवस्था 'महाराष्ट्र ग्रंथालय-समिति' या

६ शं. ग. दाते—'मराठी ग्रंथालयांची सद्यःस्थिति'. (पंचारती, पृ. ८४)










# महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयें

समितीकडून पाहिली जाते. या समितीवर बहुतेक सर्व स्थानिक प्रमुख ग्रंथालयांचे एक एक व नगरपालिकेचा एक असे प्रतिनिधी आहेत.

मराठी भाषेंत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक ग्रंथाची निदान एक तरी प्रत या ग्रंथालयांत 'जतन' केली जाईल. या सोयीमुळें दुर्मिळ व बहुमोल ग्रंथ संशोधकांना संदर्भासाठीं केव्हांहि मिळूं शकतील. सध्यां या ग्रंथालयांत सुमारें २७००० ग्रंथ आहेत. केवळ ग्रंथसंग्रह करणें व वाचक मागतील त्यावेळीं त्यांना ग्रंथांचा उपयोग करूं देणें एवढें संकुचित ध्येय या ग्रंथालयाचें राहणार नाहीं तर या संस्थेमार्फत (१) वाचकांनीं विचारलेल्या प्रत्येक प्रश्नाबद्दल उपलब्ध अशी माहिती पुरविण्यांत येईल, (२) ज्ञानविषयक सर्व साधनांचा संग्रह केला जाईल, (३) मराठी भाषेंत प्रसिद्ध झालेलें प्रत्येक पुस्तक, वृत्तपत्र, पुस्तिका आणि पत्रक, एखादें चिटोरेंहि या ठिकाणीं जतन करण्याचा प्रयत्न केला जाईल, (४) ग्रंथालय चळवळीच्या प्रगतीसाठीं जरुरीप्रमाणें मार्गदर्शन केलें जाईल.

पुण्याच्या 'महाराष्ट्र ग्रंथालया'च्या स्थापनेनंतर गेल्या दोन वर्षांत महाराष्ट्रांत नाशिक, सातारा सोलापूर, नगर, ठाणें, कुलाबा, रत्नागिरी, पूर्व खानदेश व पश्चिम खानदेश इ० जिल्ह्यांत सरकारनें जिल्हानिहाय 'मुक्तद्वार ग्रंथालयें' स्थापन केलीं आहेत.

## आजचा वाचक व ग्रंथालयें

गेल्या शतकांत महाराष्ट्रांत कोणकोणतीं प्रमुख ग्रंथालयें स्थापन झालीं याचा ओझरता आढावा वर दिलेलाच आहे. आतां ग्रंथालयांशीं निगडित असलेला वाचकवर्ग, ग्रंथसंग्रह, ग्रंथालयांची आर्थिक स्थिति यांच्यांत गेल्या शतकांत काय फरक झाला तें पहाणें उद्बोधक ठरेल.

ग्रंथालयांबद्दल आजच्या काळांतहि सर्वसाधारण समाजाला आकर्षण किंवा आस्था वाटत नाहीं. पुण्यांत 'महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालयाची' स्थापना होऊन दोन वर्षें झालीं तरी पण अनेक सुशिक्षित लोकांनाहि अशा प्रकारच्या ग्रंथालयाच्या अस्तित्वाची माहिती नाहीं! ग्रंथालयाचा उपयोग मोफत करूं दिला तरी पुण्यासारख्या सुशिक्षितांचा भरणा असलेल्या शहरांत आज फक्त शेंकडा ६ टक्के नागरिक या 'मुक्तद्वार' ग्रंथालयाचा फायदा घेतात. दोन वर्षांपूर्वीचा वसंतव्याख्यनमालेंतील प्रसंग. एका पदवीधर व 'दीक्षित' ( trained ) ग्रंथपालानें, ग्रंथालयांचें उद्दिष्ट साधण्यासाठीं यापुढें तरी प्रत्येक ग्रंथालयांत पदवीधर व 'दीक्षित' ग्रंथपाल नेमणें कां आवश्यक आहे याबद्दलचें विवेचन केलें. त्याच्या भाषणानंतर एक वृद्ध गृहस्थ उठले व म्हणाले कीं, "हे ग्रंथपाल स्वतःच्या धंद्याविषयीं नसतें स्तोम माजवीत आहेत!" त्यांनीं पुढें असेंहि सांगितलें कीं "पुण्यांत अनेक ठिकाणीं पैसा, दिडकी इ० वाचनालयें आहेत. या वाचनालयांत पदवीधर किंवा 'दीक्षित' ग्रंथपाल कुठें आहेत? आणि ते नाहींत म्हणून आमचें थोडेंच अडलें आहे? आम्हांस नाटकें, कादंबऱ्या वाचण्यासाठीं काढून देण्यास अशा प्रकारच्या ग्रंथपालाची जरूरी तरी काय!" याचा अर्थ एवढाच कीं पैसा वाचनालयें किंवा दिडकी वाचनालयें यांच्या व्यतिरिक्त इतर प्रकारचीं ग्रंथालयें असतात व त्यांत चटोर ग्रंथांपेक्षां निवडक विषयांच्या ग्रंथांचा व संदर्भग्रंथांचा संग्रह केलेला असतो याची जाणीव आजहि बहुसंख्य लोकांना नाहीं. ग्रंथालयाचें कार्य म्हणजे ग्रंथांचा संग्रह करणें व ते कुणीं वाचावयास मागितल्यास देणें अशीच सर्वांची आजहि समजूत दिसते. समाजाला हरएक बाबतींत माहिती देणें हें ग्रंथालयाच्या कार्यांपैकीं एक महत्त्वाचें अंग आहे. याबाबतींत मुंबईच्या United States Information Bureau चें कार्य अत्यंत प्रशंसनीय आहे. याच्या छोट्याशा वाचनालयांत तुम्हीं कोणत्याहि प्रश्नावर माहिती विचारण्याचाच अवकाश कीं तेथील सेवकवर्ग तुम्हांस हवी असलेली माहिती थोडक्याच वेळांत देतो. अशा असंख्य प्रश्नांबद्दल तात्काळ माहिती पुरविणारा सेवकवर्ग बहुश्रुत, विद्वान् असल्याशिवाय कसें भागेल! मनुष्याच्या ज्ञानालासुध्दां मर्यादा आहेच. एकाच विषयाबद्दल अधिकारवाणीनें बोलूं शकणारा विद्वान् दुसऱ्या विषयांत तितकाच पारंगत असेलच असें नाहीं. ग्रंथपालाबद्दल अपेक्षा बाळगतांना देखील वरील विधानाची सत्यता मनाशीं बाळगणें आवश्यक ठरतें. ग्रंथपालालासुद्धां








सर्वच गोष्टींची एकदम उत्तरें देतां येतात असें नाहीं; तर यासाठीं त्यास अनेक संदर्भ-ग्रंथांची मदत घ्यावी लागते. कोणत्या माहितीसाठीं नेमका कोणता संदर्भ ग्रंथ चाळावा लागेल याचें मात्र ग्रंथपालाला ज्ञान पाहिजे. ग्रंथालयांत बहुश्रुत, विद्वान् ग्रंथपाल असावा याबद्दल सुद्धां आज आमच्यांत एकवाक्यता नाहीं. एकीकडे श्री. बाळासाहेब खेर, श्री. काकासाहेब कालेलकर, श्री. भाऊसाहेब सोमण यांच्यासारखी थोर मंडळी ग्रंथपालाच्या विद्वत्तेवर व बहुश्रुतपणावर भर देतांना आढळतात तर आमच्या ग्रंथालयांत अशा ग्रंथपालाची जरूरच नाहीं अशा प्रकारचें मतप्रदर्शन पुण्यांतल्या प्रमुख सार्वजनिक व्यासपीठावरून केलें जातें ही दुर्दैवाची गोष्ट आहे !

कोणत्याहि ग्रंथालयाच्या उत्कर्षास चालकांच्या प्रमाणेंच वाचकवर्गाचेंहि सहकार्य लाभावें लागतें. परंतु आजचा सुशिक्षित वाचकही ग्रंथालयांच्या बाबत आपली जबाबदारी पाळीत नाहीं. ग्रंथालयाचे नियम मोडणें, पुस्तकें वेळचेवेळीं परत न करणें, वाचावयास नेलेलीं पुस्तकें चांगल्या रीतीनें न हाताळणें, वर्गणी न देणें इ० प्रकारची वर्तणूक म्हणजे आपला जन्मसिद्ध हक्कच आहे असें कांहीं वाचक समजतात. दुसऱ्या प्रकारचा वाचकवर्ग असा असतो कीं, त्याला पुस्तकांच्याबद्दल अत्यंत आस्था असल्यामुळेंच वाचनालयाच्या व्यवस्थापकांना पुस्तकांच्या केवळ सुस्थितीबद्दलच नव्हे, तर अस्तित्वाबद्दलहि भय बाळगावें लागतें ! अशा वाचकांच्या मनोवृत्तीचें चित्र कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं अत्यंत मार्मिक तऱ्हेनें रेखाटलें आहे: ' असे वाचक आपल्या आवडत्या पुस्तकांच्या किंमतीच्या अनेकपट किंमत भरून देण्यास नेहमीं तयार असतात. अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टींतील जुने कंदील घेऊन त्यांच्या मोबदल्यांत नवे कंदील देणाऱ्या जादूगाराप्रमाणें या लोकांस कोऱ्याकरकरीत पुस्तकांची आवड नसून जुन्या पुस्तकांचीच असते. एके काळीं तारुण्यमदानें धुंद असलेल्या पण हल्लीं जरठ झालेल्या मुक्तामाला, मंजुघोषा, रत्नप्रभा, वसंतकोकिला इत्यादिकांस पळविण्यांत त्यांना हास्यास्पद असें कांहीं वाटत नाहीं ! प्रत्यक्ष घाशीराम कोतवालाची सदेह चोरी करण्यांत यांना विशेष अभिमान वाटतो ''.[७]

कांहीं ग्रंथालयांचे वर्गणीदार आपल्या ग्रंथालयाच्या द्वारें जनहिताचीं कामें करण्याऐवजीं ग्रंथालयाच्या व्यासपीठाचा उपयोग निवडणुकांचे फड जिंकण्यासाठीं अथवा स्वतःचा स्वार्थ साधण्याकडे करितात. जीवनोपयोगी सर्व वस्तूंच्या किंमती पांचपट सहापट वाढल्या तरी त्या आम्हीं विनतक्रार देतो, पण छपाईची किंमत वाढल्यानें ग्रंथांच्या किंमतींत वाढ झाल्यानें ग्रंथालयाच्या चालकांनीं जर थोडीशी वर्गणी वाढविली तर आमचा वाचकवर्ग आकाशपाताळ एक करतो ! कांहीं वाचकांच्या मोठेपणाच्या कल्पना भलत्याच विचित्र असतात. वेळचेवेळीं पुस्तकें परत करण्यांत सर्वांचीच सोय साधते. कांहीं कांहीं वाचक आपल्याकडे महिनेच्या महिने पुस्तकें ठेवून देतात व तीं परत करण्याची ग्रंथपालानें 'नम्र विनंति' केल्यास त्यांना कसेंसेंच वाटतें. अशा तऱ्हेचे अनेक दाखले देतां येतील. ज्याला ग्रंथालयनीति असें म्हणतात ती आपल्या समाजांतून बव्हंशीं नष्ट झाली आहे ! ही गंभीर स्थिति सुधारणें-त्वरेनें सुधारणें-अगत्याचें आहे.[८]

गेलीं शंभर वर्षे आपला देश पारतंत्र्यांत खितपत पडल्यानें पेशवाईच्या अस्तानंतर महाराष्ट्राची स्थिति होती तीच थोड्याफार अंशानें कायम होती. बहुसंख्य समाज अद्याप निरक्षरच राहिल्यामुळें ग्रंथालयांची व वाचनालयांची गरज फक्त पांढरपेशा वर्गालाच भासत होती. आणि या सुशिक्षित समजल्या जाणाऱ्या वर्गाच्या ज्ञानवाढीबद्दलच्या आकांक्षा मर्यादितच राहिल्यानें पाश्चात्य देशांच्या मानानें या देशांत अपेक्षित प्रमाणांत ग्रंथालयांची सुधारणा झाली नाहीं. इ. स. १९३८ मध्यें अखिल हिंदुस्थानांत १००० ग्रंथालयें होतीं तर हिंदुस्थानच्या सुमारें एकतृतीयांश लोकसंख्या असलेल्या अमेरिकेंत

७ कै. श्री. कृ. कोल्हटकर—मराठी ग्रंथसंग्रह ( कोल्हटकरांचा लेख-संग्रह, पृ. ६८५ )
८ शं. ग. दाते—मराठी ग्रंथालयांची सद्यःस्थिति ( पंचारती, पृ. ८९ )










# महाराष्ट्रांतील सार्वजनिक मराठी ग्रंथालयें

प्रमुख अशी ग्रंथालयें ३००० वर होतीं. महाराष्ट्रांत अहमदनगर, नाशिक, मुंबई, पुणें, बेळगांव, ठाणें कोल्हापूर, सातारा, सावंतवाडी, धारवाड, सोलापूर, धुळें, वसई, कल्याण, उरण, भिवंडी, हुबळी, पेण, अलिबाग इ० ठिकाणच्या ग्रंथालयांतून इ. स. १८८० ते १८८४ च्या सुमारास ग्रंथसंख्या किती होती तें पाहणेंहि मौजेचें आहे. २००० पेक्षां अधिक ग्रंथ कोणत्याच ग्रंथालयांत दिसत नाहींत. त्यांत शेंकडा ८० टक्के इंग्रजी, १०-१२ टक्के मराठी, बाकी ८ टक्के इतर भाषांतील, अशी सर्वसाधारण विभागणी होती. विचार करण्यासारखी गोष्ट अशी होती कीं १८८४ सालापर्यंत मराठी भाषेंत छापलेल्या ग्रंथांची संख्या जवळ जवळ पांच हजारांवर होती तरी वरील ग्रंथालयांतून मोठ्या मिनतवारीनें दोनशें तीनशेंच मराठी ग्रंथांचा संग्रह केलेला दिसत होता[९]; महाराष्ट्रांतील ग्रंथालयांतलि ग्रंथसंख्या यानंतर दिवसेंदिवस वाढतच गेली. परंतु ग्रंथसंग्रह करण्यापलीकडे त्यांची मजल गेली नाहीं व ग्रंथसंग्रहहि एका विशिष्ट वर्गाच्या दृष्टींनेंच वाढविला गेला. विचारनिष्ठ वाङ्मयापेक्षां मनोरंजनात्मक वाङ्मय वाढविण्याकडे आमचें विशेष लक्ष. प्रत्येक सार्वजनिक ग्रंथालयांत त्याच कादंबऱ्या व ठराविक लघुकथा यांचा संग्रह करण्याची प्रवृत्ति आजहि प्रचलित दिसते. कांहीं कांहीं ग्रंथालयांतून एकेका कादंबरीच्या दोन दोन तीन-तीन प्रती दिसतात पण आवश्यक 'संदर्भ-ग्रंथांचें' अस्तित्व आढळत नाहीं.

निरक्षर व साक्षर-म्हणजे अक्षरओळख झालेले पण शिक्षण न मिळालेले असे जे इतर दोन वर्ग आहेत त्यांच्याबाबत मात्र आमच्या ग्रंथालयांनीं कांहींच केलें नाहीं. समाजांतलि सर्व थरांच्या नागरिकांना ज्ञान देणें हेंच ग्रंथालयांचें खरें ध्येय आहे अशी पाश्चात्य देशांची ठाम समजूत झाल्याकारणानेंच हीं राष्ट्रें समाजाच्या ज्ञानवृद्धीसाठीं रेडिओ, चित्रपट, व्याख्यानें, चर्चा, प्रदर्शनें इ०. साधनांचा अवलंब करतात व अशा कार्यांत पाश्चात्य देशांतील ग्रंथालयें प्रामुख्यानें भाग घेतात. परंतु या सर्व गोष्टी ज्यावेळीं द्रव्याचें पाठबळ असतें तेव्हांच करतां येतात आणि आपल्या देशांत नेमकी तीच मोठी अडचण आहे.

महाराष्ट्रांतील बहुसंख्य सार्वजनिक ग्रंथालयांची सांप्रतची आर्थिक परिस्थिति हलाखीची आहे. युद्धोत्तर परिस्थितीमुळें तर जमा आणि खर्च यांची मिळवणी करतां करतां हीं ग्रंथालयें मेटाकुटीस आलीं आहेत. आज वर्गणीरूपानें द्रव्य मिळते त्यावर उद्याच्या ग्रंथालयाचा संसार थाटणें यापुढे तरी जमणार नाहीं. सार्वजनिक ग्रंथालयांचें अस्तित्व यापुढें टिकवावयाचें असेल तर सरकारप्रमाणेंच नगरपालिकांनीं व इतर सार्वजनिक संस्थांनीं त्यांना मदत दिलीच पाहिजे. अशी परिस्थिति निर्माण झाल्यास जीं ग्रंथालयें आज फक्त वर्गणीदारांचींच समजलीं जातात तीं सर्व जनतेचीं होतील.

महाराष्ट्राच्या सुदैवानें, श्री. बाळासाहेब खेर यांच्यासारख्या थोर व्यक्तीकडे ग्रंथालयचळवळीचें धुरीणत्व गेलें आहे. या ग्रंथालयांच्या जोपासनेचें कार्य आज जरी सरकारनें हातीं घेतलें असलें तरी या सत्कार्याला धनिकांच्याकडून पाठिंबा मिळाला पाहिजे. अँड्र्यू कॉर्नेजी यांचें नांव सर्वांच्या परिचयाचे आहे. या सद्गृहस्थानें ग्रंथालयांच्या मदतीस म्हणून एक खास द्रव्यनिधि ठेवलेला आहे व इंग्लंड देशांत जेव्हां जेव्हां ग्रंथालयाची नवीन इमारत बांधतात किंवा एखाद्या मोठ्या शहरांत ग्रंथालयाच्या शाखा उघडतात तेव्हां तेव्हां या निधींतून या नवीन संस्थांना अत्यंत सढळ हातानें मदत करण्यांत येते.[१०] ग्रंथालयांच्या वाढीबाबत व ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें त्यांची सर्वांगीण प्रगति करण्याबाबत आज अमेरिकेनें उच्चांक गांठला आहे. रसेल, रॉकफेलर, कॉर्नेजी यांच्यासारख्या नवकोट नारायणांनीं या कामीं मोठमोठ्या देणग्या दिल्या म्हणूनच अमेरिकन ग्रंथालयांना आजची स्थिति प्राप्त झाली आहे.

---

९ शं. ग. दाते-मराठी ग्रंथालयांची सद्यःस्थिति (पृ. ८३)

१० डॉ. पु. म. जोशी-सुस्वागतम् (पंचारती, पृ. ४०)








प्रा. श्री. मा. कुलकर्णी

# रसाचें व्यवच्छेदक लक्षण

गेल्या दोन-अडीच-हजार वर्षांच्या काळांत साहित्य—शास्त्रकारांनीं रसचर्चा केलेली आहे. रस-निष्पत्ति, रसास्वाद व त्यापासून होणारा आनंद, रसांची संख्या इ० अनेक विवाद्य प्रश्न आजवर चर्चिले गेले-जात-आहेत. अेका गोष्टीकडे मात्र द्यावें तितकें लक्ष या चर्चेंत दिलें गेलें नाहीं. डॉ. वाटवे यांच्या रसविमर्शांतून अेक उतारा पुढें दिला आहे:

"काव्यांतील पात्राचे ठायीं 'स्थिरवृत्ति' असते. ता स्थिरवृत्ति विषयदर्शनानें जागृत झाली कीं तिला बाह्य उद्दीपन मिळतें. पुढें या उद्दीपित स्थिर-वृत्तीभोंवतीं इतर दुय्यम भावना येतात (व्यभि-चारी भाव), व त्या सर्वांचा परिणाम म्हणून त्या पात्राच्या शरीरावर कांहीं अभिव्यंजन दिसतें (अनुभाव). हेच काव्यांतील आलंबन विभाव (यांत पात्रांची स्थिरवृत्ति आलीच), उद्दीपन विभाव, व्यभिचारी भाव व अनुभाव होत. यांचा संयोग वाचकांच्या स्थायीभावाशीं (स्थिरवृत्तीशीं) होऊन त्याचे ठिकाणीं रस निष्पन्न होतो व त्यामुळें त्याचेहि ठिकाणीं व्यभिचारी भाव उत्पन्न होऊन अनुभाव दिसूं लागतात.

"तात्पर्य, काव्यगत पात्रांचे ठायीं स्थायी भाव असतात. व्यभिचारी भाव व अनुभाव हेहि त्याचेच आहेत व त्यालाहि उद्दीपन व आलंबन लागतेंच. काव्यांतील नायकाची जी सामग्री तीच प्रायः रसिकाची. काव्यनायकाची सामग्री प्रत्यक्ष सृष्टींतील असते तर रसिकाची सामग्री मनःकल्पित येवढाच फरक." —रसविमर्श पृ० १००

शकुन्तलादि आलंबन – उद्दीपन – विभावामुळें दुष्यन्ताच्या ठिकाणीं जागृत झालेली रतिभावना व तिचें अभिव्यंजन आणि तो प्रसंग पाहून रसिकाच्या रतिस्थायिभावाला मिळालेली चालना व त्याच्याहि ठिकाणचें भावनाभिव्यंजन यांची सामग्री जर एकच आहे (वरील उताऱ्यावरून तीं तशी आहे हें उघड आहे), तर दुष्यन्ताच्या अनुभवाला शृंगार व रसिकाच्या अनुभवाला शृंगार-रस असें भिन्न नामाभिधान कां ? थोडक्यांत म्हणजे काव्यगत आलंबन उद्दीपन-विभावादींमुळें काव्यगत पात्रांच्या ठायीं जागृत झालेली भावना व काव्यवाचनामुळें रसिक हृदयांत उदित झालेली तत्सदृश भावना यांत भेद काय ? एकीला रस कां म्हणूं नये व दुसरीला रस कां म्हणावें ? येथें रसाचें व्यवच्छेदक लक्षण काय ?

## दुहेरी अनुभव हा रस होऊं शकेल कां ?

याचें उत्तर देण्याचा न. चिं. केळकरांनीं प्रयत्न केला आहे. ते म्हणतात: "कोणत्याहि रसाचा स्थायी भाव क्षणभर दुसऱ्याचा घेऊन आपलासा केल्याशिवाय रसप्रतीति होत नाहीं. प्रत्यक्ष आपली मुलगी सासरीं चालली असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण बोलतों ते आपणांला काव्य नव्हे. तो आत्मभूमिकेवरचा एकेरी अनुभव. पण तेंच शाकुन्तलाच्या चवथ्या अंकांतील कण्वावरचा कन्याविरहप्रसंग वाचीत असतां डोळ्यांतून पाणी गाळीत जे शब्द आपण वाचतों ते मात्र आपणाला काव्य किंवा वाङ्मय. कारण, येथें एकाऐवजीं दोन भूमिका होतात. वाचक आपली भूमिका न सोडतां मनानें दुसऱ्या भूमिकेवर संक्रमण करितो व प्रतिभेनें अनुभव घेतो. म्हणून तें दुःख नसून रसास्वादाचा आनंदच होय."

वरील उताऱ्यावरून श्री. केळकरांचें म्हणणें असें दिसतें कीं अनुभव एकेरी असेल तर तो रस








नव्हे, दुहेरी असेल तर तो रस. शाकुन्तलांतील वरील प्रसंगाला ही उपपत्ति लागू पडते. कारण इथें कण्वालाहि दुःखाचा अनुभव येतो व तो रसिकानें उसना घेतला कीं त्याला दुहेरी अनुभव येऊन रस-प्रतीति येते. परंतु सर्वच रसांच्या बाबतींत व सर्वच प्रसंगीं हा दुहेरी अनुभव मिळण्यासारखा नसतो. हास्यरसाच्या बाबतींत हें अधिक स्पष्ट होण्यासारखें आहे. परिस्थितिजन्य विनोद हा श्रेष्ठ समजण्यांत आला आहे. कोणत्याहि पात्राला आपण विनोद करीत आहोंत अथवा यावेळीं विनोद निर्माण होत आहे याची जाणीव अशा विनोदाच्या वेळीं नसते. सर्वच पात्रें आपापल्या परिस्थितीप्रमाणें वागत असतात. परंतु परिस्थितीच अशी कांहीं बनते कीं प्रेक्षकांना मात्र त्यांतून विनोद लुटतां यावा. आतां इथें नाटकांतील एकाहि पात्राचा अनुभव उसना घेतां येण्यासारखा नाहीं. तरी पण आपणांला हास्यरसाचा अनुभव येतो. आणखी एका उदाहरणानें हें अधिक स्पष्ट होण्यासारखें आहे. अशी कल्पना करा कीं एका नाटकांत असें एक दृश्य आहेः एक भयंकर अपघात होतो व त्यांत एका पति-पत्नींचा अन्त होतो. नेमकें त्याच वेळीं त्या पति-पत्नींचें ३-४ वर्षांचें मूल घरीं आनंदानें खेळत असतें. या दोन दृश्यांतील विरोध पाहून आपणांला करुण-रसाची प्रतीति होते. यावेळीं दुसऱ्या कुणाचा करुण अनुभव आपण उसना आणिला का ?

तात्पर्य, दुहेरी अनुभव हें कांहीं रसत्वाचें व्यवच्छेदक नव्हें. तर मग पात्रांचा शृंगार व रसिकांचा शृंगाररस यांत भेद काय ? या भेदाचें स्वरूप निश्चित न केल्यामुळें रसाच्या विवेचनांत अनेक विवाद्य प्रश्न उत्पन्न झाले आहेत. हा भेद जाणल्याशिवाय शोकरसापासून आनंद कां व्हावा हें अनाकलनीय आहे. हा भेद न जाणल्यामुळेंच रस हा काव्यगत कीं रसिकगत, हा प्रश्न विवाद्य ठरला आणि काव्य-वाचनापासून आनंद कां व्हावा हें सांगतांना तर साहित्यशास्त्रकारांची मोठीच धांदल उडाली. या धांदलींतच रसचर्चेत अनेकांनीं नटाला ओढिलें. वास्तविक रसचर्चेत नट एक स्वतंत्र टप्पा मानणें हें हास्यापद आहे. या सर्व गोंधळाचें कारण म्हणजे रसाच्या व्यवच्छेदक लक्षणाचा विचार आजवर कोणी केला नाहीं. तोच यापुढें थोड्याशा विस्तारानें करावयाचा आहे.

## मूलभूत भावना व सहचारी विकार

मानवी मनांत ज्या मूलभूत भावना असतात त्या प्रत्येक भावनेचा एक सहचारी विकार असतो. क्रोध काय, भय काय, किंवा रति काय ? या सहचारी विकारांचें विवेचन मानसशास्त्रज्ञांनीं बहुधा केलेलें दिसत नाहीं. परंतु आपण स्वतःचा अनुभव जर शास्त्रीय रीतीनें तपासूं तर हें स्पष्ट होईल. प्रथम आपण या सहचारी विकारांना कांहीं नांवें देतां आलीं तर पाहूं. क्रोध; सहचारी विकार, संताप. रति; सहचारी विकार, काम वगैरे. ज्या ज्या वेळीं एखादी भावना जागृत होते त्या त्या वेळीं हा तिचा सहचारी विकारहि जागृत होतो. आतां यांत भेद कसा करायचा ? क्रोधाचे दोन प्रसंग घेऊंः

( १ ) एक अशिक्षित माणूस त्याला कोणी शिवी दिल्यामुळें रागावला आहे. तो तोंडानें बडबड करील. स्वतःहि शिव्या देईल. क्रोध अनावरच झाला तर त्याच्या अंगावर धांवून जाईल.

( २ ) एक सुसंस्कृत माणूस वरीलसारख्याच प्रसंगीं निराळा वागेल. तो शिव्या देणार नाहीं, अंगावर धांवून जाणार नाहीं. नुसतें त्याच्याकडे पाहील व पुढें जाऊं लागेल.

दोघांहि व्यक्तींना क्रोध आला असतांना दोघांच्या भावनाभिव्यंजनांत हा फरक कशामुळें झाला ? याचें कारण आपण शोधायला लागलों तर असें दिसेल कीं, पहिला माणूस हा विकारांच्या आहारीं गेला म्हणून तसें वागला. याचाच अर्थ असा कीं, त्याच्या क्रोधाच्या जोडीला एक सहचर विकार होता. या विकाराला नांव कांहींहि दिलें तरी चालेल, अथवा न दिलें तरी चालेल. परंतु प्रत्येक भावनेचा असा एक सहचारी विकार असतो हें मात्र खरें.

या विकारांना विवेकाच्या जोरावर ताब्यांत ठेवणें शक्य आहे. इतकेंच नव्हें तर श्रेष्ठ प्रतीच्या व्यक्तींना या विकारांचें पूर्ण दमनहि शक्य आहे. म्हणूनच वरील उदाहरणांत सुसंस्कृत माणसाच्या क्रोधाबरोबर हा विकार फारसा दिसला नाहीं. आणखी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ज्याला







आपण भावनाभिव्यंजन म्हणतों, त्यांत बराच भाग या विकाराभिव्यंजनाचाच असतो. हें लक्षांत न घेतल्यामुळें जेम्स व लँग या अमेरिकन मानसशास्त्रज्ञांनीं भावनाभिव्यंजनालाच भावनेचें कारण मानलें. त्यांचें म्हणणें असें कीं, "We feel sorry because we cry, angry because we strike, afraid because we tremble". हें अर्थातच मान्य झालें नाहीं. कित्येक वेळां भावना जागृत होऊन सुद्धां तिचें अभिव्यंजन होत नाहीं. हें अर्थातच, अभिव्यंजन हें बहुधा विकाराचेंच असतें, म्हणूनच शक्य होतें. 'सात्विक क्रोध', 'शुद्धप्रेम' असे शब्द प्रयोग आपण करतो. त्याचा अर्थ वरील विवेचनाच्या आधारानेंच अधिक स्पष्ट होण्यासारखा आहे.

विकाररहित प्रेम तें शुद्ध प्रेम. विकाररहित क्रोध तो सात्विक क्रोध.

## शुद्ध आनंद केव्हां होतो ?

तेव्हां प्रत्येक भावनेबरोबर एक विकारहि असतो. व्यवहारांत चेतक वस्तूमुळें जेव्हां एखादी भावना जागृत होते, तेव्हां हा विकारहि कमी-अधिक प्रमाणांत जागृत होतो. या विकाराचें प्राबल्य जितकें अधिक तितका आपणांला त्रास अधिक. हा विकार कमी करण्याचे अथवा कमी प्रमाणांत जागृत होण्याचे दोन मार्गः

(१) विवेकानें विकाराचें दमन करणें.

(२) चेतक वस्तूच विकारांना जागृत करण्यास असमर्थ असणें—परंतु दुसरा मार्ग व्यवहारांत जवळ जवळ अशक्य. व पहिल्या मार्गाचें अवलंबन करून विवेकानें विकाराचें दमन केलें तरी मुळांतच विकारजागृति न झाली तर उत्पन्न होणाऱ्या अवस्थेपेक्षां ही अवस्था अर्थातच कमी सुखकारक होय.

मूळ शुद्ध भावनेच्या जागृतीमुळें आपणांस सुखच होतें. मात्र विकाराच्या मिश्रणामुळें अशा भावजागृतीपासून शुद्ध आनंद होऊं शकत नाहीं. कांहीं विकारांचें स्वरूप सुखप्रद व कांहींचें दुःखप्रद असतें. म्हणून भावनाजागृतींत सुखप्रद विकाराच्या मिश्रणामुळें कमी प्रतीचा कां होईना आनंदच होतो व दुःखप्रद विकारांच्या मिश्रणामुळें दुःख होतें. परंतु विकाररहित भावजागृतीमुळें मात्र शुद्ध आनंदच होतो.

या विवेचनाच्या प्रकाशांत पात्रगत भावना व रसिकगत रस यांतील भेद शोधूं लागल्यास तो सहज दिसणारा आहे. शकुंतलेला पाहून दुष्यन्ताच्या ठायीं रति हा स्थायिभाव जागृत झाला पण त्याबरोबरच विकारजागृतिहि झाली. परंतु रसिकांच्या ठायीं मात्र वरील विभावामुळें केवळ रति हा स्थायिभावच जागृत होईल. विकार जागृत होणार नाहीं. एका ठिकाणीं रति व तिचा सहचारी विकार, दोन्हीं जागृत झाले आहेत. दुसऱ्या ठिकाणीं केवळ शुद्ध अशा रतिभावाचीच जागृति झाली. एका ठिकाणीं विकार आहे, दुसऱ्या ठिकाणीं तो नाहीं. हाच दोहोंतील फरक. यामुळेंच एकाला शृंगार व दुसऱ्याला शृंगाररस म्हणायचें. **विकाराचा अभाव हेंच रसाचें व्यवच्छेदक लक्षण होय.**

## करुणरसापासून आनंद कां व्हावा ?

शुद्ध भावनेबरोबरच विकारजागृति झाली तर रसोत्पत्ति होणार नाहीं. विप्रलंभशृंगार व संभोगशृंगार यांत पहिल्याला अधिक श्रेष्ठ मानण्याचें कारण पहिल्यानें विकारजागृति होत नाहीं. दुसऱ्यानें कांहीं प्रमाणांत तरी ती होते, निदान होणें संभवनीय असते. नागेशानें 'सितास्वयंवरां'त सीतेच्या अंगप्रत्यंगांचें केलेलें उत्तान वर्णन हें शृंगाररसपरिपोषक होऊं शकत नाहीं. याचें कारण अशा वर्णनापासून शुद्ध रति-स्थायिभावालाच फक्त चालना मिळण्याऐवजीं काम विकारालाहि चालना मिळते—मिळणें संभवनीय असतें.

नाटकांतील अथवा बोलपटांतील एखादें करुण दृश्य पहातांना कांहीं भाबड्या प्रेक्षकांना हुंदके अनावर होतात. याचें कारण त्यांच्या ठिकाणीं विकारजागृति होते. आणि म्हणून लोकांना रसप्रतीति होत नाहीं. श्रीधरांच्या पांडव-प्रतापांतील अभिमन्युवधाचा कथाभाग ऐकवत नाहीं म्हणून उठून जाणाऱ्या भोळ्या स्त्रिया मला माहीत आहेत. त्यांना अर्थातच त्यापासून रसप्रतीति होणें शक्य नाहीं. उलट मला तो प्रसंग नेहमीं वाचावासा वाटतो. वरील विवेचनाचा अर्थ इतकाच कीं काव्य-








# रसाचें व्यवच्छेदक लक्षण

वाचनापासून सुद्धां जर शुद्ध भावनेच्या जोडीला विकारजागृति झाली तर रसप्रतीति होणार नाहीं. म्हणजे रसत्वाला विकारांचा अभाव आवश्यक आहे. हें जाणूनच बहुधा ज्ञानेश्वरांनींहि—

हें शब्देंविण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोला आदी झोंबिजे । प्रमेयासि ॥

अशी ग्रंथसेवनाची 'परि' सांगितली असावी. इंद्रियांना चोरून ग्रंथसेवन करावें कारण इंद्रियांचें साहचर्य म्हणजे विकारांचें साहचर्य. विकाररहितत्वाशिवाय शुद्ध रसप्रतीति नाहीं म्हणूनच 'इंद्रियां नेणतां भोगायचें.'

रस्त्यानें जातांना एखादा गृहस्थ पडला आणि त्याला कांहीं इजा झाली नाहीं असें कळलें कीं लोक मनसोक्त हंसतात. ही शुद्ध हास्यरसाची प्रतीति मानायला हरकत नाहीं. कारण येथें विकारजागृति नाहीं, परंतु व्यवहारांत असे प्रसंग विरळा. कारण व्यवहारांत आपले अनेक हितसंबंध गुंतलेले असतात. म्हणूनच रसप्रतीतीचे प्रसंग स्वार्थनिरपेक्ष अशा काव्यसृष्टींतच अधिक.

काव्यवाचनापासून रसाची प्रतीति सहृदय रसिकालाच येते. कारण काव्यवाचनाचे वेळीं तटस्थ कसें रहावें हें त्याला नीट समजतें. थोडक्यांत म्हणजे तो विकाराच्या आहारीं जात नाहीं.

विकार जागृत होण्याचीं जीं दोन कारणें अथवा मार्ग वर सुचविले ते दोन्ही काव्यवाचनाच्या वेळीं ( रसिकाच्या बाबतींत ) उपस्थित असतात. म्हणूनच शुद्ध भावनाच जागृत होते आणि म्हणूनच रसप्रतीति होते.

रसत्वाचें व्यवच्छेदक लक्षण विकारांचा अभाव हें ठरल्यानंतर, करुणरसात्मक काव्याच्या वाचनामुळेंहि आनंद कां व्हावा हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. कारण कोणतीहि भावना शुद्ध स्वरूपांत जागृत झाली कीं तिच्यामुळें आनंदच होतो.

रसत्वाचें हें व्यवच्छेदक लक्षण समजल्यामुळें नवीन दृष्टीनें रसचर्चा करणें शक्य होईलसें वाटतें. परंतु तो प्रस्तुत विषय नव्हे.

---

## सत्याग्रहाची आस्तिक्यभावना

सत्याग्रह—संग्रामांत एका पक्षास शुद्ध शौर्य आणि दुसऱ्या पक्षास शुद्ध क्रौर्य असा देखावा दृष्टीस पडतो. निःशस्त्र वीराचें शौर्य सशस्त्र वीराहून श्रेष्ठ प्रतीचें असतें व निःशस्त्र वीरावर आघात करण्याचें क्रौर्य तितकेंच हीन असतें. शुध्द शौर्य आणि शुद्ध क्रौर्य यांतील हा लढा पाहून मानवी अंतःकरणांत लपून बसलेला परमेश्वर प्रकट होतो आणि सत्–पक्षाच्या बाजूला धाऊन येतो, या श्रद्धेवर सत्याग्रहाची उभारणी झालेली आहे. विश्वांतील प्रत्येक अणुरेणूंत ज्ञान, प्रेम आणि सामर्थ्य हे गुण गूढरूपानें वास्तव्य करीत असतात; आणि सत्य, अहिंसा व तपश्चर्या ही त्यांचींच रूपें असल्यामुळें त्यांना यश मिळावें अशीच विश्वाची घटना आहे, अशी श्रद्धा असणें व तदनुसार आचरण घडणें हाच आस्तिक्यवाद होय. ही आस्तिक्यभावना सत्याग्रहाच्या बुडाशीं आहे.

— भा. जावडेकर 'लो. टिळक व म. गांधी'








श्री. श्रीपाद जोशी

# आचार्य जावडेकर : संक्षिप्त जीवनपरिचय

आचार्य शंकर दत्तात्रय जावडेकर यांचा जन्म कोल्हापूर संस्थानांतील विशाळगड जहागिरीच्या मलकापूर या गांवीं ता. २६ सप्टेंबर १८९४ रोजीं झाला. देशी तिथीप्रमाणें त्यांचा जन्मदिवस भाद्रपद वद्य १२ शके १८१६ हा आहे. चरखा-द्वादशीस–गांधीजयंतीच्या दिवशींच–गांधीवादाच्या राजकीय भाष्यकाराचा वाढदिवस यावा हा एक मजेदार योगायोग म्हटला पाहिजे.

जावडेकरांचें मूळ घराणें पुणें जिल्ह्यांतील अिंदापूर गांवचें. परंतु पुष्कळ वर्षांपूर्वी आचार्यांचे पूर्वज कोल्हापूर संस्थानांत गेले आणि तिकडेच स्थायी झाले. आचार्यांचे आजोबा कापशी जहागिरींत नोकर होते आणि वडील विशाळगड-करांचे खासगी कारभारी होते. विशाळगडकर लहान असतांना त्यांचे शिक्षक म्हणून आचार्यांच्या वडिलांची–यांना रावसाहेब जावडेकर असें म्हणत–नेमणूक झालेली होती. पुढें ते मोठे झाल्यानंतर त्यांनीं रावसाहेबांना आपले खासगी कारभारी बनविलें. रावसाहेबांसंबंधीं आचार्य भागवत लिहितात; * "रावसाहेबांच्या अंगीं जी असामान्य उदारबुद्धि होती तिचें मूळहि आध्यात्मिकच असलें पाहिजे. रावसाहेबांचा स्वतःचा संसार अगदींच बेताचा असतांनाहि त्यांचा मानलेला संसार फार विस्तीर्ण होता. त्यांनीं अनेकांना आपलें मानून त्यांच्यासाठीं खस्ता खाल्ल्या आणि स्वार्थत्याग केला, संचयाची कधीं इच्छा धरली नाहीं; आणि ज्यांना आश्रय दिला त्यांच्या दोषांकडेहि कधीं पाहिलें नाहीं. अशा उदार स्वभावामुळें संस्थानी राजकारणांत आपलें दीर्घायुष्य घालवूनहि अंतकाळीं ते अक्षरशः निरर्थ राहिले! या उदारपणाचें तात्त्विक स्वरूप म्हणजेच आध्यात्मिक ध्येयवाद होय. या गुणांचा वारसाहि शंकररावांना भरपूर लाभलेला आहे. त्यांच्या खासगी आयुष्यांत ते उद्यांची चिंता कधींच वाहत नाहींत. आपत्तींतहि ते उदार असतात आणि ध्येयवादांतच आनंद मानतात." (जी. सा.)

आचार्य जावडेकर दोन वर्षांचे असतानाच त्यांच्या मातुःश्री निवर्तल्या. पुढें वयाच्या दहाव्या वर्षापर्यंत त्यांच्या आजीनें–आईच्या आईनें– त्यांना सांभाळलें. पण पुढें त्याहि वारल्यामुळें मुलांच्या संगोपनांचा सर्व भार रावसाहेबांवरच पडला. दुसरें लग्न केल्यामुळें पहिल्या अपत्यांची जोपासना नीट होऊं शकत नाहीं, या दैनंदिन जीवनांतील अनुभवामुळें रावसाहेबांनीं द्वितीय संबंध केला नाहीं. शंकररावांना त्यांच्याहून दोन वर्षांनीं वडील एक बहीण होती. या दोन्ही मुलांचा प्रतिपाळ रावसाहेबांनीं मातेच्या प्रेमानें व पित्याच्या जबाबदारीनें केला.

प्रोफेसर अण्णासाहेब विजापूरकर, ना. गोखले, लो. टिळक वगैरे महाराष्ट्रीय थोर पुरुषांशीं रावसाहेबांचे निकट संबंध होते. त्यांतहि श्री. विजापूर-

---

* या लेखांतील अवतरणें आचार्य स. ज. भागवत यांच्या 'जीवन आणि साहित्य' या लेखसंग्रहांतील 'आचार्य जावडेकर' या लेखांतून व श्री. प्रेमाबाई कंटक यांच्या 'सत्याग्रही महाराष्ट्र' मधून घेतलीं असून त्या त्या ठिकाणीं (जी. सा.) किंवा (स. म.) असा यथावश्यक उल्लेख केला आहे.












कराशीं घनिष्ठ स्नेह होता आणि या स्नेहामुळेंच त्यांना संस्थानी नोकरीस रामराम ठोकावा लागला. कारण सरकारनें विजापूरकरांवर खटला भरतांच त्यांचे बहुतेक सर्व मित्र त्यांना सोडून गेले. एकट्या रावसाहेबांनींच शेवटपर्यंत त्यांची मैत्री निभावली. नुसती मैत्रीच टिकविली असें नव्हे तर निधड्या छातीनें त्यांनीं विजापूरकरांना त्यांच्या खटल्यांत कायदेशीर मदत—legal help—केली. आणि त्यांच्या या अपराधासाठीं पोलिटिकल एजंटानें त्यांना रजा घेण्यास भाग पाडलें.

विजापूरकरांशीं असलेली त्यांची मैत्री अशी जगजाहीर झाल्यामुळें त्यांना कोल्हापूर संस्थानांतून बाहेर पडावें लागलें. म्हणजे हें एक प्रकारचें राजकीय निर्वासनच होतें. संस्थानांतून बाहेर पडल्यावर रावसाहेब इस्लामपूरला आपल्या मुलीच्या घरीं येऊन राहिले. ते शेवटपर्यंत तेथेंच होते आणि आजहि आचार्य जावडेकर हे आपल्या बहिणीच्या घरांतच रहात आहेत. आज त्यांची बहीण हयात नाहीं. तिचे यजमान आचार्यांच्या घरांतील कुटुंबीयाप्रमाणेंच तेथें राहतात.

रावसाहेबांची ही हद्दपारी कांहीं निव्वळ राजकीय स्वरूपाची नव्हती. तिला थोडासा जातीय वासहि होता. त्या वेळचे कोल्हापूरचे शाहू महाराज हे कट्टर ब्राह्मणद्वेष्टे म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचें विशाळगडकर व इचलकरंजीकर या ब्राह्मण जहागीरदारांशीं वितुष्ट होतें व या जहागिरदारांना रावसाहेब सल्लामसलत देत असत. म्हणून त्यांच्यावरहि शाहू महाराजांचा घुस्सा होता. असें सांगतात कीं महाराजांनीं विजापूरकर, वा. म. जोशी वगैरे राजकीय चळवळ्या मंडळीबरोबरच रावसाहेबांचें नांवहि विलायतेस कळविलें होतें.

रावसाहेब संस्थानी नोकरींतून निवृत्त झाले तरी त्यांचें विशाळगडकरांशीं असलेले पूर्वीचे स्नेहसंबंध कायमच राहिले. ते त्यांना बाहेर राहूनच सल्लामसलत देत असत. पुढें शाहू महाराज वारल्यानंतर ते कोल्हापूर संस्थानांतहि जाऊं लागले. १९३७ सालीं त्यांना देवाज्ञा झाली. “ त्यांच्याकडून शंकररावांना तीन देणग्या मिळाल्या. एक, राजकारणी बुद्धि; दुसरी, उदार स्वभाव आणि तिसरी, प्राण जर्जर करून सोडणारा दमा ! ” (जी. सा.) या दम्यामुळेंच त्यांना इस्लामपूरसारखें कोरड्या हवेचें ठिकाण सोडून कोठें बाहेर जातां येत नाहीं. आणि तेथें राहूनहि बारा महिने त्यांना या खाष्ट रोगाशीं अखंड झुंज खेळावी लागते.

आचार्य जावडेकर यांचें शालेय शिक्षण विशेष नियामितपणें अथवा पद्धतशीरपणें झालें नाहीं. वडील जिकडे जातील तिकडे त्यांना जावें लागे. यामुळें वर्षांतून २–३ महिने शाळेंत जातां आलें तरी पुष्कळ होई. अर्थात् घरीं वडील अभ्यास करून घेत असत. यामुळें परीक्षेंत नापास होण्याची भीति नसे. इंग्रजी सहावीपर्यंत ते कोल्हापूरच्या प्रायव्हेट हायस्कूलमध्यें शिकले. आणि नंतर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें गेले. तेथून ते १९१२ सालीं मॅट्रिक झाले. पुढें डेक्कन कॉलेजांत दाखल झाले आणि ‘तत्त्वज्ञान’ हा विषय घेऊन १९१७ सालीं मुंबईच्या विल्सन कॉलेजमधून बी. ए. पास झाले. १९१८ सालीं त्यांचा विवाह झाला. “ त्यांच्या पत्नी सौ. सुशीलाबाई सुविद्य व सुगृहिणी आहेत. आपल्या पतीच्या जीवनाशीं त्या पूर्णपणें समरस झालेल्या असून त्यांच्या जीवनांत श्रद्धामय भक्तवृत्ति उत्कटतेनें दिसून येते. त्यांच्या संगतीनें शंकररावांच्या जीवनांतील भक्तवृत्ति जागृत झालेली दिसते. अशा या अनुरूप पतिपत्नींच्या संसारांत समन्वयाचें संगीत आढळलें तर त्यांत काय आश्चर्य ? ” (जी. सा.)

आचार्यांना दोन मुलगे असून थोरले श्री. प्रभाकरपंत हे बी. ए असून इस्लामपूरच्या हायस्कुलांत शिक्षक आहेत व दुसरे श्री. बाळ हे अहमदाबादच्या मेडिकल कॉलेजांत शिकत आहेत.

बी. ए. नंतर आचार्यांनीं एम्. ए. चा अभ्यास आरंभिला. एम्. ए. ला त्यांनीं इतिहास, अर्थशास्त्र व राजकारण हे विषय घेतले होते. परंतु १९२१ च्या जानेवारींत आधल्या दिवशीं त्यांनीं परीक्षेची साठ रु० फी भरली व दुसऱ्या दिवशींच असहकाराच्या चळवळींत पडण्यासाठीं कॉलेज—शिक्षणावर बहिष्कार म्हणून परीक्षेला बसावयाचें नाहीं असें







ठरविलें. यावेळीं ते पुण्यांत राहात असत आणि न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिकवीत असत. ' त्यांचे एक मित्र श्री माधवराव गद्रे यांच्या मध्यस्थीनें त्यांची श्री. शंकरराव देव यांच्याशीं गांठ पडली. त्यावेळीं देवांबद्दल त्यांच्या मनावर विशेष छाप पडली नाहीं. पुढें काय करावें या प्रश्नाची चर्चा त्यांनीं देवांशीं केली. देवांना लोकसंग्रह करावयाचा होता. त्यांनीं जावडेकरांस आपल्याबरोबर कार्य करावयास बोलाविलें; पण त्यावेळीं जावडेकरांची कबुली मिळाली नाहीं व ते इस्लामपुरास परत गेले. तेथें श्री. ग. वि. कौजलगी यांच्या जोडीनें त्यांनीं दोन वर्षें तालुका कॉंग्रेस कमिटीचें कार्य केलें. ' (स. म.)

रावसाहेब जावडेकरांचा विजापूरकरांशीं अत्यंत निकटचा व जिव्हाळ्याचा स्नेहसंबंध असल्यामुळें त्या दोघांच्या सर्व विषयांवर मनमोकळेपणानें चर्चा होत असत. त्या चर्चा ऐकण्याची संधि शंकररावांना लाभल्यामुळें त्यांना राष्ट्रीयत्वाचें बाळकडूच मिळालें. विजापूरकर यांचा टिळक व गोखले या दोघांशींहि घनिष्ठ संबंध होता. यामुळें त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारची समतोल वृत्ति आलेली होती. हाच समतोलपणा आचार्यांच्या बुद्धींतहि आला. कोल्हापूरच्या विद्यार्थ्यांत विजापूरकरांनीं राष्ट्रीय विचारांचा खूप प्रचार केला होता. यामुळें आचार्यांचे शाळासोबतीहि राजकारणासंबंधीं विचार करणारे होते. आचार्यांचे मामा श्री. सुपेकर हे त्यावेळीं कॉलेजांत शिकत होते. ते राष्ट्रीय वृत्तीचे व चिंतनशील स्वभावाचे होते. त्यांच्या मित्रमंडळींत भारत सेवक समाजाचे श्री. वझे, श्री. एस्. एल्. शिंदे वगैरे गृहस्थ होते. या सर्व लोकांच्या बैठकी आचार्यांच्या घरीं होत असत. त्यांचाहि आपल्या मनावर खूप परिणाम झाला असें ते सांगतात. कोणत्याहि एका पक्षाचें म्हणणें खरें असतें असें नाहीं. म्हणून कार्यकर्त्यानें पक्षातीत तटस्थपणा व चिकित्सकपणा अंगीं बाणविला पाहिजे ही शिकवण आचार्यांना विजापूरकरांकडून मिळाली.

कॉमरेड रुईकर व प्रा. मा. दा. अळतेकर हे दोघे लहानपणीं आचार्यांच्या घरीं रहात असत. रावसाहेब जावडेकर हेच त्यांचे पालक होते. यांच्यापैकीं श्री. अळतेकर हे आचार्यांहून वयानें मोठे व शिक्षणांतहि पुढें होते. त्यांच्याशीहि चर्चा व विचारविनिमय करण्याची संधि आचार्यांना मिळाली. श्री. अळतेकर हे आगरकरांचे भक्त. त्यांनींच ' आगरकर-दिवस ' साजरा करण्याची कल्पना प्रथम काढली होती. त्यांच्यामुळें आचार्यांना आगरकरांचें अध्ययन करण्यास खूप मदत झाली. श्री. रुईकर आचार्यांचे समवयस्क व सहाध्यायीहि होते. शाळाकॉलेजांत असतांना ते दोघे सार्वजनिक प्रश्नांचा एकत्र अभ्यास व विचारविनिमय करीत. १९१५ सालीं रुईकर–जावडेकरांनीं असा संकल्प केला कीं कॉलेज-शिक्षणानंतर आपण राष्ट्रकार्यांत पडावयाचें परंतु बी. ए. झाल्यावर कोणत्या पक्षांत सामील व्हावें याचा निर्णय न होऊं शकल्यामुळें तें दोन वर्षांनंतर ठरवावें असा त्यांनीं विचार केला.

सारांश, विजापूरकर व सुपेकर यांच्याप्रमाणेंच अळतेकर व रुईकर यांच्या संगतीचाहि आचार्यांच्या मनावर व विचारांवर परिणाम झालेला आहे.

आचार्यांना लहानपणापासून तात्त्विक चिंतनाची गोडी होती. त्यामुळें त्यांचें वाचन बहुतेक गहन व गंभीर विषयांसंबंधींच होई. ललित साहित्याकडे त्यांचा ओढा एकूण कमीच. जुन्या संतकवींचें काव्य त्यांनीं वाचलें आहे खरें, परंतु ते त्यांतील साहित्यिक गुणांसाठीं नव्हे तर आध्यात्मिक विचारासाठीं. आधुनिक ललित साहित्यांपैकीं त्यांनीं श्री. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या आणि केशवसुतांची कविता एवढेंच काय तें मनापासून वाचलें आहे. आचार्य भागवत यांच्याप्रमाणेंच त्यांचेंहि असें मत आहे कीं केशवसुतांना मागें टाकील असा एकहि कवि अद्यापि मराठी भाषेंत निर्माण झालेला नाहीं. बोरकर, कुसुमाग्रज, पोवळे, निकुंब वगैरे कवींच्या काव्यांची त्यांना कदर आहे; परंतु ते केशवसुतांच्या पुढें गेले आहेत असें त्यांना वाटत नाहीं.

तसेंच साहित्यासाठीं साहित्य या मताच्या ते विरुद्ध आहेत. जेव्हां आपल्याला एकादा विशिष्ट विचार लोकांपुढें मांडावयाचा असतो तेव्हांच आपण साहित्याच्या वाटेस जातों असें ते सांगतात.

ज्यांच्या लिखाणाचा आचार्यांच्या मनावर विशेष परिणाम झाला असे लेखक चार: टिळक, आगरकर, गांधी व टागोर. टिळकांचें ' गीतारहस्य ' व








# आचार्य जावडेकर : संक्षिप्त जीवनपरिचय

अरविंदांचें 'गीतानिबंध' यांचा त्यांनीं खूप व्यासंग केला आहे. आपल्याला 'गीता रहस्यां'-मधून अध्यात्मवाद व कर्मयोग यांचें महत्त्व समजलें, आगरकरांकडून मानवतेचें ऐहिक सुखवर्धन हाच खरा मानव धर्म आहे हें कळलें आणि गांधींकडून अध्यात्मवादाचें अहिंसक स्वरूप माहित झालें असें आचार्य सांगतात. गांधींना अधिक जाणून घेण्यासाठीं त्यांनीं टॉलस्टॉय वाचला. आगरकरांच्या वाचनामुळें धार्मिक व सामाजिक बाबतींत त्यांचें मन पुरोगामी बनलें. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें साहित्य त्यांनीं फार उशीरा वाचलें व त्यामुळें त्याचा कांहींच परिणाम त्यांच्यावर झाला नाहीं.

राजकीय व सामाजिक विषयांचीं मूलतत्त्वें कळावींत या उद्देशानें त्यांनीं बी. ए. ला इरादापूर्वक तत्त्वज्ञान हा विषय घेतला होता. परंतु ते नियमितपणें कॉलेजांत कधींच गेले नाहींत. फक्त टर्म्स भरण्यापुरती कॉलेजांत हजिरी देऊन येत आणि बाकीचा सर्व वेळ आपल्या इच्छेनुसार तात्त्विक वाचनांत घालवीत.

इंग्रजी लेखकांपैकीं फेबियन सोशॅलिस्टांचा प्रभाव त्यांच्या विचारावर खूप पडला. 'उदारमत-वादाकडून समाजवादाकडे' जाणाऱ्या इंग्लिश समाजवाद्यांचें बहुतेक सर्व लिखाण त्यांनीं वाचून काढलें. जॉन स्टुअर्ट मिल, हॉबहाउस, सिडने वेब, मॅकडोनल्ड, लास्की, कोल, जोड, रसेल वगैरे लेखकांचीं पुस्तकेंहि त्यांनीं अभ्यासिलीं. पुढें १९२७ सालीं जेव्हां रशियांत साम्यवादी क्रांतीचा पहिला दशवार्षिक उत्सव (ॲनिव्हर्सरी) साजरा झाला तेव्हांपासून १९३० पर्यंत आचार्यांनीं मार्क्सवादाचा अभ्यास केला. मार्क्सकडून भौतिकवाद व विरोध-विकास यांचें जें ज्ञान त्यांना मिळालें तें त्यांनीं गांधीजींच्या मार्गाला लागू करून 'सत्याग्रही विरोध-विकासा'चें नवें समन्वयात्मक समीकरण देशापुढें मांडलें. जर आपण मार्क्स वाचला नसता तर जीवनांतील व राजकारणांतील वस्तुवादी अंग—realistic element—आपल्याला समजलें नसतें असें आचार्य म्हणतात. "विशिष्ट देशाच्या विशिष्ट परंपरेप्रमाणें समाजसत्ताक क्रांतीच्या चळवळीला विशिष्ट स्वरूप येणें अपरिहार्य आहे, असें मार्क्स नेंच म्हटलेलें आहे. भारतीय आध्यात्मिक परंपरा व येथील राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं अपरिहार्य झालेला निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग यामुळें भारतीय समाज-वादाला अहिंसेचें आध्यात्मिक अधिष्ठान द्यावें लागणार आहे असें शंकररावांचें मत असून राष्ट्रीय समाजवादी पक्ष असें अधिष्ठान येथील समाजवादाला मिळवून देईल अशी त्यांची अटकळ आहे. १९३१ च्या 'लोकशिक्षणा'मध्यें त्यांनीं अशी घोषणा महाराष्ट्रांत प्रथम केली आणि आतांपर्यंतच्या राजकीय हालचालींकडे पाहिलें असतां त्यांची ही अटकळ हळुहळू मूर्त स्वरूप धारण करीत आहे असें आढळून येईल"— (जी. सा.)

१९२२ सालीं मुळशी पेट्याची चळवळ झाली. त्यावेळीं जावडेकरांची श्री. शंकरराव देव यांच्याशीं ओळख झाली. परंतु मनाचा निश्चय न झाल्यामुळें ते मुळशीच्या सत्याग्रहांत न पडतां इस्लामपुरास गेले. तेथें सन १९२३ ते १९२६ पर्यंत इस्लाम-पूरहून तीन मैल दूर असलेल्या पेठ या गांवीं अस्पृश्य विद्यार्थ्यांसाठीं त्यांनीं 'महात्मा बोर्डिंग हाऊस' या नांवाचें एक वसतिगृह चालविलें. या नांवांतील 'महात्मा' या शब्दानें ज्योतिबा फुले व गांधी या दोघांचा समन्वय त्यांनीं साधलेला होता.

या काळांतच त्यांनीं 'राजनीतिशास्त्रपरिचय' या आपल्या ग्रंथाची रचना केली. त्यांनीं एम्. ए. साठीं राजकारण, इतिहास व अर्थशास्त्र हे विषय घेतले होते. त्यांचा हें पुस्तक लिहितांना त्यांना खूप उपयोग झाला. किंबहुना असें म्हणतां येईल कीं त्यांनीं केलेल्या अभ्यासाची परिणति परीक्षेंत होण्याऐवजीं या पुस्तकांत झाली. आपण एम्. ए. झाल्यानंतर टिळक—आगरकराप्रमाणें पुस्तकलेखन, अध्यापन, वृत्तपत्रव्यवसाय वगैरे पद्धतींचें कार्य करावें अशी त्यांची इच्छा होती. परंतु असहकारिते-च्या धोरणानुसार पदवीवर पाणी सोडल्यामुळें त्यांची ही इच्छा मनांतल्या मनांतच राहिली. पुढें त्यांचें 'राजनीतिशास्त्र परीचय' प्रसिद्ध होतांच त्यांना हवी असलेली संधि मिळाली. कारण त्या पुस्तकामुळें त्यांच्या बुद्धिमत्तेची चुणूक चाणाक्षांच्या लक्षांत आली व टिळक—महाविद्यालयाकडून त्यांना








निमंत्रण आलें. त्याप्रमाणें ते पुण्यास जाऊन १९२६ मध्यें टिळक-महाविद्यालयांत इतिहास–अर्थ-शास्त्र–राजकारण या विषयांचे अध्यापक बनले.

टिळक–महाविद्यालयांत काम करीत असतां त्यांचा आचार्य भागवत यांच्याशीं संबंध आला व त्याची परिणति दाट मैत्रींत झाली. याचें कारण त्या दोघांचीं राजकीय व जीवनविषयक मतें एक-मेकांशीं पुष्कळच जुळणारीं होतीं. आजहि भागवत व जावडेकर यांची अगदीं घनिष्ठ मैत्री असून त्यांचें वैचारिक सहजीवन संबंध महाराष्ट्राच्या परिचयाचें झालें आहे.

राजकारणी लोकांमध्यें आवश्यक असणारी लढाऊ किंवा आक्रमक वृत्ति जावडेकरांच्या ठिकाणीं नसल्यामुळें ते प्रांतिक राजकारणांत विशेष पडले नाहींत. 'परंतु त्यांची विचारसरणी प्रबळ व प्रगति-मान् असल्यामुळें प्रांतांतील हालचालींवर त्यांची कुशाग्रबुद्धि जागृतपणें लक्ष ठेवीत असे. वर्तमान-काळाचें आकलन करून ते भविष्यकाळांतील घटना ओळखीत. त्यांना राजकारणाची पारखहि चांगली होती यामुळें सर्व घडामोडींचा वेध ते घेऊं शकत.' ( स. म. )

गांधीजींनीं भारतीय राजकारणांत प्रवेश केल्यानंतर जी कार्यप्रणाली स्वीकारली ती पाहून महाराष्ट्रांतील बुद्धिवाद्यांनीं त्यांना मूर्खांत काढलें व त्यांच्या मार्गानें जाणाऱ्यांना विरोध करण्यास सुरुवात केली. यामुळें स्वतःला टिळकांचे अनुयायी म्हणविणारे व गांधींच्या मार्गानें जाणारे यांच्यामध्यें संघर्ष सुरू झाला. या संघर्षात टिळकानुयायांचें नेतृत्व कै. न. चिं. केळकर यांच्याकडे होतें. परंतु गांधीवाद्यांना नेता नव्हता. देव, दास्ताने, बाळूकाका कानिटकर, त्रिं. म. भुस्कुटे, कॉमरेड फडके वगैरे सर्व मंडळी साधारणपणें समान दर्जाची व अधिकाराचीच समजली जात होती. यामुळें त्यांच्यापैकीं कोणाला नेता बनवावें हा प्रश्न होता. यावेळीं आचार्य जाव-डेकरांनींच प्रथम हें ओळखलें कीं गांधीवादी महाराष्ट्राचे पुढारी श्री. शंकरराव देव हेच होऊं शक-तील आणि म्हणून आपण त्यांना पाठिंबा देऊन पुढें आणलें पाहिजे असें त्यांनीं ठरविलें. आपली ही कल्पना त्यांनीं आचार्य भागवत यांना सांगितली. भागवतांचे विचार याबाबतींत समान आढळून आल्यामुळें त्यांना समाधान वाटलें. व त्यानंतर त्यांनीं देवांना पाठिंबा मिळविण्यास सुरुवात केली. त्यांचा हा अंदाज किती खरा ठरला व त्यांचा हा प्रयत्न किती यशस्वी झाला हें आज दिसत आहेच.

१९२५ सालीं श्री. शंकरराव देव यांनीं कै. शि. म. परांजपे यांचें 'स्वराज्य' पत्र व 'गोवर्धन छाप-खाना' हीं चालविण्यास घेतलीं. याच छापखान्यांत जावडेकरांचा 'राजनीतिशास्त्रपरिचय' हा ग्रंथ छापला गेला. 'स्वराज्य' पत्रांतहि ते १९२९ पर्यंत नियमानें लिहीत होते. १९२८–१९२९ या अवधींत श्री शंकरराव देव तुरुंगांत होते. त्यावेळीं 'स्वराज्य'चें सर्व लिखाण मुख्यतः आचार्य जावडेकर व श्री वि. म. भुस्कुटे हेच करीत असत. १९२७ मध्यें आचार्य जावडेकर यांचा श्री. जांभेकर यांच्याशीं परिचय झाला व प्रथमपासून त्यांनीं जांभेकरांच्या लोकशिक्षणांत लिहिण्यास सुरुवात केली. लोकशिक्षणाच्या अखेर-पर्यंत ते त्यांत लिहीत होते.

१९३० च्या चळवळींत ते सहा महिने रत्नागिरीच्या तुरुंगांत होते. या तुरुंगवासाच्या काळांत त्यांची एक सहा वर्षांची गोजिरवाणी मुलगी घरीं मेनिंजायटिसनें मृत्युमुखीं पडली. याचा त्यांच्या हृदयावर फार मोठा आघात झाला.

यानंतर १९३२ जानेवारी ते १९३३ नोव्हेंबर-पर्यंत सुमारें दोन वर्षे ते येरवडा व नाशिक येथील तुरुंगांत होते.

१९३४ सालीं मुंबईला 'नवशक्ति' पत्र सुरू झालें. तेव्हां ते त्याचे पहिले संपादक झाले. कै. न. चिं. केळकर यांच्या 'राज्यशास्त्र' या ग्रंथावर आचार्यांनीं तुरुंगांत असतांना जी एक विस्तृत व मार्मिक टीका लिहिली होती ती याच वर्षी मुंबईच्या 'विविधज्ञानविस्तारां'तून क्रमशः प्रसिद्ध झाली आणि मग 'राज्यशास्त्रमीमांसा' या नावानें पुस्तकरूपानें प्रकाशित झाली.

पुढें १९३५ सालीं पुण्यास 'लोकशक्ति' पत्र निघण्याचें ठरल्यावर 'नवशक्ती' मधील श्री. द. वा. फडके व श्री. स. रा. देशपांडे यांच्या समवेत ते 'लोकशक्ती'ला येऊन मिळाले व मुख्य








संपादक बनले. त्यांच्या बरोबर 'नवशक्ती'त काम करणारे श्री. तात्यासाहेब देशपांडे व विनायकराव भुस्कुटे हेहि त्यांच्याबरोबरच बाहेर पडले आणि कॉंग्रेसच्या राजकारणांत पडले.

१९३५ पासून १९३७ पर्यंत आचार्य जावडेकर हे 'लोकशक्ती'चे संपादक म्हणून काम करीत होते. १९३७ सालीं 'लोकशक्ती'ची व्यवस्था श्री. राजगुरूंकडे गेल्यानंतर ते संपादकीय जबाबदारींतून मुक्त होऊन इस्लामपुरास गेले. याच वर्षी त्यांचा दम्याचा विकार बळावला. याच वर्षी त्यांचे वडील वारले.

जावडेकरांच्या संपादकीय कामगिरीबद्दल आचार्य भागवत लिहितात : "शंकरराव जावडेकर हे एक ध्येयवादी वृत्तपत्रसंपादक म्हणून आजच्या महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. टिळक–आगरकरांच्या नंतर 'नवविचारांचा राष्ट्रीय संपादक' म्हणून महाराष्ट्रीय वृत्तपत्रांच्या इतिहासांत जावडेकरांचाच उल्लेख करावा लागेल, इतकी त्यांची संपादकीय कामगिरी आतापर्यंत होऊन गेली आहे.......

"गांधीवाद ही एक भावनेची लहर आहे, तिला बुद्धिमत्तेचा शास्त्रीय आधार नाहीं, या विरोधी पक्षाच्या मतलबी प्रचाराविरुद्ध शंकररावांनी 'स्वराज्य', 'लोकशिक्षण', 'नवशक्ति', 'चित्रमय जगत्', 'लोकशक्ति', 'लोकमान्य' वगैरे नियतकालिकांतून जोरदार हल्ले चढविले आणि आपल्या तीव्र बुद्धिमत्तेनें गांधीवादाचें शास्त्रीय स्वरूप महाराष्ट्रीय बुद्धिवादी लोकांसहि पटवून दिलें." (जी. सा.)

आचार्य भागवत यांच्याप्रमाणेंच राजवाड्यांचे शिष्य इस्लामपूरचे कै. वासुदेव दामोदर मुंडले यांच्याशींहि आचार्यांचा घनिष्ठ संबंध येऊन त्यांचें वैचारिक सहजीवन निर्माण झालें होतें.

इस्लामपुरास गेल्यानंतर १९३८ सालीं आचार्यांनीं आपला 'आधुनिक भारत' हा अप्रतिम ग्रंथ लिहिला. कै. वा. म. जोशी यांनीं 'गीतारहस्या'नंतर प्रसिद्ध झालेला महत्त्वाचा मराठी ग्रंथ म्हणून त्याची थोरवी गायिलेली सर्वश्रुतच आहे. 'आधुनिक भारता'नंतर शंकररावांनीं १९४१–४२ सालीं 'लोकशाही' व 'गांधीवाद' हीं दोन पुस्तकें लिहिलीं. तीं य. गो. जोशींच्या 'वादविवेचन मालें'तून प्रसिद्ध झालीं. १९४१ सालीं ते मुंबई व उपनगर साहित्य–सम्मेलनाचे अध्यक्ष झाले. त्या अध्यक्षपदावरून त्यांनीं जें भाषण दिलें तें त्यावेळीं खूपच गाजलें. तें भाषण, त्यावर प्रा. ना. सी. फडके यांनीं केलेली टीका व त्याला आचार्यांनीं दिलेलें उत्तर हीं सर्व 'पुरोगामी साहित्य' या पुस्तकांत संगृहीत करण्यांत आलीं आहेत. याच वेळीं रस्किनच्या Unto This Last चें आचार्यांनीं 'अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र' या नांवानें केलेलें भाषांतर सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेनें प्रसिद्ध केलें असून त्याच्या प्रस्तावनेंत जीवनाचें अर्थशास्त्र कोणत्या स्वरूपाचें असलें पाहिजे याची त्यांनीं मार्मिक चर्चा केली आहे.

१९४२ च्या ऑगस्टपासून १९४४ च्या एप्रिलपर्यंत ते येरवड्याच्या कारागृहांत स्थानबद्ध होते. या अवधींत त्यांची तब्येत ठीक नसल्यामुळें त्यांच्याकडून लेखन झालें नाहीं. तुरुंगांतून सुटून आल्यानंतर १९४५ च्या एप्रिलमध्यें ते पुन्हां 'लोकशक्ति' दैनिकाचे संपादक बनले. या वर्षी त्यांनीं आपलें 'हिंदु–मुस्लिम ऐक्य' हें पुस्तक लिहिलें. १९४६ जूनला त्यांनीं तात्त्विक मतभेदामुळें 'लोकशक्ती'चें संपादकत्व सोडलें. मध्यंतरीं कांहीं वर्षे ते कोल्हापूरहून निघणाऱ्या 'अखंड भारत' या श्री. माधवराव बागल यांच्या साप्ताहिकाच्या संपादक–मंडळांत होते. कांहीं दिवसापूर्वीं इस्लामपूरहून निघणाऱ्या 'गांवराज्य' या साप्ताहिकाच्या सल्लागारमंडळांत होते आणि आतां पुण्याहून निघणाऱ्या 'नवभारत' मासिकाच्या संपादकमंडळांत आहेत.

१९४६ सालीं त्यांनीं 'कॉंग्रेस आणि महायुद्ध' व 'वाल्मीकि–आश्रमांतील प्रवचनें' हीं दोन छोटेखानी पुस्तकें लिहिलीं. १९४७ सालीं दिल्लीच्या 'जनता' या समाजवादी इंग्रजी साप्ताहिकाच्या खास अंकांत आचार्यांनीं Socialism and Gandhian Values या नांवाचा एक लेख लिहिला होता तो देशांत व परदेशांत खूपच गाजला.

१९४८ सालीं गांधीजींच्या खुनानंतर 'गांधी-जीवनरहस्य' या नांवाची एक लेखमाला त्यांनीं








पुण्याच्या 'प्रसाद' मासिकांतून क्रमशः लिहिली. ती आतां लौकरच स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध होईल.

आचार्य जावडेकर हे सध्यां इस्लामपूरला राहातात. तेथील हवा कोरडी असल्यामुळें ती त्यांच्या प्रकृतीला मानवते. जेव्हां प्रकृति ठीक असते तेव्हां ते लिखाण करतात आणि त्यांचा सल्ला मागणाऱ्यांना सल्लामसलत देत असतात.

---

# आचार्य जावडेकर यांचे प्रकाशित ग्रंथ

| वर्ष | | नांव | प्रकाशक |
|---|---|---|---|
| सन १९२१ –२२ | (१) | 'महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाची उत्क्रांति' [शहापूरच्या 'लोकमित्र' या मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालेली लेखमाला.] | आचार्य जावडेकर |
| १९२४ | (२) | 'हिन्दी राजकारणाचें स्वरूप' | |
| १९२६ | (३) | 'राजनीतिशास्त्रपरिचय' | ,, |
| १९२९ | (४) | 'विश्वकुटुंबवाद' | ,, |
| १९३४ | (५) | 'राज्यशास्त्रमीमांसा' ['विविधज्ञानविस्तारां'तून क्रमशःप्रसिद्ध] | ,, <br> विविधज्ञानविस्तार-मुंबई |
| १९३८ | (६) | 'आधुनिक भारत' | सु. रा. ग्रं. माला, पुणें |
| १९३९ | (७) | 'शास्त्रीय समाजवाद' | |
| १९४१ | (८) | 'लोकशाही' | ,, ,, ,, |
| –४२ | (९) | 'गांधीवाद' | य. गो. जोशी प्रकाशन पुणें |
| | (१०) | 'आधुनिक राज्यमीमांसा'-भाग १,२ | ,, ,, <br> लोकशिक्षण–लघुग्रंथमाला पुणें २ |
| | (११) | 'अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र' | सु रा. ग्रं माला. पुणें |
| | (१२) | 'पुरोगामी साहित्य' | संध्या–प्रकाशन, पुणें |
| १९४५ | (१३) | 'हिन्दु–मुस्लिम ऐक्य' | सु. रा. ग्रं. माला, पुणें |
| –४६ | (१४) | 'वाल्मीकि–आश्रमांतील प्रवचनें' | |
| | (१५) | 'कॉंग्रेस आणि महायुद्ध' | ,, ,, <br> महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस प्रकाशन, पुणें |
| | (१६) | 'लो. टिळक व म. गांधी' | राजहंस प्रकाशन, पुणें |
| १९४९ | (१७) | 'भारतीय क्रांति आणि राष्ट्रसभा' | सरस्वती प्रकाशन, पुणें |
| | (१८) | 'गांधी–जीवनरहस्य' | देशमुख आणि कं. प्रकाशन, पुणें |








प्रा. न. र. फाटक

# गेलीं महाराष्ट्र-साहित्यसंमेलनें व त्यांचें कार्य

## अखिल महाराष्ट्रांत संमेलनाचें प्रस्थान

मराठींत पुस्तकें लिहिणारांचें पहिलें संमेलन लोकहितवादी व रानडे यांच्या पुढाकारानें 'मराठी ग्रंथकारांचें संमेलन' या नांवाखालीं १८७८ सालीं भरलें. या संमेलनापर्यंतच्या काळांत मराठीमध्यें सर्व प्रकारचीं (शालोपयोगी, शनिमाहात्म्यासारखीं धार्मिक वगैरे) पुस्तकें जेमतेम हजार-अकराशेंच्या घरांतलीं होतीं. तेव्हां मॅट्रिकपर्यंत व त्यापुढील कॉलेजचें शिक्षण घेतलेल्या माणसांची संख्याहि डोळ्यांत भरण्यासारखी नव्हती. तथापि शिक्षणाचा व इंग्रजी ग्रंथांच्या द्वारें मिळणाऱ्या ज्ञानाचा प्रसार, आपल्या भाषेंत चांगलीं अर्थात् इंग्रजीला शोभण्यासारखीं पुस्तकें निर्माण व्हावीं, अशी इच्छा तीव्र होण्याइतका झालेला होता. स्वत: लोकहितवादींनीं या काळापर्यंत स्वतंत्र पुस्तकांचें लेखन बरेंच केलें असलें तरी पुष्कळशा लेखकांना आपलीं पुस्तकें छापण्याचें आर्थिक अवसान नाहीं, व पुष्कळांचीं पुस्तकें छापलीं जाऊनहि लोकांत त्यांचा आदर होत नाहीं, असें लोकहितवादींच्या लक्षांत आलेलें होतें. म्हणून त्यांनीं संमेलन भरविलें त्यावर्षीं एक 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळ' या नांवाची संस्था स्थापन केली होती. तिचा उद्देश योग्य पुस्तकें छापावीं आणि तशीं पुस्तकें आधीं छापलेलीं असतील तर त्यांना कांहीं मदत पोंचवून उत्तेजन द्यावें असा होता. या संस्थेपूर्वीं सरकारनें अशा दोन संस्था जन्मास घातलेल्या होत्या. त्यांपैकीं दक्षिणी भाषेंत ग्रंथ करणारी मंडळी या संस्थेचा शेवट लवकर झाला व 'दक्षिणा प्राइझ कमिटी' ही संस्था, संमेलन भरलें त्या सालीं व त्या सालानंतर आणखी १०।१२ वर्षें जीव धरून आपलें बक्षीस देण्याचें काम थोडेंफार बजावीत होती. या सर्व परिस्थितीकडे लक्ष पुरवून रानडे लोकहितवादींनीं संमेलन भरविलें. सुमारें शंभरापर्यंत ग्रंथकार जमले होते. लोकहितवादीच अध्यक्षस्थानीं होते. रानड्यांनीं संमेलनाचा उद्देश व मराठी भाषेची स्थिति हीं दोन्हीं श्रोत्यांना समजावून सांगितली. सभासदांनींहि चर्चा केली. या संमेलनाची समग्र माहिती उपलब्ध नसल्यानें सभासदांच्या चर्चेचें स्वरूप कळणें शक्य नाहीं. संमेलन तीनचार तासांत आटोपलें असावें, असा कयास उपलब्ध माहितीवरून काढतां येतो. यानंतर दुसरें संमेलन १८८५ सालीं भरलें. मध्यंतरीं संमेलनाच्या दृष्टीनें ग्रंथकार अगदींच स्वस्थ होते असें म्हणतां येत नाहीं. त्यांनीं १८८५ सालापूर्वीं या दृष्टीनें कांहीं हालचाल केल्याचा संदर्भ 'केसरी' मध्यें सांपडतो.

१८८५ सालच्या संमेलनाची हकीकत पहिल्या संमेलनासारखीच आहे. १८७८ पेक्षां या सालापर्यंत लोकजागृति जास्त झालेली होती. 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी'चा कारभार संपुष्टांत आलेला होता. मंडळीसाठीं जो निधि जमविण्यांत आला त्याच्याबाबतींत कांहीं गोंधळ सुरुवातीसच झाला व व या गोंधळाचा अपशकुन त्याला कायमचा भोंवला असें म्हणावयास हरकत नाहीं. १९०५ सालचें साताऱ्चें संमेलन वगळल्यास १९०८ पर्यंत पुण्यालाच संमेलनें भरविण्याची वहिवाट होती. संमेलनें एका दिवसांत आटपण्याऐवजीं दोन दिवसांपर्यंत त्याच्या कामाच्या पसाऱ्याची मजल गेली; हीच काय ती प्रगति म्हणतां येईल. पुण्याबाहेर संमेलन बोलावण्याचा पाया साताऱ्यानें घातला. त्याचें अनुकरण बडोद्यानें केलें व तेव्हांपासून संमेलनें निरनिराळ्या शहरीं भरण्याचा क्रम अखंड चालू आहे. बडोदा, अकोला, मुंबई, इंदूर, पुन्हां बडोदें, मुंबई याप्रमाणें १९०९-१९२६ च्या काळांत आणखी










सहा संमेलनें झाल्यावर संमेलन सुमारें २० वर्षांनीं पुन्हां: पुण्याला आलें व तेथून पुढें ग्वाल्हेर, बेळगांव, मडगांव ( गोवें ), हैद्राबाद ( दक्षिण ), कोल्हापूर, पुनश्च इंदूर, बडोदें, मग नागपूर, अहमदनगर, जळगांव, मुंबई, रत्नागिरी, सोलापूर, सांगली, नाशिक, धुळें, बेळगांव, हैद्राबाद ( दक्षिण ) असें अखिल महाराष्ट्रांत संमेलनाचें प्रस्थान घडलें. इंदूरच्या पहिल्या संमेलनांत तेथील महाराजांनीं एकरकमी १० हजार रुपयांची देणगी देऊन संमेलनाला उपकृत केलें. बडोद्याचे कै. श्री. सयाजीराव महाराज हे सुविद्य, सुसंस्कृत, कल्पक व एरवी दानशूर असले तरी त्यांचें संमेलनाला प्रत्यक्ष साहाय्य झालें नाहीं. ग्वाल्हेरची कथा अशीच आहे. तथापि बडोदें महाराजांनीं मराठी ग्रंथांना बक्षिसें मिळावीं, अशी योजना संस्थानाच्या कारभारामध्येंच अमलांत आणली. ग्वाल्हेर-इंदूराहून मराठी ग्रंथकारांना पारितोषिकें दिलीं जाण्याची व्यवस्था अस्तित्वांत आली; एवढें श्रेय त्या संस्थानांच्या पदरीं टाकायला हरकत नाहीं. इचलकरंजीला संमेलन भरण्याचा योग कधीं आला नाहीं. पण मागील संस्थानिक कै. बाबासाहेब इचलकरंजीकर हे स्वभाषेचे अभिमानी व प्रगमनशील विचारांचे उदार पुरुष असल्यामुळें त्यांनीं मराठी ग्रंथलेखनाच्या उत्तेजनाची सोय केली होती, याची नोंद सहज आल्या ओघांत करणें अवश्य आहे.

## अध्यक्षीय निवडणुकीमागील वातावरण

संमेलनें जेथें भरलीं त्या शहरांच्या संदर्भात त्यांच्या अध्यक्षांची पहाणी करणेंहि उद्बोधक ठरेल. चिंतामणराव वैद्य, गोविंदराव कानिटकर, रणछोडदास कीर्तिकर, हरिभाऊ आपटे, गणेश जनार्दन आगाशे, बाळासाहेब मिरजकर, न. चिं. केळकर, श्री. माधवराव किबे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, श्री. माधवराव अणे, शिवरामपंत परांजपे, वामन मल्हार जोशी, डॉ. श्रीधर व्यं. केतकर, कृष्णाजीपंत खाडिलकर, श्री. ना. गो. चापेकर, श्रीमंत राजे बाळासाहेब औंधकर, मा. त्रि. पटवर्धन, महामहोपाध्याय श्री. पोतदार, श्री. सावरकर, श्री. ना. सी. फडके, श्री. वि. स. खांडेकर, श्री. बापूसाहेब माटे, श्री. प्र. के. अत्रे, श्री. मामा वरेरकर, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर याप्रमाणें अध्यक्षांची नामावलि अध्यक्षांचा विचार करतांना दृष्टिपुढें येते.

हल्लीं कित्येकवर्षें संमेलन जेथें भरावयाचें तेथील स्वागतमंडळाच्या मताधिक्यानुसार अध्यक्षाची निवड होत असली व पूर्वीं तसाच प्रघात असला तरी एकदां संमेलनाला राजकारणाचें अर्थात् राज्यकर्त्यांच्या मर्जी-नामर्जीचें वारें सांभाळावें लागत असल्यानें अध्यक्षाची निवड करतांना राजकीय वातावरणावर लक्ष ठेवावें लागत असे. प्रारंभींच्या पुणें येथील संमेलनांत विद्वत्तेचा मान हें अध्यक्षाच्या निवडीचें धोरण होतें व तेव्हां मे महिन्यांतील अनेक सार्वजनिक कार्यांतील एक कार्य एवढेंच त्याला महत्त्व होतें. १९०७-०८ सालांत संमेलनाची कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीनें पाऊल टाकण्याचा प्रयत्न झाला. तेव्हां महाराष्ट्रानें आपल्या समोर बंगालच्या साहित्यसंमेलनांचा कित्ता कै. वासुदेव गोविंद आपटे यांच्या प्रेरणेनें ठेवलेला होता. त्यावेळीं संमेलनाच्या चिटणिसांत कै. कृ. प्र. खाडिलकर हे एक होते. ते 'केसरी' पत्राशीं संबंध असलेले व केसरीवर सरकारचा रोष; त्याची झळ संमेलनाला लागू नये म्हणून खाडिलकरांना आपलें काम सोडावें लागलें. बडोद्याच्या पहिल्या संमेलनांत कै. ले. क. रणछोडदास कीर्तिकर यांना अध्यक्ष निवडतांना बडोदें हें संस्थान व कीर्तिकर हे एक मोठे सरकारी पेन्शनर यामुळें सरकाराला त्यांत अप्रिय वाटण्याजोगें कांहीं नाहीं, असा विचार बाळगला गेल्याचें सहज दिसून येईल. त्यानंतर अकोल्यास स्वागतमंडळाचे अध्यक्ष सरकारी पेन्शनर कै. विष्णु मोरेश्वर महाजनी आणि अध्यक्ष नेमस्त पक्षांत मोडणारे हरिभाऊ आपटे अशी जोडी वरील धोरणाची निदर्शक आहे. संमेलनाच्या कामाला पैशाचा पाठिंबा पाहिजे. त्या आशेनें मुंबईच्या संमेलनासाठीं कै. बाळासाहेब मिरजकरांना अध्यक्ष या नात्यानें निमंत्रण केलें होतें. त्याच हेतूनें पुढें श्रीमंत राजे औंधकर यांना अध्यक्षस्थान मंडित करण्याची संधि इंदूरास देण्यांत आली. पुण्यांतील म. सा. परिषदेच्या इमारतीची जागा ही औंधकरांच्या गोटापैकीं याचा बोध वाचकांना असेलच. इंदूरच्या पहिल्या संमेलनाला कै. गणेश जनार्दन आगाशे यांना अध्यक्षस्थान

# गेलीं महाराष्ट्र–साहित्यसंमेलनें व त्यांचें कार्य

देतांना ते संस्थानी राजकारणाला शोभेसे आहेत हा विचार संमेलनाच्या सूत्रधारांनीं डोळ्यांआड केलेला नव्हता. ग्वाल्हेरला ना. माधवराव अणे यांची निवड करतांना ते अखिलभारतीय मध्यवर्ती लोकसभेचे एक वजनदार सभासद म्हणून त्यांच्या निवडणुकीला ब्रिटिश सरकाराचा अडथळा होण्याचा संभव जवळजवळ नाहींच, असा भरंवसा संमेलनाच्या स्थानिक व्यवस्थापकांच्या चित्तांत होता व तोच खरा ठरला. सारांश स्थानिकांच्या मार्फत अध्यक्षांची निवड होतांना मागल्या वातावरणांत कोणत्या गोष्टी पहाव्या लागत याची कल्पना वरील माहितीनें होईल.

अध्यक्षांना कांहीं वाङ्मयविषयक नवा विचार लोकांसमोर ठेवण्याची इच्छा असावी यांत नवल नाहीं व तसा कांहींना कांहीं नवा विचार प्रत्येकानें आपापली रुचि व अभ्यास यांस अनुसरून मांडल्याचें लक्षांत येईल. वाङ्मयाच्या क्षेत्रांतील अनेक वाद अध्यक्षांच्या भाषणांतील कित्येक सिद्धांतांवरून निघालेले आहेत. स्वायत्त तटस्थता, पुनःप्रत्यय, पुनःप्रत्यभिज्ञा, सहानुभूतिपूर्वक ताटस्थ्य, इत्यादि साधारणतः एकाच अर्थाच्या रोखाचीं पण निराळ्या नामधेयाचीं तत्त्वें १९२१ सालीं अध्यक्षस्थानावरून न. चिं. केळकरांनीं वाङ्मयासबंधांत सविकल्प समाधीचा जो सिद्धांत मांडला, त्याचीं अपत्यें होत, हें जाणत्यांना सांगायला नको. 'सत्य आणि सत्याभास' या बद्दलचें १९१२ सालीं हरिभाऊ आपट्यांनीं केलेलें विवेचन अद्यापि वाङ्मयमीमांसेच्या व्यवहारांत तगून राहिलेलें आहे. अशीं आणखी उदाहरणें देतां येतील. अगदीं कांटेकोरपणानें पाहिल्यास ज्यांना वाङ्मयाच्या क्षेत्रांत स्थान मिळूं नये असे 'साहित्य आणि वृत्तपत्रें' यासारखे वाद सुद्धां संमेलनाच्या अध्यक्षीय मनोगतांतूनच जन्मास आलेले आहेत. संयुक्त महाराष्ट्राच्या कामानें साहित्यसंमेलनामुळें जोर धरला, हा प्रकार संमेलनाच्या कायदेशीर क्षेत्राबाहेरचे विषय सुद्धां संमेलनाच्या आखाड्यांत कसे उतरूं शकतात, हें समजण्याला उपयोगी आहे. अध्यक्षांची निवड ही हल्लीं संमेलन भरविणाऱ्या त्या त्या ठिकाणच्या लोकांच्या मताधिक्यावर अवलंबून असते.

सुरुवातीच्या अनेक संमेलनांतून अध्यक्षांनीं बहुधा मराठी वाङ्मयाच्या उणीवा दाखवाव्या असा प्रघात होता. कथा, कादंबऱ्या, कविता, नाटकें, निबंध, प्रबंध यांची रचना मोठ्या संख्येनें स्पृहणीय अशी होत असली तरी इतिहास, चरित्रें, अर्थशास्त्र, समाजशास्त्र यांसारख्या विषयावर ग्रंथ लिहिले जात नाहींत ही एक बहुतेक अध्यक्षांची ठरीव तक्रार होती. देशी भाषांची इंग्रजीच्या शिक्षणांतील व व्यवहारांतील प्राबल्यानें होणारी गळचेपीहि या तक्रारीच्या मुळाशीं असल्याचें सहज कळणारें आहे. इंग्रजीमुळें मराठीला क्षय लागला, अशा अर्थाची हाकाटी लोकप्रिय आहे. परंतु इंग्रजीनें मराठी ललित वाङ्मयाला विविधता व संपन्नता आणली, हें विसरून चालणार नाहीं. ललित वाङ्मयाचें साऱ्याच देशांतून फार मोठें गिऱ्हाइक असतें. महाराष्ट्रांत सुद्धां तोच अनुभव यावा हें साहजिकच आहे. विद्यापीठाचें सारें शिक्षण इंग्रजींतून होत असल्यानें त्या शिक्षणाच्या विषयावर मराठी भाषेंत पुस्तकें लिहून उपयोग नाहीं. ज्या दिवशीं विद्यापीठाचें शिक्षण मराठी माध्यमांतून होऊं लागेल, त्या दिवशीं आपोआप मराठी भाषेंत त्या विषयाचीं नांवाजण्याजोगीं पुस्तकें जन्मास येतील, हें अगदीं सरळ गणित आहे व म्हणूनच विद्यापीठाच्या शिक्षणांत मराठीचा प्रवेश व्हावा, अशी मागणी संमेलनाच्या अनेक ठरावांतून दृष्टीस पडते. मराठी भाषेचा अभ्यास विद्यापीठानें आपल्या शिक्षणक्रमांत घातल्यापासून नुसत्या भाषेपुरती कितीतरी तऱ्हेची ग्रंथनिष्पत्ति गेल्या पंचवीस वर्षांत झालेली आपण पहातों. सारेच विषय मराठी भाषेच्या द्वारें शिकविण्याची व्यवस्था अमलांत आल्यास सर्व विषयांत मराठीमध्यें पुस्तकें होऊं लागतील; परंतु महाराष्ट्राच्या वांट्यास आलेल्या विद्यापीठाच्या कारभारांत अनेक जन्म-भाषांच्या लोकांचा अंतर्भाव असल्यानें इंग्रजीचें महत्त्व कायम रहावें यांत आश्चर्य नाहीं. विद्यापीठांना व पर्यायानें त्यांच्यावर असणाऱ्या सरकाराला वांकविण्याचें सामर्थ्य संमेलनांत नव्हतें म्हणून मराठीच्या सर्वांगीण उद्धाराची मनीषा जोरानें व्यक्त करणें एवढेंच कार्य बजावून संमेलनांच्या लोकांना स्वस्थ रहाणें पूर्वीच्या काळीं भाग होतें. १९१०








सालानंतर स्वभाषेच्या उद्धारासारख्या विषयाच्या जोडीनें सरकारमार्फत जप्त होणाऱ्या पुस्तकांनिमित्त सरकारचा निषेध असा एक नवा विषय उपस्थित झाला व त्यास अनुसरून ठराव होऊं लागले. आतां संयुक्त महाराष्ट्र आणि हिंदी-हिंदुस्थानी विरुद्ध मराठी असे दोन नवे जिव्हाळ्याचे विषय उदयास आले आहेत. श्री. कृष्णराव मराठे यांचा अश्लीलता-निवारणाचा वाद येथें नमूद करायला हरकत नाहीं.

## देशी भाषांचा परधार्जिणेपणा

देशी भाषाभाषिकांचीं संमेलनें सालोसाल भरण्याची प्रथा जशी हिंदुस्थानांत आहे तशी युरोप-अमेरिकेमध्यें असल्याचा दाखला सांपडत नाहीं. तिकडे एकेका ग्रंथकाराचा अभ्यास करणाऱ्या संस्था आहेत. किंवा तशा कायमच्या संस्था नसल्यास एखाद्या प्रसंगीं असे अभ्यासी एकत्र जमून आपल्या व्यासंगाचीं फळें जनतेला चाखवितात. युरोपांत अलीकडे रशियन लेखकांचीं संमेलनें होतात. या संमेलनांतून, रशियन लेखक समाजसत्तावादाची सेवा योग्य रीतीनें करतात कीं नाहीं, याची झडती घेतली जाते. रशियन-संमेलनांचें ध्येय निश्चित आहे. हिंदुस्थानांतील संमेलनें हीं लेखकांमध्यें संघशक्ति निर्माण करण्याच्या उद्देशानें निघालीं असलीं व दरसाल या संमेलनास जमणारांमध्यें उत्साह सपाटून दिसला तरी मूळचा उद्देश बुद्धिपूर्वक सफळ करण्याचा यत्न त्यांमध्यें आढळत नाहीं. आमचें राजकारण आजतागायत जसें परदेशच्या उसनवारीनें नवीं नवीं वळणें व साधनें घेत होतें, तसें आमचें वाङ्मयदेखील उसनवारीवरच जगत आणि वाढत असल्याचा अनुभव येतो. युरोप-अमेरिकेंतून जें कांहीं नवें म्हटलें जाणारें इकडे येईल त्याचा दुबळा नकली स्वीकार हें आमच्या देशी भाषांचें एक कायमचें लक्षण होऊन बसलें आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांत स्वयंभूपणाचें नैसर्गिक तेज चमकत नाहीं. 'गीतारहस्या' सारखा एखादा ग्रंथ अपवादासारखा दाखवितां येईल. पण त्याची साहित्यांत गणना होईल कीं नाहीं याबद्दल संदेह वाटतो. ललितवाङ्मयांत कै. खाडिलकरांच्या कांहीं नाटकांचीं उदाहरणें देतां येतील पण अशीं उदाहरणें इतकीं विरळ आहेत कीं त्यामुळें वर केलेलें उसनवारीचें विधान मागें घेण्याची किंवा बदलण्याची गरज नाहीं. उसनवारीच्या परधार्जिणेपणानें एकप्रकारें बुद्धि भारावलेलीं माणसें इतरांना नवा कित्ता घालून देण्याचें धैर्य कसें दाखविणार ! जी मराठीची अवस्था तीच इतर देशी भाषांची आहे. कदाचित् हिंदीवाल्यांची संख्या मोठी व गुजरातीवाल्यांवर लक्ष्मीची कृपा अधिक म्हणून त्यांच्या संमेलनांचा गाजावाजा किंवा बडेजाव कानाडोळ्यांवर जास्त येत असेल, पण त्या त्या भाषेची तेजस्विता व समृद्धि साहित्यसंमेलनांमुळें किती वाढली याचा अंदाज करूं लागल्यास मराठीला शरम वाटण्याचें कारण पडणार नाहीं. उलट मराठीमध्यें जात्याच सुरुवातीपासून तत्त्वज्ञानाच्या खुराकाचा कस अधिक असल्यामुळें गेल्या शेंसव्वाशें वर्षांच्या उसनवारीच्या निरुत्साही काळांतहि तिनें आपलें मूळचें तेज पुष्कळच कायम ठेवलें आहे असें म्हटल्यास जाणत्यांना तें चुकीचें वाटणार नाहीं असा भरंवसा आहे.

## संमेलनाचें प्रत्यक्षाप्रत्यक्ष कार्य

संमेलनाला एका व्यवसायाचीं माणसें एका ठिकाणीं गोळा करण्यापलीकडे जर कसलेंच ध्येय नसेल तर त्यानें १८७८ ते १९४९ या ७०।७१ वर्षांच्या काळांत साधलें काय म्हणून प्रश्न विचारल्यास अप्रत्यक्षपणें पुष्कळच कार्य साधलें आहे, असें उत्तर द्यावें लागेल. साहित्यविषयक लोकजागृति संमेलनानें सिद्धीस नेली हें उघड दिसणारें आहे. हल्लीं शहरोंशहरीं लहान-मोठीं, काम करणारीं अगर केवळ नावांचीं अशीं वाङ्मयमंडळें दृष्टीस पडतात. बहुधा प्रत्येक शाळाकॉलेजांतून अशींच वाङ्मयमंडळें आहेत, हा संमेलनानें केलेल्या लोकजागृतीचा परिणाम स्पष्ट कळणारा आहे. वाङ्मयाला उत्तेजन मिळावें म्हणून यथाशक्ति द्रव्यदान करणाऱ्या संस्था हें संमेलनाच्या कामगिरीचें फळ ठरतें. मराठी माध्यमांतून सर्व शिक्षण देण्याचा संकल्प सोडून अवतरलेलें पुण्याचें ( महाराष्ट्र ) विद्यापीठ हें संमेलनाच्या मागणीची सफलता नाहीं असें कोण म्हणेल ? मुंबई विद्यापीठांत मराठी भाषेच्या आणि साहित्याच्या अभ्यासाची तजवीज झाली







## गेलीं महाराष्ट्र–साहित्यसंमेलनें व त्यांचें कार्य

याचेंही कारण संमेलनच होय. जप्त झालेलीं अनेक चांगलीं पुस्तकें सरकारच्या रोषांतून सुटलीं याचें श्रेय सरकारी सद्भावनेला जेवढें देतां येईल त्याच्यापेक्षां संमेलनानें केलेल्या लोकजागृतीला जास्त द्यावें लागतें. ही जागृति केवळ संमेलनाच्या प्रयत्नांची फलश्रुति असा दावा नाहीं. लोकांत शिक्षणाचा गेल्या २०।२५ वर्षांत जो विलक्षण वेगाचा प्रसार झाला, त्याचा आधार या जागृतीला आहेच, पण कर्तव्याच्या दिशेनें त्या जागृतीला संघटित करण्याची कामगिरी संमेलनाची आहे. ही जागृति संमेलनाच्या वेळीं जितकी उत्कट दिसते तितकी उत्कट त्या त्या स्थळीं व एकंदर महाराष्ट्रांत मागाहून राहात नसेल. पण बारकाईनें पाहिल्यास सालोसाल नियमानें संमेलन भरणें हें त्या जागृतीचा टिकाऊपणा सुचविणारें लक्षण डोळ्या-आड करून चालणार नाहीं. संस्थानिकांना आपल्या मराठी जन्मभाषेविषयीं विचारपूस करून सक्रिय सहानुभूति उत्पन्न झाली, हा अनुभव आपल्या कर्तबगारीचा, असा हक्क संमेलन त्याबद्दल सांगूं शकेल. मागें एकदां इंदूरच्या एका राजानें कांहीं शेकड्यांचीं बक्षिसें देऊन दोनतीन भाषांतरवजा पुस्तकें उजेडांत आणलीं. राजांची अशी लहर, हीं संमेलनें भरूं लागून चांगलीं पुस्तकें निपजावीं आणि त्यांच्या जन्मदात्यांचा लेखनोत्साह टिकावा वगैरे मागणी सार्वजनिक रीतीनें उच्चारलें जाऊं लागल्यावरची, असल्यामुळें त्या लहरीनिमित्त संमेलनाला धन्यवाद देणें प्राप्त आहे. परंतु एखाददुसऱ्या लहरी श्रीमंता-च्या भरंवशानें वाङ्मयाची भरभराट होण्याचा काळ इंग्रजी राजवटीनें संपवीत आणल्यामुळें लोकाश्रयानें साहित्याचा संस्कार उत्कर्षास चढणें अवश्य होतें व तसा लोकाश्रय निर्माण करण्याची जबाबदारी संमेलनानें पार पाडली आहे.

### महाराष्ट्र साहित्यपरिषदेचें कार्य

संमेलन वर्षांतून एकदां भरतें, पण त्याचें कार्य सतत चालायला पाहिजे म्हणून महाराष्ट्र साहित्य–परिषद या नांवाची एक संस्था चाळीस वर्षांमागें स्थापन झाली. संमेलन भरविण्याप्रमाणें नवे चांगले ग्रंथ लिहविणें हा या संस्थेचा उद्देश आहे. या उद्देशा-मागें द्रव्याचा भरपूर संचय असता तर कदाचित् कांहीं चांगले ग्रंथ प्रकाशांत आले असते. नुसत्या कसेंबसें वार्षिक वर्गणीवर ग्रंथांचें लेखन व प्रकाशन हीं दोन कामें करणें शक्य नसल्यामुळें इंदूरची रक्कम हातीं पडेपर्यंत या कामांना हात घालण्याचा विचार परिषदेच्या सूत्रधारांना करतां आला नाहीं. पुढें या विचारानुसार चारदोन ग्रंथांची रचना करविण्याच्या उद्योगांत हजारबारांशें रुपये खर्ची पडले, परंतु ग्रंथ जगापुढें येण्यासारखे नव्हते म्हणून लेखनकामाठीचा सदर मुशाहिरा वाया गेला. फक्त कै. वा. अ. भिडे यांचें एक अर्धवट पुस्तक उजेडांत आलें. वाङ्मय हें कार्य हुकमी मोबदल्या-च्या जोरावर सिद्धीस जाऊं शकते कीं नाहीं हा फार जुना व अद्यापि समाधानकारक रीतीनें न सुटलेला एक प्रश्न आहे. इंग्लंडांत गेल्या शतकाच्या प्रारंभीं धाकटा पिट मुख्य प्रधान असतांना त्याच्या पुढें कांहीं पुस्तकांच्या जन्मदात्यांना सरकारांतून बक्षीस मिळावें अशा अर्थाची शिफारस एकदां ठेवण्यांत आली. तेव्हां त्यानें ' वाङ्मय ही बक्षिसाच्या कृत्रिम उपायांनीं निकोप वाढीस लागणारी वस्तु नाहीं. ती जगाच्या धकाधकींत आपल्या अंगच्या जन्मसिद्ध बळकट गुणांनीं जगण्यांतच तिचें खरें महत्त्व व मोल आहे. बक्षिसाच्या कृत्रिम उबाऱ्यांत ती निरोगी रहाण्याचा संभव कमी ' असा युक्तिवाद लढवून त्यानें वाङ्मयाबद्दलची शिफारस धुडकावून लावली अशी माहिती इतिहासांत आढळते. पिटच्या युक्तिवादांत वाङ्मयाच्या वाढीचें रहस्य निश्चित भरलेलें आहे व लोकांच्या ज्ञानाचा व्याप व त्यास अनुसरून अभिरुचि वाढत गेल्याशिवाय वाङ्मयाचा बहुशाखी विस्तार होत नाहीं. संमेलनानें स्वभाषेचा अभिमान जिवंत ठेविला व त्याचा कस वाढविला. त्यामुळेंच गेल्या शतकांतील अनेक छापखानेवाले व स्वतंत्र प्रकाशक नवीं नवीं पुस्तकें लोकांसमोर ठेवण्याचें धाडस करूं शकले. संमेलनांच्या जोडीनें असे छापखानेवाले व प्रकाशक यांच्याहि काम-गिरीचा वृत्तांत पाहाण्यासारखा आहे. परंतु त्या-संबंधींचा मोह येथें आवरल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

संमेलनानें म. सा. परिषद या नांवाची संस्था संमेलनाचें कार्य वर्षभर सतत चालविण्यासाठीं जन्मास घातली. ही संस्था १९३२ सालापर्यंत मुंबई-







से होती. परिषदेचे हातून मुंबईस कांहींच कार्य होत नाहीं, किंबहुना इतर ठिकाणच्या कार्याला या संस्थेचा केव्हां केव्हां अडथळाच होतो असा कांहीं खरा व कांहीं काल्पनिक अनुभव घेऊन परिषद् व संमेलन यांचें नातें निश्चित करणाच्या कामाला १९२१ सालीं बडोदेकर मंडळींनीं हात घातला. परिषद् व संमेलन यांच्या नात्यामध्यें दोष असल्याच्या आरोपाचें सूत्र हातीं घेऊन पुढें पुण्याच्या उत्साही मंडळींनें हें काम धसास लावण्याचा उद्योग सालोसाल चालविला. हळुहळू तो विषय साऱ्या महाराष्ट्राचा बनला. या विषयांतल्या उलट—सुलट हिसकाहिसकीचा वृत्तांत मनोरंजक आहे. वाद वर्षानुवर्षे चालू राहिला तरी त्यांतून कांहीं चांगल्या गोष्टी निष्पन्न झाल्या. पुण्यास म. सा. परिषदेची इमारत झाली. याप्रमाणें कायमची व हक्काची वास्तु उभी रहातांच तिच्या आधारानें अनेक नवीं नवीं कामें करण्याचा उत्साह वाढला. आज म. सा. परिषदेचा वार्षिक अहवाल पाहिल्यास त्यामध्यें भाषेच्या अभिवृद्धीचीं भरीव म्हणतां येतील अशीं कितीतरी कामें दिसतील. ज्यांनीं मुंबईच्या मगरमिठींतून म. सा. परिषद् सोडवून पुण्यास नेली त्या मंडळींतील आज म. सा. परिषदेच्या कार्यांत फारसे कोणीच राहिलेले नाहींत. ज्यांनीं पुण्यास परिषद् गेल्यावर अत्यंत उत्साहानें काम केलें, त्यांत रा. सा. र. छ. जोशी यांचें नांव बऱ्याच प्रामुख्यानें उच्चारावें लागेल. माधवराव पटवर्धन मंदिराची निर्मिति व म. सा. परिषदेच्या सभासदांची वाढ या दोन बाबतींत त्यांनीं व श्री. वि. द. घाटे यांनीं केलेले श्रम प्रशंसनीय व अनुकरणीय ठरणारे आहेत. म. सा. परिषदेचें कार्यालय हेंच जणूं काय आपलें घर अशा वृत्तीनें परिषदेचें कार्य गेलीं कित्येक वर्षे अविश्रांतपणें करणारे प्रा. वा. दा. गोखले यांचेंही नांव येथें नमूद करणें अवश्य आहे. म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. बापूसाहेब माटे हे मुळांत परिषदेचे व संमेलनाचे फारसे चहाते नव्हते. परंतु अलीकडे त्यांनीं परिषदेच्या उर्जिताकरितां नव्या योजना केवळ कल्पिल्या एवढेंच नसून त्यांच्या साफल्यार्थ ते परिश्रम घेतात हा त्यांचा विशेष उल्लेखनीय आहे. पूर्वी म. सा. परिषदेच्या त्रैवार्षिक पत्रिकेमध्यें संपादकाच्या खास अभिरुचीच्या विषयांना जास्त स्थान मिळत होतें. एकदां ऐतिहासिकाला तर एकदां समाजशास्त्राला प्राधान्य होतें. श्री. के. नारायण काळे, प्रा. रा. श्री. जोग व राजकवि यशवंतराव पेंढारकर यांच्या संपादकीय कारकीर्दीत त्याला साहित्यदृष्ट्या चांगलें वळण लागत असल्याबद्दल परिषदेच्या परिवारांत दुमत नाहीं. परिषदेच्या सर्व स्थित्यंतरांतील ध्रुव पुरुष आणि आज सुद्धां अडीअडचणींच्या वेळचे मार्गदर्शक महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांचा सादर नामनिर्देश येथें अपरिहार्य आहे.

## वाङ्मयांतील नवीन प्रवृत्तीचे वारे

वाङ्मयांत संमेलनाच्या प्रभावानें नव्या नव्या प्रवृत्ती उत्पन्न झाल्या किंवा कसें याची तपासणी, संमेलनाच्या कार्याचें जें स्वरूप सांगितलें त्याकडे लक्ष दिल्यास, व्यर्थ असल्याचें कबूल करावें लागेल. संमेलन ही इतर व्यावसायिकांच्या संघटनेसारखी संघटना नाहीं व तिचे प्रासंगिक सूत्रधार हे निश्चित प्रभावशाली व प्रगमनशील विचारसरणीचे ध्येयवादी पुरस्कर्ते प्रायः नसतात. जास्त व्यापक दृष्टीनें बोलायचें झाल्यास असे पुरस्कर्ते महाराष्ट्रांत किती निघतील याबद्दल साशंकतेनें बोलावें लागेल. याचा अर्थ महाराष्ट्रांत निश्चित विचारसरणीचे लेखक नाहींत असें नाहीं. परंतु मागें म्हटल्याप्रमाणें ही विचारसरणी वारा वाहील तशी पाठ फिरविण्याच्या वृत्तींतून उगम पावली असल्यानें त्या त्या विचारसरणींचें वाङ्मय लोकांना रिझवितें; पण आग्रहपूर्वक कांहीं नवे सिद्धांत वाचकाच्या गळीं बांधण्याची धमक त्या वाङ्मयांत आढळत नाहीं. एकट्या महाराष्ट्राच्या वाङ्मयाची अशी दशा आहे असें नसून हिंदुस्थानांतील सगळ्या भाषांची हीच दशा आहे. पण यापुढें कदाचित् येथें जगांत खेळणाऱ्या वाङ्मयाच्या ध्येयासंबंधातल्या वाऱ्याचा कांहीं परिणाम झाल्यास नकळे ! हें वारें मागील ( १९१४–१९१८ ) महायुद्धाच्या अनुभवानें उत्पन्न केलें; दुसऱ्या महायुद्धानें ( १९३९–१९४५ ) त्या वाऱ्याला अधिक वेग व तीक्ष्णता हीं पुरविलीं आहेत. वाङ्मय हें महायुद्धासारख्या संकटांना थोपवून धरून जगाला सुखशांतीच्या वातावरणांत ठेवण्याला समर्थ










# गेलीं महाराष्ट्र-साहित्यसंमेलनें व त्यांचें कार्य

आहे अशा भावनेनें जगांतील बुद्धिजीवी वर्ग निर-निराळ्या देशांतून एकमेकांना आवाहन करीत आहे; आपल्या देशांतसुद्धां 'पुरोगामी' सारख्या संज्ञा आपल्या नांवाला जोडून जगाच्या सुखशांत्यर्थ आपण काय केलें पाहिजे याची वाटाघाट मधून मधून करीत असतो. अलीकडील हिंदी भाषेच्या प्रेमप्रचारानें निरनिराळे हिंदी प्रांत एकमेकांशीं सलगी करूं लागले असून स्वराज्यप्राप्तीच्या वर्षीं जर हिंदु-मुसलमानांच्या कत्तलींचा घोर उपद्रव फैलावला नसता तर मुन्शी प्रेमचंद या नामांकित कादंबरीकाराची स्मृतिसंस्था दिल्लीस सगळ्या प्रांतिक भाषांचा एक मेळावा भरविणार होती. पी. इ. एन्. या संस्थेनें मागील कित्येक वर्षी असाच सर्व भाषेच्या हौशी विद्वानांना निरनिराळ्या शहरीं एकत्र आणण्याचा यत्न चालविला होता. या हालचालींचा परिणाम मराठी भाषेच्या व्यवहारावर मात्र झालेला दिसत नाहीं. इतर प्रांतिक भाषासंबंधांत असाच निष्कर्ष निघतो. परंतु सारे देश दळणवळणाच्या बाजूनें एकमेकांच्या अति-जवळ येत असल्यानें साऱ्या जगांतील लेखकांचें ध्येयदृष्ट्या एकीकरण घडविण्याचें नांवारूपास येण्याचा संभव पुष्कळच आहे. समाजाच्या एकंदर कारभारांतील वाङ्मयनिर्मिति हा सुद्धां समाजाच्या गतीस अनुसरून स्वयंप्रेरणेनें चालणारा एक उद्योग आहे, याचें भान ठेवल्यास जगाच्या वाङ्मयाला एका धोरणाच्या सूत्रांत आणून सोडण्याची कल्पना अगदींच थट्टेवारी नेण्यासारखी पोकळ नाहीं.

### वाङ्मय हें अंतःशुद्धीच्या शिक्षणाचें साधन

मागलें दुसरें युद्ध संपून पांच वर्षें पुरीं होण्याच्या आंतच नव्या युद्धाच्या कल्पनेची अभ्रें जगाच्या राजकीय वातावरणांत संचरूं लागावीं, या दुर्दैवाचा परामर्श घेतांना आपल्या देशाला आतां दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची गरज उरलेली नाहीं. हिंदुस्थान हा एक ब्रिटिशांच्या दावणींतला देश आतां राहिलेला नसून त्याला स्वेच्छेनें वागण्याची संधि मिळालेली आहे. आमच्या देशानें म. गांधी म्हणत असत त्याप्रमाणें हजारपंधराशें वर्षें गुलामगिरींत काढलेलीं असून आपल्याला सगळ्या प्रजेची स्वतंत्र राज्याची प्रजा या नात्यानें नवी उभारणी करावयाची आहे. परक्यांच्या राजकीय गुलामगिरींतून सुटण्याचें काम त्या मानानें बरेंच सोपें म्हणावें लागतें ! तें कार्य झालें; त्या कार्याचें स्वरूप बहुतांशीं बाहेरबाहेरचें होतें. आमच्या प्रकृतींत शेंकडो वर्षांच्या संवयीनें गुलामगिरीचीं जीं लक्षणें पक्कीं रुजून बसलेलीं आहेत त्यांचा निकाल यापुढें करावयाचा असेल तर राजकीय गुलामगिरीच्या निरासार्थ योजलेला सत्याग्रहाचा उपाय आमच्या रोजच्या प्रत्येक व्यवहारांत उतरणें अवश्य आहे. स्वराज्य आलें तरी गुलामगिरीची वागणूक अजून लोकांत दिसावी—अतिशय मोठ्या प्रमाणांत व तीहि आंधळ्या दुराग्रहाच्या पाठिंब्यानें दिसावी—याला सुचिन्ह म्हणतां येणार नाहीं. हिंदी प्रजा इंग्रजांनीं एकजिनसी होऊं दिली नाहीं. संस्थानें व ब्रिटिश हद्द यांतील प्रजांची वैचारिक उन्नति एकाच दिशेनें व्हावी ही सवडहि इंग्रजांनीं कधींच उत्पन्न होऊं दिली नाहीं. ब्रिटिश हद्दींतल्या प्रजेचा एकजिनसीपणा भंगावा म्हणून त्यांनीं जाति-धर्म यांच्या भेदाच्या पाचरा लोकांच्या व्यवहारांत राहूं दिल्या; इतकेंच नव्हे तर सदैव भक्कम राहतील अशा व्यवस्थेकडे लक्ष पुरविलें. आजचे स्वराज्यकर्ते त्या पाचरा भराभर कायद्याच्या टोल्यानें उपटून टाकीत असले तरी त्या पाचरांचे परिणाम समूळ नष्ट होण्याला जी अंतःशुद्धि व्हायला पाहिजे त्या शुद्धीचें शिक्षण देण्याचें एक साधन वाङ्मय हें आहे. यंदाचे नियोजित अध्यक्ष आचार्य शंकरराव जावडेकर हें वाङ्मयाचा राष्ट्रोध्दाराच्या दृष्टीनें विचार करणारे मुनि असून त्यांचें अध्यक्षीय भाषण साहित्यक्षेत्रांत वावरणारांना प्रक्षोभक वाटण्यासारखें पण मार्गदर्शक होईल असा भरंवसा आहे. यामुळें यंदाच्या संमेलनाकडे त्या कार्याच्या रसिकांचें लक्ष वेधून राहिल्यास नवल वाटायला नको.







प्रा. गं. भा. निरंतर

# मागील साहित्यसंमेलनांतील ठरावांचें समालोचन

संमेलनांत विधायक असें जें कार्य होतें त्यांपैकीं ठराव हें एक महत्त्वाचें कार्य आहे. संमेलनाचीं अधिकृत मतें ठरावरूपानें व्यक्त होतात. म्हणून संमेलनाच्या फलश्रुतीचा आढावा घेतांना ठरावांचाच प्रामुख्यानें आधार घेणें सुसंगत ठरेल.

या ठरावांत दोन भाग असे दिसतात कीं ज्यांची अंमलबजावणी सरकारच्या सहानुभूतीवर अवलंबून असते असा एक भाग आणि ज्यांची अंमलबजावणी जनतेवर, लोकमतावर अवलंबून असते असा एक भाग.

साहित्य-परिषदेसारखी एखादी संस्था स्थापण्याचा विचार न्या. रानडे यांच्या मनांत प्रथम आला. मराठी भाषेचा संसार सुव्यवस्थित चालविण्यासाठीं जी योजना न्या. रानडे व लोकहितवादी यांच्या मनांत होती ती मराठी ग्रंथोत्तेजक सभा किंवा मंडळी या संस्थेच्या रूपानें प्रकट झाली हें येथें आज मुद्दाम नमूद केलें पाहिजे. १८७८ मध्यें जें पहिलें संमेलन झालें तें ग्रंथकारांचें होतें. ग्रंथ थोडे व ते वाचणारे त्याहून थोडे. ही परिस्थिति दूर होण्यासाठीं ग्रंथकारांस उत्तेजन देऊन स्वल्प दरानें ग्रंथ विकण्यासाठीं कांहीं संघटित प्रयत्न करावेत हा या पहिल्या संमेलनाचा हेतु होता.

दरसाल पांच रुपयांचे ग्रंथ घेणाऱ्यांच्या सह्या जमविण्याचा उद्योग लोकहितवादी व रानडे यांनीं केला. 'मराठी-उत्तेजक मंडळी' असें नांव ठरलें. या योजनेप्रमाणें मराठी ग्रंथकारांचें पहिलें संमेलन ११ मे १८७८ रोजीं पुण्यास भरलें. या पहिल्याच संमेलनासहि ग्रंथकार थोडे आले. परंतु माधवरावांनीं धीर सोडला नाहीं. १८८५ सालीं दुसरें संमेलन भरलें. तेंहि ग्रंथकारांचेंच होतें. ग्रंथकार व वर्तमानपत्रकार अशी ३०० निवडक मंडळी आली. त्यांत अनुपस्थितांनीं पत्ररूपानें सूचना केल्या. त्यांत मराठींत ग्रंथसंपत्ति वाढविण्याच्याच सूचना आहेत. विश्वविद्यालयानें मराठी टाकल्याबद्दलची तक्रार डॉ. कीर्तिकर यांच्या पत्रांत आहे. चांगले ग्रंथ होण्यासाठीं मेडल अगर शेलापागोटें द्यावें, ग्रंथ खपविण्यासाठीं एजंट नेमावे अशाहि सूचना डॉ. कीर्तिकरांनीं केल्या आहेत. ए. ग. भांडारे यांनीं सुचविलें कीं, ग्रंथकर्त्यांनीं आपले ग्रंथ ग्रंथकारबांधवांस निम्मे किंमतींत पाठवावेत. बीभत्स ग्रंथास कायद्यानें प्रतिबंध करावा अशी सूचना लोकहितवादींनीं या दुसऱ्या संमेलनास (१८८५ सालीं) केलेली आहे. सभेनें ग्रंथांच्या गुणावगुणांविषयीं अभिप्राय छापून प्रसिद्ध करावे असें डॉ. भाटवडेकर यांनीं सुचविलें. या उलट असें कांहींहि कार्य होणें शक्य नाहीं, असें सांगणारा एक हितचिंतक निघाला. घंटय्या नायडू हे ते गृहस्थ. त्यांनीं स्वच्छ सांगितलें कीं, ग्रंथकर्त्यांच्या ओळखीपासूनहि म्हणण्यासारखा फायदा नाहीं; टीका ग्रंथ वाचून होत नाहीं; टीकेचें काम निःपक्षपाती विद्वानानें पत्करावें, सभेनें तें काम आपल्याकडे घेऊं नये; सभेनें ग्रंथास मान दिल्यास लोक देतीलच असें समजूं नये. असें घंटय्या नायडू यांचें पत्र याच संमेलनांत दाखल झालें! व्याकरण, कोश यांची आवश्यकता याच संमेलनानें नमूद केली. भाषाशुद्धीचा विचार आगरकरांनीं याच वेळीं मांडला. फार काय सर्व देशांत सारखी भाषा चालेल असा कांहीं प्रयत्न होण्याची सूचना गुजराथहून आलेल्या एक गृहस्थानें हिंदुस्थानींत केली!

१८८५ सालीं झालेलें संमेलन ज्या योजना नमूद करून गेलें त्यापेक्षां जास्त भरीव अशा किती योजना आजपर्यंत, हैद्राबाद संमेलनापर्यंत (१९४७),








पुढें आल्या हें विचार करण्यासारखें आहे. आणि त्याहिपेक्षां ६०-६२ वर्षांपूर्वी संमेलनांत पुढें आलेल्या योजनांपैकीं कोणत्या योजना आणि किती प्रमाणांत संमेलनामुळें वा परिषदेकडून पार पाडण्यांत आल्या याचाहि आढावा घेणें उद्बोधक होईल.

१८८५ नंतर मध्यंतरीं २० वर्षें संमेलन झालेंच नाहीं. १९०५ सालीं तिसरें संमेलन झालें. संमेलनाच्या वा ग्रंथोत्तेक सभेच्या कर्तृत्वाविषयीं १८८५ सालीं घंटय्या नायडू यांनीं जी शंका व्यक्त केली त्याचाच कांहींसा अनुवाद १९०५ सालच्या तिसऱ्या संमेलनासंबंधीं केसरींत व्यक्त झाला आहे. केसरीकार लिहितातः—

" चार विद्वान् एकत्र जमले असतां काव्यशास्त्र-विनोदाच्या ज्याप्रमाणें गप्पा होतात तशाप्रमाणें सुखानें व आनंदानें बऱ्याच विषयांवर चर्चा होऊन मोठी मौज झाली असें सदर संमेलनाच्या प्रसिद्ध झालेल्या हकीकतीवरून दिसते... मनुष्य जात्याच उत्सवप्रिय आहे. मग तो विद्वान् असो किंवा अविद्वान् असो. भेद इतकाच कीं, विद्वान् एकत्र झाले असतां आपला काल काव्यशास्त्र विनोदांत घालवितात आणि मूर्ख त्याच्या उलट व्यसनांत, निद्रेंत किंवा कलहांत घालवितात. साताऱ्च्या सभेंत जमलेले लोक विद्वान् असल्यामुळें त्यांनीं पहिल्या मार्गाचें अवलंबन केलें. जेवण्याखाण्याचा वगैरे बेत उत्तम राहून मंडळींचा काल पुष्कळ मौजेंत गेला याबद्दल कोणासहि शंका घेण्यास जागा नाहीं."

मध्यंतरींच्या कालांत राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, अशा घटनांप्रमाणेंच शुद्ध वाङ्मयीन अशाहि घटना झालेल्या आहेत. परंतु त्यांची दखल १९०५ च्या संमेलनानें घेतली नाहीं. सामाजिक व राजकीय पक्षोपपक्षात्मक प्रश्नापासून अलिप्त रहावयाचें हें धोरण संमेलनानें आरंभापासून ठेविलें. नाशिकचें संमेलन, बेळगांवचें संमेलन, कांहीं अंशीं धुळ्याचेंहि हीं अपवादांत जमा होतात. या अलिप्तपणामुळें विविध पक्षांतील माणसें एकत्र येण्यास एक व्यासपीठ निर्माण झालें खरें! परंतु इतक्या सोवळेपणाचा परिणाम असा झाला कीं, एकत्र येणें एवढीच संमेलनाची फलश्रुति होत गेली!

ठरावाच्या अंमलबजावणीच्या जबाबदारीची जाणीव या विविध वा विचित्र मेळाव्यांत उत्पन्नच होऊं शकली नाहीं. मराठीभाषा, वाङ्मय यांच्या अभिवृद्धीच्या कार्यास हा मेळावा फारसा उपयोगी पडला नाहीं. विविध मतांच्या पक्षांच्या लोकांचें एकमत असा या ठरावाचा अर्थ घेतला तरी ज्या मुद्यावर तें एकमत झालें त्याचा नंतर पाठपुरावा झालाच नाहीं! सरकारला या प्रचंड एकमताचें भय वाटलें नाहीं! जनतेस त्या मतामागील कार्याची आस्था पटली नाहीं! ठराव होतच राहिले! कार्यें बाहेरच होत गेलीं! संमेलन, परिषद् ही मतमोजणी-वा-नोंदणीची एक जागा झाली एवढेंच!

१९०६ सालीं महाराष्ट्र साहित्य-परिषद् स्थापन झाली. संमेलनांत ठरलेलें कार्य करण्यासाठीं एक स्थायी संस्था निघाली. संमेलनास कार्यकारी मंडळ मिळालें. आणि ठरावांच्या अंमलबजावणीविषयीं अपेक्षा करणें रास्त झालें.

या चौथ्या संमेलनांत (१९०६) मुंबई युनिव्हर्सिटीनें मॅट्रिकला मराठी हा जरूरीचा विषय केल्याबद्दल आभार मानण्याचा ठराव सभेपुढें आला. आणि विजापूरकर, राजवाडे यांनीं त्यावर जोराचा हल्ला केला. राष्ट्रीय शिक्षणाच्या तेजस्वी चळवळीचे पडसाद संमेलनांत ऐकूं आले. राष्ट्रीय युनिव्हर्सिटीच्या मानास ती संस्था योग्य नाहीं; कर्झननें बलात्कार करून त्या एक प्रकारच्या मातेस भ्रष्ट केलें असल्यामुळें तिचा गौरव करण्यांत ग्रंथकारांना कमीपणा आहे असें ठरावाच्या विरोध-कांचें (राजवाडे, विजापूरकर बोडस इ.) मत होतें. शेवटीं कांहींच मत नमूद न करण्याचा सुवर्णमध्य न. चिं. केळकरांनीं काढला आणि पुढें काम चाललें. हाच सुवर्णमध्य संमेलन आज-तागायत पाळीत आलें आहे! तरी फॅसिझमला विरोध, चीनचें अभिनंदन, लोकशाहीचा जयजयकार असे उच्चार मधून मधून झाले पण त्यामुळें खरें सांगावयाचें म्हणजे संमेलन हास्यास्पदच ठरत गेलें! कारण इतक्या दुरून दुरून जळजळीत प्रश्नांना स्पर्श केल्यापेक्षां न केलेलाच बरा असेंच म्हणावेंसें वाटतें.

कोशांचें प्रचंड कार्य (ज्ञानकोश, शब्दकोश,








सुलभ विश्वकोश इ.) महाराष्ट्र शब्दकोश मंडळानें पूर्ण केलें. डॉ. केतकर, दाते, कर्वे, य. गो. जोशी इत्यादि व्यक्तींनीं जी सहानुभूति समाजाकडून या कार्याबद्दल मिळविली ती, याबद्दलची योजना १८८५ सालींच होऊनहि, संमेलन–परिषदांस कां मिळवितां आली नाहीं? संमेलनानें स्वतः एखाद्या कार्याचा संकल्प करावा आणि शेवटीं करणाराचें अभिनंदन करून मोकळें व्हावें असा प्रकार चालू आहे. १९२७ सालीं पुणें संमेलन ज्ञानकोश-संपादक-मंडळास विनंति करूं लागलें कीं, कोशाचें काम पुरें करा! आणि तें काम पूर्ण झाल्याबद्दल तत्परतेनें अभिनंदनहि करण्यांत आलें!

मराठी भाषा, वाङ्मय यांच्या अभिवृद्धीसाठीं अभ्यासाचा पाया नीट बसविला पाहिजे, क्रमिक पुस्तकांना या दृष्टीनें किती महत्त्व असतें हें सरकारला बरोबर माहीत होतें. कोणत्याहि प्रकारच्या स्वाभिमानाचें तण माजूं नये यासाठीं सरकारनें क्रमिक पुस्तकांची योजना स्वतःच हातीं घेतली व ती पार पाडून हुकुमाच्या जोरावर ती जनतेवर लादली! १९०७ सालीं पांचव्या संमेलनांत या अरेरावीबद्दल ओरड झाली. परिषदेनें एक समितिहि नेमली; पण वरील अरेरावीवर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं. तरी पांचव्या संमेलनानें ठरविलेल्या योजनांची अतिशय अभिनंदनीय अंमलबजावणी परिषदेच्या त्यावेळच्या चिटणीसत्रयीनें केलेली आहे. खाडिलकर, भावे व आपटे हे चिटणीस होते. शास्त्रीय-परिभाषा-कोश, ऐतिहासिक कागदपत्र-संग्रह यांच्या प्रकाशनाचीं कामें संमेलनानें परिषदेवर सोपविलीं होतीं. सहाव्या (१९०८) संमेलनाच्या आमंत्रणपत्रिकेंत चिटणिसांनीं जाहीर केलें कीं, चार शास्त्रांच्या परिभाषा झाल्या आहेत, राजवाडे-खंडाचीं ६००।७०० पानें छापखान्यांत गेलीं आहेत, जुन्या काव्यांची यादी तयार झाली आहे!

सहाव्या संमेलनांत राजवाडे यांच्या तपश्चर्येविषयीं सुविद्य वर्गांत उत्पन्न झालेला आदर दिसून आला. सोलापूरचे डॉ. रानडे यांनीं एका गृहस्थाच्या वतीनें असें जाहीर केलें कीं, १८०० ते १९०० काळांतील इतिहासास एक हजार रुपये बक्षिस मिळेल! परंतु राजवाडे म्हणाले, पेन्शनर गुलाम लोकांच्या पसंतीनें काम करण्यास कोणीहि स्वाभिमानी ग्रंथकार तयार होणार नाहीं!

१९११ सालापासून (बडोदें) महाराष्ट्र-विद्यापीठाचा ठराव संमेलन करीत आहे. यंदा बहुतेक सरकारच्या अभिनंदनाचा ठराव होईल. इकडे मध्यंतरीं पुणें विद्यापीठाच्या कार्याची कुचंबणा होत असतांच नेवासें येथें श्रीज्ञानदेव-विद्यापीठ स्थापण्याच्या संकल्पासच संमेलनानें अंतःकरणपूर्वक पाठिंबा दिला (अहमदनगर १९३९). ठरावरूपानें आपलें 'निरुपद्रवी' मत नमूद करतांना त्याच्या अंमलबजावणीच्या शक्याशक्यतेचाहि विचार संमेलनानें करूं नये काय?

शुद्धलेखनाच्या बाबतींत संमेलनानें नेमिलेल्या शुद्धलेखन-समितीचे निर्णय नागपूर विद्यापीठानें व मध्यप्रांत सरकारनें मानले; पण मुंबई विश्वविद्यालयानें 'बीचमें मेरा चांदभाई' या वृत्तीनें स्वतःचें एक शुद्ध (?) लेखन ठरविलें आणि जुनें व नवें याचें असें कांहीं विलक्षण मिश्रण केलें कीं, कांहीं विचारूं नका! आणि पुणें विद्यापीठासहि तें विचित्र शुद्धलेखन शुद्ध करून घेण्याचें धाडस करवलें नाहीं.

मुंबई विद्यापीठाला संमेलनानें वेळोवेळीं ज्या विनंत्या केल्या त्या नागपूर विद्यापीठानें मानल्या असा एक विलक्षण योग आढळतो! म्हणून मुंबई-विद्यापीठाचा निषेध आणि नागपूर विद्यापीठाचें अभिनंदन करण्याचे प्रसंग संमेलनांत आलेले दिसतात! नागपूर विद्यापीठानें मराठीला मान्यताहि दिल्याबद्दल बेळगांवीं (१९४६) अभिनंदन झालें. करील त्याचें अभिनंदन आणि नाकारील त्याचा निषेध हीं कामें संमेलन निरलसपणें करीत आहे! परंतु जें झालें त्यांत संमेलनाचा व परिषदेचा वांटा किती हा प्रश्न जसा गुलदस्तांत राहिला तरी चालतो तसा न झाल्याच्या जबाबदारीचा रहात नाहीं. दर भाषेच्या मध्यवर्ती ग्रंथालयाचाच प्रश्न घ्या! सरकार दहा हजार रुपये मदत देण्यास तयार झाल्याबद्दल अभिनंदन हैदराबादेस झालें (१९४७) आणि त्या ठरावांत दहा हजार रुपये जमविण्याची अट काढून टाकण्याची विनंति करण्यांत आली. ठरावांतील अभिनंदन सरकारनें जमा केलें आणि विनंति (बहुधा सखेद) अमान्य केली!








# मागील साहित्यसंमेलनांतील ठरावांचें समालोचन

सरकारी दृष्टिकोनाचें एक उदाहरण पहाण्यासारखें आहे. मुंबई एल्फिन्स्टन महाविद्यालयांतील मराठी शिक्षविभागाच्या अध्यापकाची जागा सरकारनें कमी केली; आणि पुन्हां भरली (१९३८)! या दोन्ही बाबतींत मराठी भाषा व वाङ्मय यांच्याविषयीं अभिमान व आस्था बाळगणाऱ्या व्यक्ती वा संस्था यांच्या मताची सरकारला कांहीं कदर वाटली नाहीं! संमेलनानें १९२८ सालीं ओरड केली, १९२९ सालींहि ओरड केली!

जणूं काय आपलें मराठी-विघातक धोरण पुरेसें स्पष्ट झालें नाहीं असें सरकारला वाटलें आणि शिक्षणाधिकाऱ्यांनीं वाङ्मयोत्तेजनाची पूर्वीची ९००० रु. ची ग्रँट ६००० वर आणून ठेविली आणि मुंबई इलाख्यांतील देशी भाषांच्या अध्यापकांचे पगार निम्मे केले. त्याबद्दल निषेध करण्याचा प्रसंग संमेलनावर आला! (१९३१). ही आपल्या इलाख्यांतील सरकारकडे आपली पत! पण तरी संमेलनानें निजाम सरकारला आणि गोवेकरांसहि चार गोष्टी सुनावण्याचा संकोच बाळगला नाहीं. (१९२९, १९३०, १९३१, १९३२, १९३३, इत्यादि). ठरावांच्या प्रती त्या त्या सरकारकडे पाठविल्या.

मुंबई नभोवाणीकेंद्राबद्दल ओरड आणि औरंगाबाद नभोवाणी केंद्राचें अभिनंदन हा प्रकार मुंबई विद्यापीठाबद्दल तक्रार व नागपूर विद्यापीठाचें अभिनंदन यासारखाच चालत आला आहे! धुळ्यास (१९४४) तर नभोवाणीकेंद्राचा बंदोबस्त करण्यासाठीं एक समिति नेमण्याचा अधिकार संमेलनाध्यक्षांना देण्यांत आला.

धुळ्यास (१९४४) प्रकाशकांनीं भरमसाट किंमती वाढविल्याबद्दल निषेध झाला आणि विचारप्रवर्तक वाङ्मयावर जरा तरी माया करण्याची विनंति करण्यांत आली. प्रकाशकांनीं त्या विनंतीची किती कदर केली?

परिषदेच्या शास्त्रीय परिभाषा-मंडळाचें कार्य विचारांत घेण्याइतकीहि आस्था स्वतंत्र हिंदुस्थानांतहि सरकारी कोशकार्यांत दिसत नाहीं! इतर विषयांप्रमाणें शास्त्रीय ग्रंथानिर्मितीचीहि कळकळीची, तळमळीची, आग्रहाची विनंति संमेलन करीत आलें आहे! शास्त्रीय ग्रंथहि होत आहेत. परंतु त्यांच्या निर्मितीशीं संमेलन-परिषदांचा कितीसा संबंध आहे? शाळा-कॉलेजापर्यंतचे शास्त्रीय ग्रंथ मराठींत निर्माण होत आहेत. त्यांतील परिभाषिपुरती तरी शास्त्रीयता तपासण्याची दक्षता परिभाषामंडळानें वेळेवर घ्यावी. आपणच आपला अधिकार गाजवावा. कांहीं काळानें तो मान्यता पावेलहि!

वाङ्मयाची वार्षिक परीक्षणें, समालोचनात्मक व्याख्यानें परिषदेतर्फे होतात. परंतु त्यासाठीं लागणारा ग्रंथसंग्रह तर राहोच पण प्रकाशित ग्रंथांची यादीहि परिषदेकडून झाली नाहीं! मराठी ग्रंथकारांची व लेखकांची जंत्री करण्याचें काम पुण्यासच १९२७ सालीं झालें आणि तें कार्य अतिशय अभिनंदनीय स्वरूपांत श्री. दातें या एका व्यक्तीनें पूर्ण केलें! तरी संमेलनानें मात्र याहि कार्याचा आदेश परिषदेस वारंवार दिला आहे! आज तें काम श्री. महादेवशास्त्री जोशी वैयक्तिक जबाबदारीवर करीत आहेत. त्यांना तरी परिषदेचें नेतृत्व कां लाभूं नये?

ग्रंथनिर्मितीच्या बाबतींतल्या ठरावाची उपेक्षा होण्यास जबाबदार कोण? हिंदुस्थानांतील इतर प्रांतभाषांतील ग्रंथ भाषांतरित करण्याचा ठराव वारंवार झाला, त्यासाठीं मंडळ नेमलें, परिषदेला आग्रहाची शिफारस झाली, आणि जणूं काय एवढ्यानें कार्य पूर्ण झालें असें वाटून ज्ञानेश्वरादिकांच्या ग्रंथांचीं इंग्रजी भाषांतरें करण्याचाहि ठराव धडाक्यानें झाला आणि त्यासाठीं समितीहि स्थापन झाली (अहमदनगर १९३९). त्या ठरावांचें काय झालें? समितीनें काय काम केलें, हें कोणीं कोणास विचारावयाचें? हें प्रौढ काम राहिलें म्हणावें तर बालवाङ्मयासाठींहि हेंच झालें. आधीं नुसतें मत नमूद झालें (१९१५) आणि २४ वर्षांनीं समिति स्थापन झाली (अहमदनगर १९३९). त्या समितींतील कांहीं सभासद बालवाङ्मयनिर्मिति करण्यांत अग्रभागीं होते व आहेत. पण त्यांनीं स्वतः लिहिलेल्या बालवाङ्मयास तरी परिषदेचा कांहीं अधिकृत संस्कार झाला काय? समितीचे सभासदच जेथें इतपतच आस्था दाखवितात तेथें इतरांना काय दोष द्यावा?












अनुक्रमणिका

ठराव–अंमलबजावणी होत नाहीं म्हणून ग्वाल्हेरला संमेलनाचेंच स्वतंत्र अंमलबजावणीमंडळ नेमलें (१९२८) आणि त्याहि मंडळानें दगाच दिला. हैदराबादेस (१९३१) यासाठीं एक कार्यकारी मंडळ नेमलें. पुढील वर्षीं त्याचा अहवाल द्यावयाचा होता. पण या मंडळाची सभाच भरली नाहीं. १६ वर्षांनीं पुन्हां हैदराबादेस मंडळी जमली. त्यावेळीं तरी या कार्याची कांहीं चौकशी झाली काय ? कोल्हापुरीं (१९३२) हें ठराव-अंमलबजावणीचें काम साहित्य-परिषदेकडे देण्यांत आलें. परिषदेनें ठरावांची वासलात कशी लाविली याची हकीगत बरीच गुलदस्तांत आहे.

प्रतिवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांतून सर्वोत्कृष्ट ग्रंथास गौरवदर्शक पारितोषिक देण्याचा विचार मुंबई संमेलनानें २२ वर्षांपूर्वी (१९२६) नमूद केला; आणि १० वर्षांनीं (१९३६) हें काम करण्याकडे हिंदी विश्वविद्यालयाचें लक्ष वेधून आपण बेसावधपणें गळ्यांत घेतलेल्या जबाबदारींतून आपली सुटका करून घेतली ! ! दरम्यान दक्षिण-महाराष्ट्र साहित्य-सभेनें हें काम हातीं घेऊन सुरूंहि केलें. परिषदेचा एखादा कार्यकर्ता त्यांत परीक्षक असतो एवढाच परिषदेशीं या कार्याचा संबंध आहे.

निजाम सरकारचें मराठी भाषा, साहित्य, संस्कृति या विषयींचें प्रतिकूल धोरण प्रसिद्ध होतें. त्याबद्दल तीव्र नापसंती प्रत्यक्ष हैदराबादलाच जमून (१९३१ संमेलन) व्यक्त झालेलीच होती. १९४७ सालीं हैदराबादलाच जमून पुन्हां एकदां नापसंती व्यक्त करण्यांत आली. एवढेंच नव्हे तर एक कृतिसमितीहि नेमली आणि कृति-समितीस एक सल्लागारसमितीहि नेमली. या सल्लागार–व–कृति-समितीनें काय कार्य केलें तें घटनेच्या नियमां-प्रमाणें या वर्षीं पुणें संमेलनांत कळेलच ! याच संमेलनानें (हैदराबाद १९४७) मराठी भाषा ही राजव्यवहाराची भाषा होणार म्हणून कायदा, व्यापार इत्यादि विषयांची पारिभाषिक शब्दयोजना व शुद्धलेखनाचा फेरविचार करणारीहि तज्ज्ञांची समिति (नव्हे समित्या !) नेमण्याचा आदेश परिषदेस दिला. अखंड कार्य चालू ठेवावें असे शब्द ठरावांत मुद्दाम घातले ! त्या समित्यांचें एक वर्षभर चाललेलें 'अखंड' कार्य तरी निदान येत्या संमेलनास कळेल ना ?

आजपर्यंतच्या संमेलनानें नेमिलेल्या नुसत्या समित्या पाहिल्या (किंबहुना वाचल्या !) कीं, असें वाटतें कीं, कळत वा न कळत ही एक उपहासा-स्पद प्रथा पडली आहे ! समिति नेमणारांनीं भरीस घातल्यानें कार्यकर्ती माणसें होकार देतात परंतु कार्य होत नाहीं ! शेवटीं समितीच्या सभासदांवर निष्क्रियतेचा ठपका येतो ! या सभासदांनीं संमेलनां-तील हौशी लोकांच्या आहारीं जाण्याचें निश्चयानें बंद करावें ! म्हणजे संमेलन व परिषद यांना येणारी हास्यास्पदता दूर करण्याचें श्रेय त्यांना लाभेल !

नाशिकला (१९४२) ठरावांच्या दृष्टीनें सर्वांत भव्य असा एक ठराव झाला. अखिल भारतीय स्वरूपाची सांस्कृतिक ऐक्यपोषक संस्था स्थापण्या-संबंधींचा तो ठराव होय ! आणि त्या ठरावाच्या अंमलबजावणीसाठीं नेमलेली समितीहि भव्य माणसांचीच आहे (कीं होती ?). निधि गोळा करण्या-बद्दलचे शब्द अधिक घालण्यांत आले. त्या भव्य कार्यो-च्या भव्य समितीची कांहीं विचारपूस ४३ च्या संमेल-नानें केल्याचें ऐकिवांत नाहीं ! या भव्य ठरावा-पुढें त्याच संमेलनांतील (नाशिक १९४२) रशिया व चीन यांच्या अभिनंदनाचा ठराव कांहींच नाहीं !

नाशिकला झालेल्या गंमतीची कल्पना ठरावावरून-हि येते ! जळजळीत असे राजकीय ठराव नाशिकला झाले ! नाशिकनें एक प्रकारें उच्चांक गांठला ! त्या ठरावांत तत्कालीन राजकीय प्रणालींचीं प्रतिबिंबें दिसतात. संमेलनाचा सोवळेपणा चांगलाच बाट-वल्याची बढाई त्या ठरावांचे कर्ते–करविते अद्यापि-हि मारतात. पण संमेलनानें यापूर्वी अगदीं स्थापनेच्या वेळीं योजिलेलीं यापेक्षां कितीतरी महत्त्वाचीं कार्यें वर्षानुवर्ष पडून आहेत हें यामुळें क्षम्य ठरत नाहीं किंवा हें या आनंदाच्या भरांत डावलताहि येणार नाहीं.

लोकशाहीच्या संरक्षणासाठीं, राष्ट्रीय सरकारच्या स्थापनेसाठीं एकजूट व्हावी म्हणून लोकमत जागृत करण्यासाठीं पुढारी सोडावेत हें नाशिकला ठर-विण्यांत आलें आणि याकामीं साहित्यिकांनीं आपली बुद्धि व लेखणी यांचा जास्तींत जास्त उपयोग








करण्याची विनंति पुढील वर्षी धुळ्यास करण्यांत आली !

धुळें संमेलनानें परिषदेवर फारच बोजा टाकला. शके १७४० पूर्वींचीं हस्तलिखित काव्याचीं बाडें जमवावींत, त्यांचे अज्ञात पत्ते नोंदावेत, या कामीं आवश्यक तो खर्च करावा आणि सालोसाल कामाचा वृत्तांत संमेलनांत सांगावा! धुळ्याच्या रामदासी वातावरणाचा हा क्षणिक परिणाम होता हें परिषदेनें ओळखलें असावें आणि ठराव दप्तरीं दाखल केला !

संमेलन व परिषद् यांच्या कार्याविषयीं सरकार (जुनें आणि नवेंहि!) उदासीन आहे आणि जनता तर त्या बाबतींत अगदीं निरपराधी आहे ! हा सर्व इतिहास पाहिल्यावर संमेलनांत ठराव आणणारांनीं आणि प्रचंड पाठिंबा देणारांनीं यांतून उत्पन्न होणारी हास्यास्पदता आतां थांबवावी असें नम्रपणें सांगावेंसें वाटतें ! आणि लोकांचा मलता हुरूप जर आटोक्यांत येत नसेल तर परिषदेनें संमेलनाच्या सोहळ्यांतून पूर्णपणें मुक्त व्हावें आणि पहिल्या संमेलनापासून योजिलेलीं कार्यें पूर्ण करण्यांत आपलें शक्तिसर्वस्व पणास लावावें ! प्रा. पोतदार यासंबंधीं म्हणतातः—

"संमेलनास पदरमोड करून हजर राहावें, तेथें ठराव पास करावे पण त्यांची अंमलबजावणी मात्र मनाजोगती होऊं नये याचा लोकांस विषाद वाटणें साहाजिकच होतें. ठरावांची जर अंमलबजावणी नियमानें करवून घेण्याचा आणि जाब विचारण्याचा अधिकार संमेलनास नसेल तर संमेलनें तरी भरवावीं कां आणि तेथें भाराभर ठराव तरी पसार करावे कां ?... या परिस्थितीवर दोन प्रकारांनीं तोड निघण्यासारखी होती. एक म्हणजे संमेलनानें परिषदेपासून पूर्ण स्वतंत्र व्हावें, आपली घटना बनवावी. आपली कार्यकारिणी नेमावी आणि आपला कार्यभाग उरकून घ्यावा; किंवा दुसरी म्हणजे परिषदेला पूर्णतया आपल्या कार्यकारिणीचें स्वरूप द्यावें.' (म. सा. परिषद्, इतिहास पृ. १७) प्रा. पोतदारांना द्वैताची कल्पना पसंत नाहीं. म्हणून संमेलन–परिषद् ऐक्याचा प्रयोग ते आशेनें पहात आहेत ! परंतु या ऐक्यांत एक घटक (परिषद्) स्थिर आणि दुसरा (संमेलन). केवळ प्रासंगिक, क्षणभंगुर. अशा घटकांच्या ऐक्याचा चालू प्रयोग शेवटीं स्थिर घटकास मारक होतो असें पुरेसें अनुभवास आलें नाहीं काय ?

संमेलनांतून निघालेलीं दोनच कार्यें नांवारूपास आलेलीं दिसतात. एक कार्य म्हणजे मराठी साहित्य-परिक्षा घेण्याचा ठराव कोल्हापुरीं झाला (१९३२). आज प्रवेश ते आचार्य येथपर्यंत या परीक्षांचा विस्तार झाला आहे. सरकारनें या परीक्षांना मान्यता देण्याचा कधींहि नुसता विचारहि मनांत आणला नाहीं. परंतु विद्यार्थिवर्गानें मात्र या परीक्षांविषयीं आस्था दाखवून परिषदेच्या मान्यतेचा आदर व्यक्त केला. आज परीक्षाखातें हेंच परिषदेचें सर्वांत मोठें (आर्थिक दृष्ट्याहि) खातें झालें आहे.

महाराष्ट्र साहित्यपत्रिका-प्रकाशन हें दुसरें कार्य होय. पत्रिका १९१३ सालीं विविधज्ञानविस्ताराला जोडून निघूं लागली. १९१६ सालीं ती त्रैमासिक झाली. १९२५ च्या मेपर्यंत ती चालून अंतर्धान पावली. ती पुन्हां तीन वर्षांनीं १९२८ सालीं अवतीर्ण झाली ती आजतागायत चालू आहे. संशोधनात्मक, तात्त्विक असें तिचें उच्च स्वरूप टिकविण्याचें कार्य नेटानें चाललें आहे.

संमेलनाच्या ठरावांची अशी वासलात लागत आहे. परिषदेवर त्याचे आघात होणें अपरिहार्य आहे. कारण संमेलनावर सत्ता गाजविण्याचा मोह परिषदेस सोडवत नाहीं ! तरी परिषदेंत स्वतंत्रपणें कांहीं भव्य कार्यास आरंभ माजी कार्यकारी मंडळांतच झाला आहे. माजी कार्यकारी मंडळानें मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची प्रचंड योजना आंखली आहे. संदर्भग्रंथालयास आरंभ केला आहे. पोस्ट ग्रॅज्युएट अध्यापनाच्या वर्गांची मागणी विश्वविद्यालयाकडे केली आहे. माजी कार्यकारी मंडळांतले बरेच कार्यकर्ते नव्या मंडळांतहि आहेत. नवें कार्यकारी मंडळ या योजना यशस्वी करून परिषदेच्या निष्क्रियतेबद्दलची तक्रार पुष्कळ प्रमाणांत दूर करील असा विश्वास वाटतो.








आचार्य स. ज. भागवत

# ' अध्यक्ष ' जावडेकर

सुमारें आठ वर्षांपूर्वी आचार्य जावडेकर यांची मुंबई-उपनगर साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षपदीं निवड झाली असतां श्री. जांभेकर यांच्या प्रख्यात ' लोक-शिक्षण ' मासिकांत मी जावडेकरांच्या वैचारिक जीवनाचा परिचय करून देणारा लेख लिहिला होता. ' जीवन आणि साहित्य ' या पुस्तकांत तो पुढें संकलित करण्यांत आलेला आहे. यंदा फार वर्षांनीं पुणें येथें भरत असलेल्या महाराष्ट्र साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षपदीं आचार्य जावडेकर यांची निवड झालेली असल्यामुळें त्याच्यासंबंधीं पुन्हां कांहीं विचार लिहिण्याची संधि निर्माण झाली आहे.

## ' मराठीचें राऊळ '

साहित्यसम्मेलनाच्या अध्यक्षस्थानीं कोणत्या प्रकारच्या विद्वानाला निवडावें याचा वाद महाराष्ट्रांत मधून मधून चालू असतो. या वर्षी देखील या वादाला पुन्हां भरती आली आहे. महाराष्ट्र–साहित्य–परिषद् आणि महाराष्ट्र–साहित्य–सम्मेलन या दोनहि संस्थांचें संलग्नीकरण झालें असल्यामुळें या दोनहि संस्थांच्या ध्येयकल्पनेंत आणि कार्यसाधनेंत जितकी एकरूपता अथवा समरूपता निर्माण होऊं शकेल तेवढें दोघांच्याहि विकासाच्या दृष्टीनें हितकारक होईल. मला व्यक्तिशः नेहमींच असें वाटत आलें आहे कीं या दोनहि संस्था महाराष्ट्रांतील सर्व प्रकारच्या वाङ्मय-सेवकांचा समावेश करणाऱ्या असाव्यात. या ठिकाणीं केवळ ललित–साहित्य अग्रपूजेचा मान मिळविणारें असूं नये. साहित्य म्हणजेच ललित–साहित्य असें मानण्याची गरज नाहीं, साहित्य म्हणजे सर्व प्रकारचें वाङ्मय असें समजावें. आणि या दृष्टीनें साहित्यांत ललित–वाङ्मय व शास्त्रीय-वाङ्मय या वाङ्मयाच्या दोनहि शाखांना सारख्याच सन्मानानें वागविण्यांत यावें. महाराष्ट्रांतील लोकजीवनाच्या सर्व प्रश्नांचा विचार मराठी भाषेंत झाला पाहिजे. महाराष्ट्रीय समाजाच्या राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक सर्व हालचालींच्या पाठीमागें उभी होणारी विचारसंपत्ति मराठी भाषेंतच प्रथम सांठविली गेली पाहिजे. महाराष्ट्राचे इतर प्रांतीयांशीं यावयाचे संबंध राष्ट्रभाषेंत आले तरी त्या संबंधांचा सर्व ऊहापोह मराठींतहि झाला पाहिजे. जागतिक संपर्काच्या दृष्टीनें महाराष्ट्रीयांचा होणारा सर्व व्यवहार इंग्रजीसारख्या जागतिक भाषेंत होणें अपरिहार्य असलें तरी देखील त्या सर्व व्यवहाराची विचारविचिकित्सा मराठींतहि झाली पाहिजे. मराठी भाषेच्या अशा व्यापक समृद्धीवरच महाराष्ट्रीयांचें जीवन समृद्ध होण्याची शक्यता अवलंबून आहे. मराठी भाषा हाच सर्व महाराष्ट्रांतील जनतेला एकत्रित करणारा जीवनाचा धागा बनूं शकेल. यासाठीं महाराष्ट्र-साहित्य-परिषद् अथवा महाराष्ट्र-साहित्य-सम्मेलन या संस्था ' मराठीचें राऊळ ' झाल्या पाहिजेत. त्या ठिकाणीं कोणत्याहि संकुचितपणाची अगर सांप्रदायिकतेची विकारबाधा होतां कामा नये. मराठी भाषेंत जीवनविषयक विचार व्यक्त करून महाराष्ट्र-जीवन समृद्ध करणाऱ्या कोणाहि विचारकाला साहित्य-परिषदेंत अथवा साहित्यसंमेलनांत मानाचें स्थान अवश्य मिळालेंच पाहिजे.

## विचारवत्तेचा सन्मान

या दृष्टीनें आचार्य जावडेकरांची या वर्षीची निवड सर्वांशीं उचित आहे असेंच माझें मत आहे. आहिताग्नि राजवाडे किंवा विद्वद्रत्न दप्तरी किंवा स्वामी केवलानंद ( नारायणशास्त्री मराठे ), तर्क-



अनुक्रमणिका






तीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या सारखी महाराष्ट्रांतील पंडित-मंडळी महाराष्ट्र-साहित्य-सम्मेलनांत भाग घेणार नाहींत, तोंपर्यंत सम्मेलनाला थोरपणा प्राप्त होणार नाहीं असेंच मी मानतों. काकासाहेब कालेलकर, सानेगुरुजी, विनोबाजी भावे, दादा धर्माधिकारी या माणसांच्या सहकार्याशिवाय आणि मार्गदर्शनाशिवाय चाललेलें साहित्यपरिषदेचें किंवा साहित्य-सम्मेलनाचें काम दुर्बळ भासलें तर त्यांत आश्चर्य नाहीं. सध्यां या संस्थांच्या कामांत एक प्रकारची मिरासदारी वावरत असलेली दिसते. राजकारणाची भीति हा तर या मिरासदारीचा एकमेव आधार झालेला दिसतो. या ' शुद्ध ' साहित्यिकांचें स्वतःचें राजकारण नसतें असेंहि नाहीं. इतकेंच कीं तें बहुधा प्रतिगामी असतें, अथवा प्रस्थापित सत्तेची लाचारीनें पूजा करणारें असतें. साहित्याच्या क्षेत्रांत पक्षनिष्ठ राजकारण असावें असें मी कधींहि म्हणणार नाहीं. पण राजकीय विचारांना बुजणारे लोक साहित्यिक क्षेत्रांत घुसणार असतील तर त्यामुळें साहित्याची हानि झाल्याशिवाय राहणार नाहीं. ललित-साहित्याच्या विकासाला देखील जीवन-विषयक निर्भय विचाराची प्रथम आवश्यकता असते. भेकड मन जीवनाला प्रेरक होणारे विचार प्रसवूं शकत नाहीं. यासाठीं साहित्याचा जीवनाशीं असलेला अभेद्य संबंध साहित्योपासकांनीं प्रथम आपल्या जीवनांत अनुभविला पाहिजे. जीवनाची अनुभूति ज्या प्रमाणांत व्यापक होत जाईल त्या प्रमाणांत साहित्यहि प्राणवान् बनूं शकेल. आचार्य जावडेकर यांचें महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनांत फार मोठें स्थान आहे ही गोष्ट आतां सर्वमान्य झालेली आहे. आचार्य जावडेकरांनीं आपल्या असंख्य ग्रंथांनीं मराठी भाषेची केलेली सेवा केवळ अपूर्व आहे. सांस्कृतिक जीवनाचे भाष्यकार या नात्यानें त्यांनीं रानडे, लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, राजवाडे इत्यादि महाराष्ट्रीय विचारवंतांच्या विचारांचें मार्मिक परीक्षण केलें असल्यामुळें महाराष्ट्रीय भाषेच्या अभ्यासकालाहि त्यांच्या ग्रंथांचें अध्ययन करणें अपरिहार्य झालें आहे. त्यामुळें त्यांच्या अध्यक्षत्वाखालीं चालणारें साहित्यसम्मेलन अधिक यशस्वी होईल असें मानण्यास हरकत नाहीं. सुदैवानें जीं तीन नांवें साहित्य-परिषदेकडून अध्यक्षपदासाठीं या वर्षी निवडलीं गेलीं तीं ललित-साहित्यिकांचीं नव्हतींच. प्राध्यापक कृ. पां. कुळकर्णी हे भाषाशास्त्राचे अभ्यासक आहेत. प्रा. कोलते यांनीं विशेषतः महानुभवांच्या संशोधनाचें कार्य चालविलें आहे. या तिघांपैकीं कोणाचीहि निवड झाली असती तरी तो लालित्याचा सन्मान न होतां विचारवत्तेचाच सन्मान झाला असता.

## बुद्धिप्रधान ध्येयवादी महाराष्ट्राचा प्रतिनिधि

जावडेकरांचें वैशिष्ट्य हें कीं ते सामाजिक शास्त्रांचे अभ्यासक आहेत. राजकारण, अर्थशास्त्र, संस्कृतिशास्त्र, यांचा त्यांनीं गाढ व्यासंग केलेला आहे. आणि या विषयांत स्वतंत्र प्रज्ञा चालवून त्यांनीं जीवनाचें एक नवें समन्वयदर्शन निर्माण केलें आहे. समन्वयनिष्ठा हा त्यांच्या बुद्धीचा विशेष असला तरी त्यांची स्वतःची प्रवृत्ति क्रांतिकारक असल्यामुळें त्यांच्या समन्वयदर्शनांत दुर्बलता नाहीं. आध्यात्मिक ध्येयवाद आणि व्यावहारिक वास्तववाद यांचा प्रत्यक्ष जीवनांत त्यांनीं समन्वय घडवून आणला असल्यामुळें आचार्य जावडेकर ही सध्याच्या महाराष्ट्रांतील एक जिवंत विचारशक्ति आहे. रानडे, आगरकर, जोतीबा फुले आणि टिळक हे आधुनिक महाराष्ट्रांतील चार महत्त्वाचे विचारपुरुष झाले. यांचे अंध संप्रदायहि महाराष्ट्रांत झालेले आहेत. परंतु आचार्य जावडेकरांच्या ठिकाणीं ही सांप्रदायिक अंधता आपणाला आढळून येणार नाहीं. त्यांनीं या चारहि जीवन-धारांचा समन्वय साधून तो महाराष्ट्राला उच्च भूमिकेवरून सतत शिकविला आहे. अलीकडच्या काळांत टिळक आणि गांधी यांचें द्वैत निर्माण झालें असतां तें मोडून काढण्याचा यशस्वी प्रयत्न वैचारिक क्षेत्रांत आचार्य जावडेकर यांनीं केलेला आहे. इतकेंच काय पण गांधीवाद आणि मार्क्सवाद या अत्यंत विरोधी भासणाऱ्या जीवनसिद्धांतांचा सूक्ष्म विचार करून त्यांनीं ' सत्याग्रही समाजवाद ' ही आपल्या नवविचाराची देणगी महाराष्ट्रभाषेच्या द्वारा भारताला अर्पण केली आहे. ' आधुनिक भारत', 'लोकशाही' या ग्रंथांचे हिन्दी-गुजरातींतून








झालेले अनुवाद त्या त्या भाषांत लोकप्रिय झाले आहेत. पक्षनिष्ठ राजकारणाचा विचार आणि प्रचार करीत असतांहि त्यांनीं आपली बुद्धि सदैव सत्यनिष्ठच राखलेली आहे. स्वातंत्र्य-प्राप्तीच्या मार्गांत टिळकांनंतर गांधींचेंच पुढारीपण हिंदुस्थाननें आणि अर्थातच महाराष्ट्रानें स्वीकारणें आवश्यक असल्याची त्यांची बौद्धिक खात्री झाल्या-मुळेंच त्यांनीं गांधींच्या पुढारीपणाचा पाठपुरावा केला. या बाबतींतलें त्यांचें गेल्या दोन तपांतील लेखन इतिहासानें संपूर्णतया समर्थित झालें आहे. गांधींच्या राजकारणाचें स्वरूप यथार्थ आकलण्याच्या बाबतींत माझ्या मतें आचार्य जावडेकर यांच्याशीं हिंदुस्थानां-तील कोणीहि विचारवंत तुलनेला घेतां येण्यासारखा नाहीं. खुद्द जवाहरलाल नेहरूंच्या लिखाणांतहि बरीच धरसोड आढळून येईल. परंतु जावडेकरांच्या लेखनांत अशी धरसोड कोठेंच आढळणार नाहीं. महाराष्ट्र हा बुद्धिप्रधान आहे, राजकारण जाणणारा आहे, ध्येयवाद आणि व्यवहार यांच्या सीमारेषा ओळखणारा आहे, हा दावा महाराष्ट्राला करावयाचा असेल तर त्या बाबतींत महाराष्ट्रानें आचार्य जावडेकर यांनाच आपलें प्रतिनिधित्व करूं दिलें पाहिजे. तो मान मी तरी महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याहि माणसास देण्यास तयार होणार नाहीं. आचार्य जावडेकरांचें महाराष्ट्रांतील हें स्थान तरुण पिढीनें मान्य केलेलें मला दिसतच आहे. जसजसा काळ लोटत जाईल तसतसें त्यांचें हें स्थान महाराष्ट्रांत सर्वमान्य होत जाईल यांत मला शंका नाहीं.

### थोर निर्णायक बुद्धि

१९३०–३२ चा स्वातंत्र्यसंग्राम गांधींच्या हातून होईल हें भविष्य आचार्य जावडेकरांनीं 'स्वराज्य' पत्रांतून सतत प्रचारिलें होतें. त्या लढ्यांत महाराष्ट्रांतील सामान्य जनता मोठ्या प्रमा-णावर सामील झाल्यामुळें महाराष्ट्राचें राजकारण बदललें. पुढारीपणाचा गुरुत्वमध्य कायमचा बदलला. जुने पुढारी व जुने विचार संपूर्णपणें मागें पडले. फैजपूर काँग्रेस हें या नव्या बदलाचें प्रतीक ठरलें. त्यानंतर कांहीं काळ काँग्रेसचें राजकारण सनदशीर-पणाच्या मार्गावर आलें होतें. खुद्द गांधींनीं Parliamentary mentality has come to stay म्हणजे काँग्रेसमध्यें सनदशीर राजकारणाची मनोवृत्ति स्थिरावली आहे अशी कबुली दिली होती. तरी देखील दिल्लीची अंतिम सत्ता हातीं येण्यासाठीं आणखी एक प्रत्यक्ष झगडा काँग्रेसला करावा लागेल व त्या झगड्याचें नेतृत्व महात्मा गांधीच करतील असा जावडेकरांचा दृढ विश्वास होता. 'लोकशक्ती' मधून आणि 'लोकशिक्षणां'तून त्यांनीं ही आपली विचारसरणी महाराष्ट्रापुढें अत्यंत ओजस्वितेनें मांडली. जयप्रकाशांसारखे समाजवादी पुढारी आणि गांधीजींच्या सान्निध्यांत असलेले सर्व थोर पुरुष यांचें मत 'गांधीजी असा झगडा करणार नाहींत' असें असतांहि जावडेकरांनीं आपलें राजकीय भविष्य डळमळूं दिलें नाहीं. इतिहास आपणाला ठाऊकच आहे. जावडेकरांचेंच भविष्य खरें झालें. या बाबतींतहि त्यांच्या निर्णायक बुद्धीचें थोरपण मोकळ्या मनानें कबूल केलें पाहिजे.

१९४२–४३ च्या लढ्यांत जावडेकरांच्या विचारांची अधिक वाढ झाली. जागतिक युद्धानें पाश्चात्य विचारकांना हिंसात्मक राजकारणाच्या मर्यादा स्पष्ट दिसूं लागल्या आणि भारतीय क्रांति-कारकांना अहिंसात्मक लढ्याच्याहि मर्यादा जाणवूं लागल्या. या सर्व परिस्थितीचें चिंतन करून जावडेकरांनीं राजकीय क्रांतिशास्त्राची अधिक व्यावहारिक चिकित्सा केली; आणि १९४२ च्या नव्या क्रांतिवादी पक्षाला आपला नैतिक पाठिंबा दिला. पुढें हिंदुस्थानांत सत्तांतर झालें. त्यानंतरचें राजकारण कोणत्या तत्त्वावर चालावें, त्यांत गांधीवादी, राष्ट्रवादी आणि समाजवादी यांनीं आपले परस्परसंबंध कसे ठेवावे याविषयीं आचार्य जावडेकरांनीं भरपूर मार्गदर्शन केलें आहे. काँग्रेस-मधील गांधी–नेहरू युग संपून जवाहर–जयप्रकाश युग सुरूं झालें आहे अशी त्यांनीं घोषणा केली. दुर्दैवानें काँग्रेस सर्वसंग्राहक न राहतां तिचा एक राजकीय पक्ष बनला व जयप्रकाश व त्यांचे अनुयायी हे काँग्रेसमधून बाहेर पडले. यामुळें आचार्य जावडेकरांनीं काँग्रेस सोडून दिली. यापुढें पक्षनिष्ठ राजकारणांत न पडतां स्वतंत्र भूमिका सांभाळून राजकारणांतील प्रश्नांचें विवेचन कर-












ण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारिला आहे. यांतहि त्यांची तत्त्वनिष्ठा किती प्रखर आहे याचें दर्शन आपणांस होऊ शकतें.

## सृजनशील विचारक

आचार्य जावडेकर हे एक मानवजीवनाचा सर्वांगीण विचार करणारे तत्त्वचिंतक आहेत. त्यांच्या राजकारणाची प्रेरणा या त्यांच्या जीवन-विचारांतच आहे म्हणून जावडेकरांना केवळ राजकारणी मत-प्रचारक समजणें म्हणजे त्यांच्या प्रतिभेचा प्रकाश न पाहण्यासारखें आहे. धर्म, अध्यात्म, कला, शास्त्र, नीति इत्यादि जीवन-विभागांचा आणि जीवन-मूल्यांचा परस्परांशीं काय संबंध आहे याचें चिंतन करून ते आपलें जीवनदर्शन घडवीत आहेत. त्या जीवनदर्शनाच्या प्रकाशांत त्यांना समाजविषयक प्रश्नांना कोणता आकार द्यावा याचें स्फुरण होत राहतें. त्यांचें सर्व लेखन अशा स्फुरणानेंच निर्माण झालेलें आहे. म्हणून मी त्यांना एक सृजनशील विचारक ( creative thinker ) मानतों. अशा विचारकांचीं संख्या महाराष्ट्रांत वाढली पाहिजे असें मला वाटतें. म्हणून आचार्य जावडेकरांचें महत्त्व महाराष्ट्रांतील विचारवंतांनीं जाणावें अशी माझी इच्छा आहे.

---

## सनातन धर्म आणि युगधर्म

" अहं ब्रह्मास्मि " हा एक विचार आहे एवढें म्हणून मात्र काम भागणार नाहीं. तो एक अनुभव आहे व या अनुभवाला व्यक्त करण्यासाठीं ते शब्द उच्चारलेले आहेत. " अहं ब्रह्मास्मि " या शब्दांनीं शांकरवेदान्ती जो आत्मानुभव व्यक्त करतात, तोच अनुभव बौद्ध व जैन दर्शनांत निर्वाणपद किंवा आर्हतपद या शब्दांनीं व्यक्त होत असतो. गीतेंत स्थितप्रज्ञावस्था, ब्रह्मनिर्वाणपद या शब्दांनीं तोच अनुभव व्यक्त झालेला आहे. सर्व धर्मांचें अंतरंग या अनुभवांत अथवा अंतरंगक्रांतींत सामावलेलें आहे. सत्यनिष्ठ बुद्धि, प्रेममय अंतःकरण आणि तपःशुद्ध आचरण हें सर्व धर्मांतील अंतरंगक्रांतीचें ध्येय असून त्याची प्राप्ति सर्व समाजाला करून देण्यासाठीं निरनिराळ्या समाजधारणापद्धती निरनिराळ्या धर्मांनीं निर्माण केलेल्या आहेत. या समाजधारणांचा धर्म युगायुगानुसार बदलत असतो. समाजधारणा होण्यासाठीं जुन्या समाज-पद्धती मोडून नव्या समाजपद्धती स्थापाव्या लागतात. आज समाजवाद हा अशीच क्रांति करूं पाहत आहे व त्या दृष्टीनें त्यानें जी समाजवादी पद्धति शोधून काढली आहे, तिला मी युगधर्म मानतो. आज हा युगधर्म क्रांतिरूप बनला आहे.

या क्रांतीनंतर त्याला समाजधारणेचेंच कार्य करावयाचें आहे. पण या कार्याची खरी सिध्दि व परिपाक होण्यास त्याला अंतरंगक्रांतीच्या सनातन धर्माचीहि उपासना करावी लागणार आहे. या सनातन धर्माचें आधुनिक स्वरूप म. गांधींच्या सत्याग्रहांतून जगापुढें येत आहे. या सनातन सत्याग्रही धर्माच्या व समाजवादी युगधर्माच्या सहकार्यानेंच मानव-संस्कृतीचा भावी विकास होणार आहे असें माझें मत आहे. बुद्धि सत्यनिष्ठ बनवावी, अंतःकरण प्रेममय बनवावें आणि आचरण तपःशुध्द ठेवावें या मनुष्याच्या अंतःकरणांतील सनातन वृत्ती आहेत. या सनातन वृत्तींना आजच्या समाजधारणेंत अवसर नाहीं म्हणून त्याच वृत्ती आज क्रांतिकारक बनल्या आहेत.

—आचार्य जावडेकर, ' लो. टिळक व म. गांधी ' पान १२१








अनुक्रमणिका

श्री. एस्. एम्. जोशी

# क्रान्तिनिष्ठ महाराष्ट्राचे मार्गदर्शक

मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून या वर्षी आचार्य जावडेकरांची निवड झाल्याचें ऐकून माझ्याप्रमाणेंच आचार्यांच्या अन्य चाहत्यांना देखील आनंद झाला असेल. कारण त्यांची निवड ही एक मामुली घटना नसून एका नव्या युगाचें तें सूचक चिन्ह आहे. ललित वाङ्मय लिहिणारा तेवढाच काय तो साहित्यिक असें मानणारा एक गट साहित्य-क्षेत्रांत आज वावरत आहे. गंभीर विषयांवर विवेचनात्मक तत्त्वप्रतिपादन करणारे ग्रंथ लिहिणाऱ्या लेखकांना साहित्यिक म्हणण्यास हे लोक तयार नाहींत. या दृष्टीनें पाहिल्यास चिपळूणकर, लोकहितवादी, लोकमान्य टिळक, आगरकर वगैरे थोर लेखकांची गणना देखील साहित्यिकांत करतां येणार नाहीं. परंतु पुण्याच्या स्वागत-समितीनें या वर्षी आचार्यांची निवड करून साहित्याबद्दलची आपली कल्पना इतकी संकुचित नसल्याचें सिद्ध केलें आहे.

## महान् प्रेरणेचा आविष्कार म्हणजे साहित्य

सद् आणि असद्, चांगलें आणि वाईट, सुंदर आणि कुरूप यांत भेद करण्याची शक्ति मानवामध्यें आहे. किंबहुना ही सद्सद्विवेकबुद्धि हाच मनुष्य-जातीचा विशेष आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. त्या बुद्धीच्या साहाय्यानें कर्तव्याकर्तव्याचा विवेक करून जें वाईट आहे त्याचा त्याग करणें आणि आपल्या सद्भावनेप्रमाणें वागून आपलें जीवन सत्य, शिव आणि सुंदर बनविण्याची आकांक्षा बाळगणें यांतच मानवी पुरुषार्थाचें बीज आहे. ती एक महान् प्रेरणा असून तिचा विधायक आविष्कार म्हणजेच साहित्य आणि कला. ती प्रेरणा जीवनव्यापी आहे. शब्दरूपानें ती प्रकट झाली म्हणजे साहित्य निर्माण होतें. उदात्त जीवनाच्या आनंदमय अनुभूतींतून अथवा तत्वचिंतनाचा परिपाक म्हणून जन्माला येणारें साहित्य कधीं विचारप्रधान निबंधांच्या अगर ग्रंथांच्या रूपानें तर कधीं भावनाप्रधान ललित वाङ्मयाच्या रूपानें प्रगट होत असतें.

लोकमान्य टिळकांनीं ललित साहित्य लिहिलें नाहीं. परंतु गीतारहस्यासारखा ग्रंथराज आणि अमाप निबंधलेखन करून त्यांनीं राष्ट्राचें जीवन घडविलें. ज्या वेळीं बुद्धिमन्तांना देखील कर्माकर्माबद्दल संभ्रम निर्माण झाला होता त्यावेळीं त्यांनीं सन्मार्ग कोणता त्याचें दिग्दर्शन केलें. त्यांच्या लिखाणांत एकाद्या व्यक्तीच्या जीवनांतीलच नव्हे तर सर्वसामान्य जनतेच्या जीवनांतील इच्छा-आकांक्षाचें आणि अडीअडचणींचें प्रतिबिंब पहावयास मिळतें. राष्ट्रनिर्मितीचें कार्य प्रभावीपणें करणाऱ्या त्यांच्या लिखाणाला ज्या साहित्यांत स्थान नसेल तें साहित्य अगदींच दरिद्री समजलें पाहिजे.

## क्रांतिनिष्ठांचा मार्गदर्शक

आजही जनमनामध्यें फार मोठा गोंधळ उत्पन्न झाला आहे. जनतेच्या इच्छा-आकांक्षांचा कोंडमारा होत आहे. मतामतांचा गलबला आहे. एका बाजूला लोकांना आततायी बनविणारी कम्युनिस्ट व जातीयवादी शिकवण आणि कार्यपद्धति तर दुसऱ्या बाजूला इतःपर सर्व कांहीं सरकारानेंच करावयाचें आहे, आतां अन्यायाच्या प्रतिकारार्थ सत्याग्रहाची जरुरी नाहीं असा निष्क्रियतेचा उपदेश देणारे तथाकथित गांधीवादी लोक आहेत. अशा परिस्थितींत क्रांतिनिष्ठ महाराष्ट्राला आचार्य जावडेकरांच्या रूपानें मार्गदर्शक लाभला आहे.








मार्गदर्शकाच्या भूमिकेसाठीं लागणारी पात्रता कोणाहि विद्यमान महाराष्ट्रीय पुढाऱ्यापेक्षां आचार्यांच्या ठिकाणीं अधिक आहे असें मला वाटतें. ते नुसते पुस्तकपंडित नाहींत. गांधीयुगांतील राष्ट्रीय-स्वातंत्र्याच्या चळवळींत त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला असून जनमनांतील आकांक्षा आणि आन्दोलनें पाहून त्यांशीं ते पूर्णतया समरस झालेले आहेत. त्या आकांक्षा कशा पुऱ्या होतील याबद्दल सतत चिंतन करून राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, मार्क्सवाद, समाजशास्त्र वगैरे विषयांचा त्यांनीं सखोल अभ्यास केला आहे. त्यांचा दृष्टिकोन वस्तुनिष्ठ आणि प्रतिपादन तर्काधिष्ठित असतें. पक्षाभिनिवेशानें त्यांचे विचार दूषित होऊं शकत नाहींत. काँग्रेसमधील सर्व वडिलधारी माणसें साताऱ्याच्या ग्रामराज्यांतील दोष दाखविण्यांत दंग झालीं होतीं त्यावेळीं आचार्यांनीं त्यांतील सत्यता खंबीरपणें पुढें मांडली. काँग्रेसची आणि सरकारची इतराजी पत्करूनहि काँग्रेसमधील वाढत्या हुकूमशाही वृत्तीमुळें रा. से. दलानें स्वतंत्र होण्याचें ठरविलें त्यावेळीं कोणाचीहि तमा न बाळगता त्यांनीं राष्ट्रसेवादलाला आपला सक्रिय पाठिंबा दिला. तरुण पिढीच्या भावना ते इतरांच्यापेक्षां चांगल्या रीतीनें समजूं शकतात म्हणूनच त्यांना तसें करणें इष्ट वाटलें. समाजवादी पक्ष काँग्रेसमधून बाहेर पडल्यावर 'देशद्रोही' म्हणून सर्व बाजूंनीं शिव्यांची लाखोली सुरू झाली. परंतु काँग्रेसबद्दल आत्यंतिक जिव्हाळा असूनहि आचार्यांनीं आवश्यक विरोधी पक्ष म्हणून समाजवादी पक्षास आपला नैतिक पाठिंबा देण्याचें कार्य निर्भीडपणें चालूं ठेवलें आहे. श्री. शंकरराव देव वगैरे विद्यमान काँग्रेसचे महाराष्ट्रीय पुढारी यांच्याबरोबर आचार्यांचे किती निकटचे आणि जिव्हाळ्याचे संबंध आहेत तें सर्वांना ठाऊक आहे. असें असूनहि त्यांनीं या सर्व गोष्टी केल्या आहेत. कारण आचार्यांच्या मनःश्चक्षूंपुढें एक स्पष्ट ध्येयचित्र आहे. तें साध्य करण्याची एक पद्धतिहि आहे. आपल्या ध्येयोपासनेंत ते इतके मस्त आहेत कीं कोणत्याहि प्रकारची कटुता निर्माण न होऊं देतां निर्ममत्वानें ते या गोष्टी करूं शकतात.

### समाजवादाच्या प्रसाराचें श्रेय आचार्यांनाच

व्यक्ति आणि समाज या दोहोंना सत्यत्व असल्यानें मार्क्सवादांतील समाजाच्या विकासाकडे पहाण्याचा ऐतिहासिक दृष्टिकोन आणि गांधीजींच्या शिकवणुकींतील व्यक्तिजीवनाचें महत्त्व या दोन्ही तत्त्वांचा समन्वय केला पाहिजे असें आचार्यांचें मत आहे. व्यक्तिजीवनांत सत्य-अहिंसेच्या रूपानें प्रकट होणाऱ्या नैतिक प्रेरणेंची जोड समाजवादी विचारसरणीला दिल्याशिवाय खरा लोकशाही समाजवाद प्रस्थापित होणार नाहीं असें त्यांचें प्रतिपादन असून यालाच ते सत्याग्रही समाजवाद असें म्हणतात. परकीयांचें राज्य घालविण्यासाठीं सशस्त्र बंड आवश्यक आणि समर्थनीय असलें तरी लोकांचा भरपूर पाठिंबा असलेल्या स्वराज्यांत नागरिक-स्वातंत्र्य आणि लोकशाहीचे हक्क उपलब्ध असतांना शांततेच्या आणि सत्याग्रही मार्गांनींच समाजवादाची प्रस्थापना केली पाहिजे, अशी आचार्यांची शिकवण आहे. समाजवादी तत्त्वज्ञानाचा आत्मीयतेनें अभ्यास करून गांधीवादाचें भाष्य करणारे आचार्य जावडेकर हे महाराष्ट्राचें एक थोर भूषण आहे.

१९२८ सालीं आचार्य जावडेकरांना मी प्रथम पाहिलें. युवकसंघाच्या अभ्यासवर्गांत त्यांनीं समाजवादावर व्याख्यानें दिलीं. आचार्य जावडेकर हे जरी गांधीवादाचे भाष्यकार असले तरी महाराष्ट्रीय तरुणांत शास्त्रीय समाजवादाचें बीजारोपण करण्याच्या कामीं त्यांनीं पुष्कळ परिश्रम घेतलेले आहेत. वर्धित मूल्याचा सिद्धांत ( surplus value ) आम्ही प्रथम त्यांच्यापाशींच शिकलों. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचें पर्व चालूं असतांना ज्यांनीं सार्वजनिक जीवनांत उडी घेतली आणि वर्षानुवर्षे कारागृहांत घालविलीं, त्यांना आचार्यांच्या **आधुनिक भारत, आधुनिक राज्यमीमांसा, लोकशाही, गांधीवाद, शास्त्रीय समाजवाद** इत्यादि ग्रंथांची जितकी मदत झाली असेल तितकी दुसऱ्या कोणाहि मराठी लेखकाच्या ग्रंथांनीं झालेली नाहीं. ज्यांना इंग्रजी येत नाहीं अशा आमच्या कार्यकर्त्यांना काय वाचावयास द्यावयाचें असा नेहमींच प्रश्न पडतो. आचार्यांच्या ग्रंथांनीं हा प्रश्न सोडवि-










अनुक्रमणिका

ण्यास जें साहाय्य झालें आहे त्याची किंमत करतां येणार नाहीं. या ग्रंथांच्या परिशीलनानें सर्वसामान्य कार्यकर्त्यांच्या विचारांना एक शास्त्रीय वळण लागलें असून त्यांना निश्चित समाजवादी दृष्टिकोन प्राप्त झाला आहे. सामाजिक प्रश्नांचा शास्त्रीय दृष्टीनें विचार करणारे कार्यकर्ते इतर कोणत्याहि प्रांतांपेक्षां महाराष्ट्रांत अधिक आहेत याचें बरेचसें श्रेय आचार्यांना देणें भाग आहे.

## आचार्यांची सत्यनिष्ठा आणि न्यायनिष्ठुरता

१९४२ च्या लढ्यांत महाराष्ट्रानें धडाडीनें भाग घेतला, इतकेंच काय परंतु महाराष्ट्रांतील कांहीं व्यक्ती त्या लढ्याचें नेतृत्व करीत आहेत हें पाहून आचार्यांना फार आनंद झाला. लोकमान्यांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांत जो एक प्रकारचा कुढेपणा आला तो आतां नष्ट होईल अशी आशा त्यांना वाटूं लागली. भूमिगत लोकांचे सर्वच कार्यक्रम त्यांना मान्य होते असें नाहीं. परंतु तेवढ्यासाठीं त्यांनीं भूमिगत क्रांतिकारी चळवळीचा धिक्कार अथवा निर्भर्त्सना केली नाहीं. उलट तुरुंगांत राहूनहि आपले विचार बाहेरच्या लोकांच्या कानावर घालून त्यांच्या चुका दुरुस्त करण्याचा यथाशक्ति प्रयत्न त्यांनीं केल्याचें मला माहीत आहे. बाहेरच्या लोकांना त्यांच्या चुकांबद्दल नांवें ठेवून स्वस्थ बसणें त्यांना शक्यच नव्हतें. सत्याग्रही समाजवादाच्या आपल्या अभिनव कल्पनेला मूर्त स्वरूप देण्यासाठीं अहर्निश प्रयत्न करणें हा त्यांचा धर्म होऊन बसला आहे. त्या ध्येयाच्या पूर्तीसाठीं इतरांच्या ठिकाणीं जे उपयुक्त गुण त्यांना दिसतात ते कारणीं लावण्याची त्यांची मनीषा असते. समाजवादी पक्षाच्या नाशिक अधिवेशनांत साथी जयप्रकाश नारायण यांनीं आपल्या लोकशाही समाजवादाच्या सिद्धीसाठीं साधनशुचितेची आवश्यकता आहे असें प्रतिपादिलें तेव्हां आपल्या ध्येयाबद्दलचा आचार्यांचा उत्साह द्विगुणित झाला. समाजवादी पक्षानें शांततामय सत्याग्रही तंत्राचा अवलंब करावा अशी त्यांची उत्कट इच्छा आहे. तसें होईल तरच महात्मा गांधींनीं दिलेला वारसा पुढें चालवितां येईल असें त्यांचें ठाम मत आहे. त्यामुळें साथी जयप्रकाश यांचीं पावलें त्या दिशेनें पडत आहेत असें पाहिल्यावर आचार्यांना आनंद कां होणार नाहीं ? आणि खरोखरच तेव्हांपासून समाजवादी पक्षांत सत्याग्रही वृत्ति बळावत आहे. निरनिराळ्या क्षेत्रांत काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांना अनुभवानें साधनशुचितेचें महत्त्व प्रत्ययास येत आहे. या सत्याग्रही वृत्तीच्या समाजवादी मंडळींनीं निदान महाराष्ट्रांत तरी आचार्य जावडेकरांना गुरुस्थानीं मानलें पाहिजे असें मला वाटतें. एकादा सत्याग्रही उपक्रम करावयाचा म्हटला आणि आचार्यांचा त्याला आशीर्वाद मिळाला म्हणजे मला तरी त्या उपक्रमाच्या न्याय्यतेबद्दल शंका राहात नाहीं. अशा बाबतींत आचार्यांचा अंतिम निर्णय सर्वांनीं मान्य करावा असें मला वाटतें. कारण त्यांचा निर्णय पक्षाभिनिवेशानें कलुषित झालेला असणार नाहीं. ते समाजवादी पक्षाचे सभासद नाहींत; खऱ्या अर्थानें गांधीवादी विचारसरणीचे ते आहेत. कमालीची न्यायनिष्ठुरता आणि सत्यनिष्ठा त्यांचे ठिकाणीं आहे. सर्व समाजवाद्यांनीं आणि काँग्रेसजनांनीं अशा अधिकारी व्यक्तीचें न्यायासन मान्य केलें तर किती तरी भांडणें टळतील आणि प्रत्यहीं वाढत जाणारी परस्परांतील कटुता कमी होऊन आपल्या प्रगतीचा वेग वाढेल.

या वर्षी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली आहे. साहित्य क्षेत्रांत वावरणाऱ्या लोकांना आतां त्यांचा निकट परिचय होईल. आपल्या व्यक्तिमत्त्वाची छाप ते साहित्यिक क्षेत्रांतहि पाडतील आणि ' पुरोगामी साहित्य ' या पुस्तकांत प्रतिपादिलेल्या साहित्याविषयींच्या आपल्या कल्पनांना बहुसंख्य साहित्यिकांची मान्यता मिळवतील अशी खात्री वाटते. त्यांच्या विचारांचें आणि ग्रंथांचें महत्त्व जाणणाऱ्या लोकांच्या संख्येंत भर पडून ध्येयपूर्तीसाठीं ते जे अविश्रान्त परिश्रम करीत आहेत त्याचें पूर्वीपेक्षां अधिक चीज होईल या कल्पनेनें मनाला आनंद वाटतो. आचार्य जावडेकर पुष्कळच लिहितात. दरवर्षी एकादा लहानसा ग्रंथ ते वाचकांना देतातच. परंतु त्या व्यतिरिक्त वृत्तपत्रीय लिखाणहि ते पुष्कळ करतात. दर आठवड्याला या ना त्या








साताहिकांत त्यांचे उद्बोधक विचार आपणांस वाचावयास मिळतात. त्यांच्या वृत्तपत्रीय लिखाणांत सामान्यतः वृत्तपत्रांतून दिसून येणारा उथळपणा आढळणार नाहीं. कित्येक वर्षेपर्यंत 'लोकशक्ती'चे संपादक म्हणून प्रत्यहीं निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रश्नावर शास्त्रीय दृष्टीनें त्यांनीं अग्रलेख लिहिले आहेत. त्यांतील निवडक लेखांचें संकलन करुन ग्रंथरूपानें प्रसिद्ध केल्यास एक चांगली निबंधमाला तयार होईल.

## " शासन करण्याचा अधिकार तुम्हांला नाहीं "

दम्याच्या विकारामुळें हवेच्या दृष्टीनें सोयिस्कर अशा इस्लामपूर या गांवीं त्यांचे कायमचें वास्तव्य असतें. इस्लामपूर म्हणजे वाळवे तालुक्याचें मुख्य ठिकाण. सातारा जिल्ह्यांतील हा वाळवें तालुका सुप्रसिद्ध आहे. तेथें हाणामाऱ्या, खून वगैरे गोष्टी म्हणजे नेहमींच्या घटना आहेत. अशा या गांवीं सत्य-अहिंसाव्रतधारी आचार्यांचें वास्तव्य ही एक अर्थपूर्ण घटनाच समजली पाहिजे. वाळवें तालुक्यांतील लोकांना जो सत्य-अहिंसेची दीक्षा देऊं शकेल तो महाराष्ट्राचा गुरु होण्यास लायक समजला पाहिजे. महात्मा गांधींच्या खुनानंतर जें प्रक्षुब्ध वातावरण निर्माण झालें त्याची झळ इस्लामपूरपर्यंत पोंचणार नाहीं हें कसें शक्य होईल ? त्यावेळीं घडलेल्या एका प्रसंगीं आचार्यांनीं जें वर्तन केलें त्यावरुन त्यांच्या निःस्पृह, निर्भय, आणि बाणेदार स्वभावाची साक्ष पटते.

प्रक्षुब्ध जमावापुढें आपली धडगत नाहीं असें पहातांच एका हिंदुमहासभावाद्यानें आचार्यांच्या घरीं आश्रय घेतला. प्रक्षुब्ध लोक त्यांच्याकडे आले आणि 'सदर गृहस्थाला आपल्या घराबाहेर घालवा' असें त्यांनीं फर्माविलें. परंतु आचार्यांनीं त्यांना भीक घातली नाहीं. त्या गृहस्थाला जमावाच्या स्वाधीन करणें म्हणजे मृत्यूच्या दाढेंत लोटण्यासारखेंच होतें. त्यांनीं आपल्या निर्भय निःपक्षपाती वृत्तीनें निर्णय दिला. ते म्हणाले कीं, " हे गृहस्थ दोषी आहेत असें धरुन चाललें तरी त्यांना शासन करण्याचा तुम्हाला अधिकार नाहीं. तुम्ही कायदा आपल्या हातीं घेऊन त्यांना मारहाण करणें अयोग्य आणि बेकायदेशीर आहे. प्रत्येक नागरिकाच्या वित्तजीविताच्या रक्षणाची जबाबदारी सरकारची आहे. पोलिस खात्याचें मुख्यतः हें काम आहे. पोलीस नसतील त्यावेळीं प्रत्येक नागरिकानें आपल्या परीनें ही जबाबदारी पार पाडली पाहिजे. या गृहस्थांना पोलीसच्या हवालीं केल्यावर मगच या प्रकरणांतील माझी जबाबदारी संपते. " आचार्यांच्या या उत्तरानें लोक नाराज झाले. परंतु त्यांच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वापुढें लोकांचा राग निष्प्रभ ठरला. आचार्यांनीं त्या गृहस्थाला फौजदाराच्या स्वाधीन केलें आणि त्यांचे प्राण वांचविले.

## अपरिग्रही, समाधानी, समृद्ध जीवन

इतकें वाचन–लेखन करणारा हा व्यासंगी पुरुष राहतो तरी कसा हें पहावें म्हणून एकादा जिज्ञासु मनुष्य त्यांच्या घरीं गेला तर त्याला काय दिसेल ? आचार्यांची आर्थिक परिस्थिति बेताबाताचीच आहे. मराठी लिखाणावर होणारी अत्यल्प प्राप्ति आणि एका ट्रस्टमधून मिळणारे पन्नास पाऊणशें रुपये एवढ्यावर ते आपला प्रपंच भागवितात. अधिक पैशाचा हव्यासहि त्यांना नाहीं. ते अपरिग्रही आहेत. सुदैवानें त्यांना सुविद्य सहधर्मचारिणी लाभली आहे. सौ. सुशीलाबाई आपल्या पतीची सेवाशुश्रूषा अतिशय प्रेमळपणानें करतात; घराची देखभाल करतात; आणि आचार्यांच्याकडे येणाऱ्या सर्व पाहुण्यांचें आदरातिथ्य सांभाळतात. म्हणूनच आचार्यांच्या लेखनाचा लाभ महाराष्ट्राला मिळत राहिला आहे. श्री. प्रेमाबाई कंटक यांनीं त्यांच्या आयुष्यांत भेटलेल्या आदर्श स्त्रियांमध्यें सौ. सुशीलाबाईंचा अंतर्भाव केला आहे, एवढी एकच गोष्ट त्यांच्या योग्यतेची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे.

खेड्यांतल्या त्या घरांतील आचार्यांची अभ्यासाची खोली कोणाही अभ्यासू मनुष्याला आकर्षक वाटेल. त्यांच्या विषयाला लागणारे कितीतरी नवे–जुने आणि दुर्मिळ ग्रंथ त्यांच्या कपाटांत आहेत. शहरी जीवनांतील भगभग आणि धडपड टाळून ज्याला शांत चित्तानें अध्ययन आणि मनन करावयाचें आहे, त्याला आचार्यांची ही खोली अगदीं आदर्श वाटेल. परंतु या खोलींत वर्षानुवर्षें अध्ययन आणि तत्त्वचिंतन करुन लेखनाचा व्यासंग करणाऱ्या आचार्यांची मूर्ति पाहिल्यास नवीन मनुष्याला आश्चर्य वाटल्या,










वांचून राहणार नाहीं. दम्याच्या व्याधीनें त्यांची प्रकृति तोळामासा करून ठेवली आहे. परंतु असें असूनही त्यांनीं आपल्या जीवनसाधनेंत खंड पडूं दिलेला नाहीं. जरा कुठें प्रकृति बिघडली म्हणजे आम्ही चालढकल करतों; अंगावर घेतलेल्या जबाबदाऱ्या टाळण्यास मागें पुढें पहात नाहीं. या दृष्टीनें आचार्यांच्या जीवनाकडे पाहिल्यास कोणाहि तरुण मनुष्यास स्वतःची लाज वाटल्यावांचून राहणार नाहीं. दमा हा त्यांचा कायमचा मित्र बनला आहे. त्याला त्यांचें देणें देऊन उरलेल्या सर्व शक्तीचें ते नियोजन करतात आणि एखाद्या यंत्राप्रमाणें आपले कार्यक्रम पार पाडतात. ज्वलंत ध्येयवाद आणि सत्याग्रही निष्ठेच्या आंतरिक प्रेरणेनुसार त्यांच्या जीवनाचें नियमन होत असावेसें वाटतें. नाहीं तर आचार्यांना आपलें जीवन इतकें समृद्ध आणि समाधानी बनवितां आलें नसतें. ते एका खेड्यांत रहातात, लक्षावधि लोकांच्या सभेंत भाषणें करावयास जात नाहींत, अगर एखादें सत्तेचें स्थानहि त्यांनीं मंडित केलेलें नाहीं. तरीहि त्यांच्या जीवनांत असंतुष्ट आकांक्षांच्या थैमानामुळें निर्माण होणारा प्रक्षोभ नाहीं. कारण त्यांच्या आयुष्यांत भोगापेक्षां त्यागाला अधिक महत्त्व आहे, प्रसिद्धीपेक्षां तत्त्वनिष्ठेला प्राधान्य आहे आणि सत्तेपेक्षां सत्याला मान आहे. शरीरानें निरामय असूनहि कीर्तीची हांव, सत्तेचा हव्यास आणि इतरांच्याबद्दल वाटणाऱ्या हेव्यामुळें चिडचिडे झालेले लोक प्रत्यहीं पाहवयास मिळतात. परंतु आचार्यांचें जीवन प्रशांत–गंभीर आणि आनंदी आहे. त्यांनीं आपल्या जीवनांत एक प्रकारचें समतुलन आणि पूर्णत्व निर्माण केलें आहे. त्याचें सान्निध्य विशुद्धिप्रेरक असल्याचें आढळून येतें. जो लक्षावधि लोकांच्या गळ्यांतला ताईत बनला आहे, त्यांचें भवितव्य घडविण्याचें अगर बिघडविण्याचें सामर्थ्य ज्याच्या हातीं आहे परंतु ज्याला आपल्या निकटवर्ती लोकांच्या इच्छा–आकांक्षाशीं आणि भावनांशीं संवादित्व साधतां आलेलें नाहीं अशा एखाद्या पंतप्रधानापेक्षां आचार्यांचें तें खेड्यांतील जीवन मला अधिक विलोभनीय वाटतें. त्यांनीं आमच्यापुढें ठेवलेला जीवनादर्श आम्ही आत्मसात् केला तर आजच्या क्लेशपूर्ण जीवनांतहि आम्हाला भरपूर आनंद मिळूं शकेल.

---

## मार्क्सवादांतील वैशिष्ट्य व उणीव

जड धातूंपासून बनविलेलें घड्याळ, प्राण्याचें शरीर आणि मानवी मन व मेंदु यांच्या व्यापारांत प्रकार–भेद आहे, हें मानल्यावांचून नीतिशास्त्राला आधारच मिळत नाहीं. हा प्रकारभेद लक्षांत घेऊन सांख्यांनीं प्रकृतीपासून सर्व सृष्टीचा विकास झाला हें तत्त्व मान्य करूनहि आत्मा किंवा पुरुष हें दुसरें तत्त्व गृहीत धरलें. हा प्रकारभेद न मानणारा यांत्रिक भौतिकवाद मार्क्सनें सोडून देऊन आपला विरोध-विकासी भौतिकवाद मांडला. यामुळें भौतिक शक्तींतूनच मानसिक किंवा आत्मिक शक्ति विकास पावते असें मान्य करूनहि मानवी मनोव्यापार आणि बुद्धिव्यापार यांची चर्चा करतांना त्याला नियतिवादाचा आश्रय करण्याचें कारण नाहीं. तत्त्वज्ञानांतील हा एक निराळाच वाद असून हेगेलचा जडाद्वैतवाद आणि शंकराचार्यांचा चिदद्वैतवाद यांहून हा भिन्न आहे. स्पेन्सरच्या अज्ञेयवादाहूनहि तो भिन्न आहे. स्पिनोझाच्या तत्त्वज्ञानांत त्याचा उगम असला, तरी स्वयंविकासाचें व विरोध-विकासाचें तत्त्व त्यांत अंतर्भूत झालें असल्यानें तो त्याच्या चिदचिद्विशिष्ट अद्वैत–सिद्धांताहूनहि भिन्न आहे. अशा या महत्त्वाच्या तात्त्विक सिद्धांताचें निःपक्षपाती विवेचन धंदेवाईक तत्त्वज्ञान्यांनीं अद्यापि केलेलें नाहीं. या सिद्धांतांत माझ्या मतें एकच उणीव आहे व ती म्हणजे–आत्मानुभव किंवा धर्मानुभव ( Religious Experience ) असें ज्याला म्हणतात त्या अनुभवाच्या पुराव्यापासून निघणारीं अनुमानें त्यानें आत्मसात् केलेलीं नाहींत. तशीं तीं केल्यावांचून त्याची धर्ममीमांसा पुरी व यथार्थ होणार नाहीं.

**—आचार्य जावडेकर**, ' लो. टिळक व महात्मा गांधी, ' पान ११७, ११९








श्री. र. के. खाडिलकर

# गांधीवादाचा प्रभावी भाष्यकार

## पांढरपेशा बुद्धीला आव्हान करण्याचें काय

महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनांत आचार्य शं. द. जावडेकर यांचें किती मोठें व स्वातंत्र स्थान आहे याची जाणीव मराठी साहित्यिकांना जेवढी असावयास हवी तेवढी नाहीं. याचें कारण ज्या विचाराचा प्रान्तांतील बुद्धिवादी समजल्या जाणाऱ्या वर्गाकडून सर्वत्र धिक्कार केला जात होता त्याचाच पुरस्कार अव्याहतपणें आचार्यांनीं केला. टिळकयुगांत ज्यांच्याकडे समाजाचें धुरीणत्व आलेलें होतें त्यांना गांधींनीं देशापुढें ठेवलेला नवा विचार व आचार केव्हांच रुचला नाहीं. गांधीमार्गाची तात्त्विक चर्चा इतर कोणत्याहि भाषेंत झाली नसेल, इतकी या कालखंडांत मराठींत झाली; पण त्या सर्व चर्चेचा रोख गांधींचा मार्ग किती टाकाऊ व अव्यवहार्य आहे हें दाखविण्याकडे होता. हिंदी राजकारणांतील वतनदारी गांधींनीं बळकावली याचा मोठा राग टिळकपरंपरावाद्यांना आला आणि त्यामुळें गांधींना विरोध हेंच टिळकपरंपरेचें ब्रीद ठरल्यासारखें झालें ! वीस सालानंतर झालेल्या स्थित्यंतराचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करण्याची पात्रता टिळकभक्तांत नसल्यानें गांधींचें राजकारण मध्यमवर्गीय पांढरपेशा वर्गापलीकडे खालच्या वर्गांत पसरत आहे, याची दखल घेण्याचें भान त्यांना उरलें नाहीं. बुद्धिजीवी वर्गावर त्यांनीं जवळ जवळ एक तप आपली पकड कायम ठेवली; तरी राजकारण मात्र त्यांचे हातून निसटलें. गांधींची येथें आम्ही डाळ शिजूं दिली नाहीं हीच एक अभिमानाची बाब होऊन बसली. प्रांतांतील बुद्धिवादी पांढरपेशा वर्गाची गांधींच्या राजकारणासंबंधीची ही समज चुकीची आहे; ज्या अहंकारांतून या विरोधाचा जन्म झाला तोच अहंकार प्रांताची वैचारिक वाढ खुंटविण्यास कारणीभूत होईल; गांधींनीं मांडलेला विचार टिळकपरंपरेला धरून आहे, इतकेंच नव्हें तर टिळकांच्या राजकीय प्रवृत्तीचा स्वाभाविक विकास गांधीमार्गांत झालेला आहे; समाजाच्या व्यापक हिताला हा नवा विचार अधिक पोषक आहे; आणि जें राष्ट्रीयत्व टिळकांनीं पुरस्कारिलें तें सिद्ध करण्यासाठीं गांधींचा मार्ग हें एक प्रभावी साधन आहे; असा परोपरीनें युक्तिवाद करून मराठींत गांधी-विचारांची मांडणी करण्याचें दुर्धर कार्य अत्यंत कणखरपणानें कोणी केलें असेल तर तें आचार्य जावडेकरांनीं. म. गांधींना मोठा अनुयायी वर्ग महाराष्ट्रांत मिळाला त्यांत बहुसंख्य अशिक्षित समाजांतील होता. गांधींच्या विभूतिमत्त्वाची छाप बहुजनसमाजावर तेव्हांच पडली व तो तात्काळ तिकडे आकर्षिला गेला. पुढारलेल्या वर्गांतील कांहीं कार्यकर्त्यांनीं गांधीमार्गाचा जीवननिष्ठा म्हणून स्वीकार केला. त्यांच्यामध्यें दोन प्रवृत्ती प्रथमपासून दिसत होत्या. कांहींचा विधायक कार्यावरच सर्व भर होता. श्री. अप्पासाहेब पटवर्धनप्रभृती कार्यकर्ते त्या प्रवृत्तीचे प्रतिनिधी होते. श्री. शंकरराव देव यांचा विधायक कार्याला सुद्धां राजकीय बैठक पाहिजे असा कटाक्ष असल्याकारणानें दुसऱ्या प्रवृत्तीचें पुढारीपण त्यांच्याकडे होतें. पण विधायक कार्याच्या प्रात्यक्षिकामुळें किंवा राजकीय संघटनेमुळें महाराष्ट्राच्या बुद्धीला गांधींच्या शिकवणुकीचें जें दर्शन घडलें नसतें तें त्यांच्या मार्गासंबंधीं तात्त्विक व ऐतिहासिक मीमांसा करून आ० जावडेकरांनीं करविलें, हें म्हणणें वस्तुस्थितीला धरून होईल. विधायक कार्यापेक्षां कांहीं दृष्टींनीं अधिक महत्त्वाचें आणि तितकेंच अवघड असें








महाराष्ट्रांतील पांढरपेशा वर्गाच्या बुद्धीला आवाहन करण्याचें कार्य अविरतपणें आ० जावडेकरांनीं केलें. आ० जावडेकरांची प्रकृति वरील गोष्टीला अधिक अनुकूल होती. तसेंच त्याकरतां लागणारी बौद्धिक तयारी अत्यंत परिश्रमपूर्वक व चिकाटीनें त्यांनीं संपादन केली होती. गांधीयुगांतील त्यांच्या या कामगिरीमुळें गांधीवादाचा प्रभावी भाष्यकार म्हणून इतिहासानें त्यांचा गौरव करणें केव्हांहि यथोचित होईल असें मला वाटतें.

## साहित्यिकाच्या हव्यासापासून दूर

आचार्य जावडेकरांच्या लिखाणाला साहित्याची प्रतिष्ठा लवकर लाभली नाहीं याचें उपरिनिर्दिष्ट विरोधाशिवाय आणखीहि एक कारण आहे त्याचा ओझरता उल्लेख जातां जातां करणें अप्रस्तुत होणार नाहीं. लालित्य किंवा सौंदर्य हाच साहित्याचा आत्मा होय अशी दृढ समजूत मराठी वाङ्मयचिकित्साकारांनीं अलिकडे करुन घेतल्याचें प्रत्ययाला येतें. ' काय लिहिलें ' यापेक्षां ' कसें लिहिलें ' याची मीमांसा वरील पंथांतील वाङ्मयटीकाकार मुख्यतः करतात आणि सौंदर्यदर्शन किंवा कलात्मकता यावर लिखाणाचें वाङ्मयमूल्य ठरविलें जातें. हेतुप्रधान वाङ्मयावर प्रचारकी वाङ्मय म्हणून शिक्का मारण्यांत येतो. लेखनाचें वाङ्मयमूल्य कोणत्या गुणांवरुन ठरविण्यांत यावें याची मूलगामी चर्चा करण्याचा येथें मानस नाहीं व तसा माझा अधिकारहि नाहीं. पण महाराष्ट्रांतील बुद्धिवादी परंपरेला वरील प्रवृत्ति मारक ठरत आहे; इतकेंच नव्हे तर त्यायोगें प्रांताचें वैचारिक जीवन कुंठित झालें आहे अशी माझी समजूत आहे. कारण कोठेंहि नवा विचार दिसला तर त्याची बुद्धिवादाच्या कसोटीवर तपासणी करण्याऐवजीं आजचे सौंदर्यवादी साहित्यिक त्यापासून दूर दूर पलायन करतात. महाराष्ट्रांत वैचारिक अराजक माजल्याबद्दल पुण्यांत शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरुन भाषण करतांना श्री. माडखोलकरांनीं उद्वेग प्रकट केला. पण ही परिस्थिति कां निर्माण झाली याची सखोल मीमांसा करण्याचें मात्र टाळलें. स्वतःजवळ नवीन सांगण्याजोगें कांहीं नाहीं, दुसऱ्या कोणी सांगितलेला विचार मोकळ्या मनानें समजून घेण्याची बुद्धि नाहीं, अशा अहंमन्य वाङ्‌मयसम्राटांनीं महाराष्ट्रांत वैचारिक अराजक माजविलें आहे. स्वतंत्र अंतःप्रेरणा किंवा ध्येयवाद नसल्याकारणानें लेखणीला मनोरंजक व आकर्षक करण्याची प्रवृत्ति वाढावी हें स्वाभाविक होय. साहित्यिक म्हणून प्रतिष्ठा मिळविण्याच्या हव्यासानें आ० जावडेकरांनीं आपली विचारनिष्ठ बैठक केव्हांच सोडली नाहीं. एखादी लघुकथा, एखादी कविता, छोटीशी कादंबरी किंवा नाटक हे वाङ्‌मयप्रकार हाताळून साहित्यिक बनण्याचा विचारहि त्यांच्या मनाला शिवला नसेल. तशी त्याची प्रवृत्ति नाहीं. त्यामुळेंच साहित्यक्षेत्रांत प्रतिष्ठा लाभण्याच्या बाबतींत ते पूर्णपणें उदासीन राहिले.

## तरुण राजकीय कार्यकर्त्यांचें मार्गदर्शन

आ० जावडेकरांची व माझी प्रथम भेट झाली ती १९३२ च्या तुरुंगवासांत. कर्नाटक, गुजराथ, व महाराष्ट्र अशा तिन्ही प्रांतांतील ठळक ठळक कार्यकर्ते या बंदीखान्यांत एकत्र आले होते. त्यांमध्यें गांधीजींच्या शिकवणुकीचा अभ्यासपूर्ण विचार केलेले फारच थोडे. किंबहुना गांधीविचार हा ज्ञानविरोधी संप्रदाय आहे असाच कोणाचाहि समज व्हावा अशी प्रवृत्ति दृष्टोत्पत्तीस येई. आणि त्याला ठळक अपवाद म्हणून आ. जावडेकर यांच्याकडे तरुण कार्यकर्त्यांचीं मनें आकर्षिलीं गेलीं. नुकतेंच राजकारणांत पदार्पण केलेल्या या युवकांत उत्साह व जहालपणा भरपूर होता. परंतु त्यांच्या बुद्धीला विचारांची निश्चित दिशा लागलेली नव्हती. त्यांच्या ठिकाणीं गांधीमार्गाच्या अपुरेपणाबद्दल अस्पष्ट अशी जाणीव दिसत होती. अशा मनःस्थितींत असतां आ. जावडेकरांचा सहवास त्यांना लाभल्यामुळें नव्या राजकारणाच्या अभ्यासाची गोडी त्यांच्या ठिकाणीं निर्माण झाली. आ० जावडेकरांच्या व्यासंगाचें क्षेत्र केवळ गांधीविचारापुरतें मर्यादित नव्हतें. उपनिषदांपासून तों मार्क्सवादापर्यंत, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, आणि समाजशास्त्र इत्यादि शास्त्रांचें त्यांचें अध्ययन आणि चिंतन चालूं होतें. पेशवाई अखेरपासूनच्या इंग्रजी अंमलाखालील महाराष्ट्रांतील घडामोडी आचार्यांनीं बारकाईनें तपासल्या होत्या










## गांधीवादाचा प्रभावी भाष्यकार

या त्यांच्या पूर्वतयारीमुळें आणि निरहंकारी व मनमोकळ्या स्वभावामुळें तेथील तरुण कार्यकर्त्यांच्या मार्गदर्शनाचा अधिकार सहजच त्यांच्याकडे आला. या बंदिवासांतील सहजीवनांत त्यांच्या तरुण मनावर आचार्यांनीं जे संस्कार केले ते राजकीय प्रौढावस्थेंत हे तरुण कार्यकर्ते भिन्न भिन्न दिशांना गेले तरीसुद्धां पुसले गेले नाहींत. गुरुजन म्हणून आचार्यांना मान देण्यांत अजूनहि त्यांना अभिमान वाटतो. या गोष्टीवरुन महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या एका पिढीवर जावडेकरांची केवढी छाप आहे, हें सहज कळून येईल. या बंदि–जीवनांतूनच काँग्रेस समाज–वादी पक्षाचा जन्म झाला. त्या पक्षाचें महाराष्ट्रांत राजकारण सुरु झाल्यानंतरहि पहिलीं पांचसात वर्षें काँग्रेस पक्षाचे पुढारी श्री. शंकरराव देव यांच्याशीं समाजवादी कार्यकर्त्यांचे जे सलोख्याचे संबंध राहिले त्याचें बरेचसें श्रेय आ० जावडेकरांना आहे. वरील विवरणावरून महाराष्ट्राच्या राजकारणांतील केंद्र-बिंदूपाशीं आचार्यांना स्वतंत्र स्थान होतें याचा बोध होईल.

### गांधीवाद ही एक जीवनसाधना

विश्वविद्यालयांतील एम्. ए. ही उच्च पदवी घेण्यापूर्वींच आचार्य जावडेकरांच्या मनावर गांधीविचारांची मोहिनी पडली. राजकीय क्षितिजावर आलेल्या महात्म्याच्या तेजानें जावडेकरांना नवचैतन्य मिळाल्याचा आनंद झाला. तरी त्यांची बुद्धि किलकिल्या डोळ्यांनीं या घटनेचा अर्थबोध करुन घेण्यासाठीं धडपडत असावी. गांधीमार्गाकडे नव्या युगांतील आचार धर्म म्हणून केवळ पाहून चालणार नाहीं तर देशाची राष्ट्रीय परंपरा आणि राजकीय व सामाजिक सिद्धांत यावर त्याची तपासणी झाली पाहिजे अशा निर्णयाला आचार्य प्रथमपासून आलेले दिसतात. गांधींवर त्यांची अढळ श्रद्धा जडली. पण ती श्रद्धा अधिक बळकट करण्याकरतां ऐतिहासिक, सामाजिक, राजकीय व नैतिक या सर्व दृष्टींनीं गांधीविचाराची तपासणी करण्याची बौद्धिक तयारी असणें अगत्याचें आहे याची जाणीव आ० जावडेकरांना तीव्रतेनें झाली असावी. तसेंच गांधींचे मनोव्यापार समजून घेऊन त्यांच्या उक्तीची व कृतीची संगति लावण्यासाठीं केवळ पुस्तकी ज्ञान व तर्कबुद्धि हीं अपुरीं पडतात, गांधीवाद हें एक निर्जीव पुस्तकी तत्त्वज्ञान नसून आचार–प्रधान असा तो एक जीवनसाधनेचा मार्ग आहे; तेव्हां गांधीविचाराचें संपूर्ण दर्शन किंवा साक्षात्कार करुन घेण्यासाठीं त्यांच्या विचाराशीं तादात्म्य पावलेल्या बुद्धीला आचारधर्माची शिस्त लावण्याचे प्रयोग खासगी जीवनांत आ० जावडेकरांनीं केले. गांधींच्या मनोव्यापारांत केवळ तर्क बुद्धीनें आकलन न करतां येण्यासारखा असा कांहीं भाग आहे तो साक्षात्कारक्षम ( intuitive ) अशा बुद्धीनें समजून घेतला पाहिजे; आणि तसा प्रयत्न आचार्यांनीं गांधीवादाची मीमांसा करतांना केल्याचें आपल्या प्रत्ययाला येतें. या त्यांच्या तपश्चर्येनेंच गांधीवादाचे प्रवक्ते म्हणून आचार्यांना मान दिला जातो.

### समन्वयसिद्धान्तामागील भूमिका

गांधीवाद्यांत आ० जावडेकरांसारखी मार्क्सवादाचा पद्धतशीर अभ्यास केलेली दुसरी व्यक्ति माझ्यातरी आढळांत नाहीं. मार्क्सच्या तत्त्वज्ञानाची तोंडओळख मराठी वाचकांना त्यांनीं करुन दिली. इतकेंच नव्हे तर कांहीं तरुणांना समाजवादाचा ओनामा त्यांनीं शिकविला. गांधींच्या राजकारणाचा व इतर शिकवणुकीचा अर्थ किंवा संगति लावतांना मार्क्सवादाचा हा अभ्यास त्यांना उपकारक ठरलेला आहे. तरीसुद्धां आचार्यांनीं मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञानाचा स्वीकार केला असें म्हणतां येत नाहीं. समाजाच्या परिवर्तनासंबंधीं मार्क्सनें जगांपुढें मांडलेला शास्त्रीय सिद्धांत अमान्य करणारे तत्त्वचिंतकहि मार्क्सवादाचें ऋण कांहीं प्रमाणांत मान्य करतात. कारण त्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासामुळें इतिहासक्रमाचा अर्थबोध करुन देणारी दृष्टि त्यांना लाभली हें नाकबूल करतां येत नाहीं. सुरुवातीला तात्कालिक राजकीय परिणामकारकतेच्या निकषावरुन गांधीवादाकडे जावडेकर पहात असावेत. पण पुढें समाजक्रांतीचा मार्ग म्हणून गांधीवादासंबंधीं त्यांच्या बुद्धीला निर्णय ठरविणें अपरिहार्य झालें. आणि नव्या दृष्टीनें चिंतन करतां करतां गांधीवादाच्या मर्यादा किंवा अपुरेपणा जावडेकरांना स्पष्टपणें दिसूं लागला. अखेर समाजवादाच्या दिशेनें गांधीवादाचा विकास होत

गेल्यास त्यांतील अपूर्णता दूर होईल या कल्पनेनें गांधी-वाद व समाजवाद यांच्या समन्वयसिद्धांतावर ते येऊन ठेपले. माझ्या मतें जावडेकरांनीं प्रतिपादन केलेल्या समन्वयसिद्धांताची उपपत्ति वरीलप्रमाणें लावणें अन्यायाचें ठरणार नाहीं. आचार्यांनीं आपण गांधींवादीहि नाहीं आणि समाजवादीही नाहीं हें मार्गे स्पष्ट केलें आहे. त्यांतील मर्म वरील विवेचना-वरून समजून येण्यास अडचण पडूं नये.

मग आ० जावडेकर तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें कोठें उभे आहेत हा प्रश्न उरतोच. त्या प्रश्नाचें उत्तर शोधण्यासाठीं जगांतील विचारसृष्टीचें थोडें निरीक्षण करणें अप्रस्तुत होणार नाहीं. आज जग केवळ राजकीय दृष्टीनेंच नव्हे तर वैचारिक दृष्टीनें दुभंगलेलें आहे. एका बाजूला मार्क्सवादाचें तत्त्वज्ञान आणि दुसऱ्या बाजूला मार्क्सविरोधी अशी एक विचारपरंपरा, असे दोन तट डोळ्यापुढें उभे राहतात. मार्क्सविरोधी विचारांतहि दोन प्रवाह आहेत: एक उदारमतवादाचा आणि दुसरा उघड उघड फांशीवादाचा किंवा नाझीवादाचा. गेल्या महायुद्धांत हिट्लरचा पूर्ण पराभव झाला, म्हणजे नाझीवाद बरबाद झाला अशी समजूत करून घेणें शुद्ध आत्मवंचना होय. खऱ्या उदारमत-वाद्यांना समाजपरिवर्तनासंबंधीं ध्यास आहे. पण समाजक्रांतीची दिशा कोणती याबद्दल त्यांच्यामध्यें एकवाक्यता नाहीं. समाजक्रांतीनें जें ध्येय गांठावयाचें आहे तें हस्तगत करण्यासाठीं मनुष्या-मध्यें प्रथम क्रांति झाली पाहिजे असा मार्क्स-वादी नसलेल्या विचारवंतांचा आग्रह; तर सर्व कर्तृत्वशक्ति एकवटून समाजक्रांति केल्यास त्याच्या मागोमाग मानवामध्यें इष्ट तो बदल घडून येईल असा मार्क्सवाद्यांचा ठाम सिद्धांत. तसेंच कांहीं महात्म्यांनीं किंवा संतप्रकृतीच्या लोकांनीं समाजसुधारणेचा केवढाहि प्रयत्न केला तरी इतिहास-क्रम त्यांना बदलतां येणार नाहीं, ही गोष्ट मार्क्स-वादी आग्रहानें प्रतिपादतात. तेव्हां वर दिग्दर्शित केलेल्या द्वंद्वांतून माणसांचें परिवर्तन व समाजाचें परिवर्तन या दोन्ही प्रवृत्तींचा समन्वय कसा साधावा हा विचार आचार्यांच्या मनाला सारखा व्यग्र करीत आहे असें त्यांच्या लिखाणावरून अनुमान काढणें चूक ठरणार नाहीं. मानवामध्यें केवळ संतप्रवृत्तीचें बीजारोपण करून भागत नाहीं तर अशा साधुवृत्तीच्या लोकांनीं सुद्धां संघटित होऊन समाजाच्या दुःखांचें जें मूळ आहे त्यावर आघात केला पाहिजे. नवा युगधर्म जगापुढें ठेवणारांनीं तो व्यक्तीबरोबर समाजांतहि परिवर्तन घडवून आणील असें निरपवाद सिद्ध केल्यावांचून चालूं विचारद्वंद्वांत त्याचा टिकाव कसा लागेल? गांधी-वादाचें भवितव्य काय होणार यासंबंधीं विवरण करतांना आचार्यांनीं काढलेले पुढील उद्गार त्या-दृष्टीनें सूचक आहेत: "पण बहुतेक देशांतील सरकारें या भांडवलशाही आर्थिक घटनेस शक्य तों कोसळूं न देतां सुरक्षित व स्थिर करण्याचा प्रयत्न करीत आहेत. यामुळेंच जागतिक क्रांतीचें आणि महायुद्धाचें वातावरण शांत होऊं शकत नाहीं. गांधीवादानें अशा परिस्थितींत जर होऊं घातलेली सामाजिक क्रांति शांततेनें कशी घडवितां येईल, निदान त्यावेळीं होणारी हिंसा किमान प्रमाणांत कशी राहील, हें जगाला दाखवून दिलें, आणि त्यासाठीं लागणारी जनतेची शक्ति आपल्या देशांत संघटित व प्रभावी बनविली, तरच गांधी-वादाला या देशांत व जगांत उज्ज्वल भवितव्य आहे, असें म्हणतां येईल." आचार्यांचे वरील उद्गार गांधीवादाचें भवितव्य कोणत्या निकषावर ठरणार आहे हें दाखविण्यास पुरेसे आहेत.

## विचारानें क्रांतिनिष्ठ

वर्गविग्रहाची वास्तवता आणि क्रांतीची अपरि-हार्यता या गोष्टी आचार्यांना पटलेल्या आहेत. ही क्रांति शांततेच्या मार्गानें घडवून आणण्यांत गांधी-वाद्यांनीं पुढाकार घ्यावा हा आचार्यांचा आग्रह आहे. परंतु गांधीवाद्यांकडून या बाबतींत चुकार-पणा झाला किंवा 'अहिंसे'च्या नांवानें समाज-क्रांतीला विरोध होऊं लागला तर जावडेकर विचारानें क्रांतीच्या बाजूला उभे राहिलेले दिसतील, याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. १९४२ सालीं काँग्रेसच्या 'चले जाव'च्या संग्रामांत हिंसा-अहिंसेची जी रस्सीखेंच झाली त्यांत आचार्यांनीं घेतलेली भूमिका पाहतां वरील अनुमान चूक ठरणार नाहीं अशी मला खात्री वाटते.

# गांधीवादाचा प्रभावी भाष्यकार

## समन्वयानें प्रश्न सुटेल का ?

लोकशाही समाजवादाच्या मार्गानें हिंदी राजकारणाची नौका हाकारल्यास शांततामय समाजक्रांति येथें घडून येईल अशा विचाराच्या टप्प्यावर आचार्य जावडेकर अलिकडे पोंचलेले दिसतात. आज इंग्लडमध्यें जी लोकशाही आहे आणि जो समाजवाद मजूरपक्ष घटनात्मक रीतीनें तेथें प्रस्थापित करीत आहे तीच लोकशाही व तोच समाजवाद जावडेकरांना येथें अभिप्रेत असेल तर त्याचा अधिक विस्तारानें अवश्य विचार व्हावयला पाहिजे. त्याचा परामर्ष येथें घेणें शक्य नाहीं. तरीसुद्धां माझी शंका मात्र मांडतों. ब्रिटन आणि हिंदुस्थान या दोन देशांच्या आर्थिक परिस्थितींतील तफावत कोणाच्याहि सहज ध्यानांत येईल. आपल्या देशांत लोकशाहीची पूर्वपरंपरा अशी नाहीं, आणि येथील अर्थव्यवस्था मागासलेली. अशा स्थितींत केवळ घटनात्मक मार्गानें समाजवादाची प्रस्थापना करतां येईल, हा केवळ भ्रमच ठरणार नाहीं का ? आजच्या भांडवलशाही अर्थव्यवस्थेचें कवच फोडून समाजवादाची प्रस्थापना केल्यावांचून हिंदी जनतेची कुचंबणा थांबणार नाहीं, दैनंदिन जीवनांत स्वातंत्र्याचा आत्मप्रत्यय तिला येणें शक्य नाहीं आणि सांस्कृतिक विकासाचा पुढील मार्गहि खुला होणार नाहीं, या गोष्टीची आचार्यांइतकी तीव्र जाणीव इतर कोणाला नसेल. आजचें राज्ययंत्र हा येथील चालू अर्थव्यवस्थेचा भाग आहे. तें लोकशाहीच्या मार्गानें हस्तगत करून अर्थव्यवस्था बदलतां येईल या विश्वासाला इतिहासाचा आधार आहे का ? लोकशाही समाजवादाचा त्यांचा सिद्धांत व्यवहारतः परिणामकारक कसा ठरेल हें आचार्यांनीं पटवून देणें अगत्याचें होय ! गांधीवाद आणि समाजवाद यांचा समन्वय साधण्याच्या प्रयत्नाप्रमाणेंच लोकशाही समाजवाद हा वडाची साल पिंपळाला लावण्याच्या पद्धतीचा ठरेल या आक्षेपाचें निराकरण आचार्य कसें करणार ?

जगांतील उदारमतवादी विचार निष्क्रियतेच्या भोंवऱ्यांतून बाहेर पडण्याच्या स्थितींत नाहीं. आचार्यांचा मनःपिंड उदारमतवादी असला तरी निष्क्रियतावादी खास नाहीं. संप्रदायनिष्ठेच्या चौकटींत आचार्यांनीं आपल्या गांधीवादाला कधीं कोंडलें नाहीं. त्यांच्या विचाराची झेप मोठी आणि धार तीक्ष्ण आहे. रोमाँ रोलांप्रमाणें त्यांची तपश्चर्या त्यांना स्वस्थ बसूं देणार नाहीं. म्हणूनच समाजाच्या प्रगतीला रोखून धरणाऱ्या आजच्या भांडवलशाही अर्थव्यवस्थेविरुद्ध झगडणाऱ्या लोकशक्ती प्रभावी करण्याकडे आचार्यांचें विचारधन खर्ची पडेल असा माझा विश्वास आहे.

---

## 'आचार्य' जावडेकर

जीवनाच्या नवमंत्रशोधकाला आपल्याकडे 'ऋषि' ही पदवी देतात. त्याच्या अंगीं जीवनाला वळण लावण्याचेंहि सामर्थ्य असतें. अनेक ऋषींच्या अनेक मंत्रांचें मनन करून त्यांचा वैचारिक समन्वय दाखवून देणाऱ्याला आपल्याकडे 'आचार्य' पदवी दिली जाते. श्री. जावडेकर यांना ही 'आचार्य' पदवी देण्यास कोणाचा विरोध होईल असें मला वाटत नाहीं.

—आचार्य स. ज. भागवत, 'जीवन आणि साहित्य', पान ६४








श्री. शिवराम गोविंद भावे

# मीं पाहिलेले जावडेकर

१९३२ सालीं नाशिक येथील तुरुंगांत श्री. शंकरराव जावडेकरांची थोडीशी टिंगलच म्हणा करणारी जी दहापांच तरुण मंडळी होती त्यांत माझा समावेश होता. श्री. शंकरराव देव, डॉ. आठल्ये, श्री. बाळासाहेब खेरप्रभृति आठजणांना, आम्ही " महात्मे " म्हणून टोकीत असूं. या आठांमध्यें शंकररावांचा समावेश होता. ही मंडळी सदा तात्त्विक भूमिकेवरुन बोलणारी, हंसण्याखिदळण्याला प्रतिकूल, चेहरे गंभीर आणि आम्हा तरुण मंडळीच्या दृष्टीनें पहातां समाजाच्या काळजीनें उगीचच आंबट तोंडानें वागणारी आणि म्हणून चेष्टेनें त्यांच्या त्या खोल्यांना ' महात्मा वॉर्ड ' असें नांव आम्हीं दिलें होतें.

### विचारीपणाची पण विजिगीषु वृत्ति

पण खेळकरपणाचा अभाव म्हणून ज्या ' महात्म्यापासून आम्ही दूर राहत होतों त्यांपैकीं श्री. शंकरराव जावडेकर यांचेशीं खेळामुळेंच माझा निकट संबंध आला. त्यांतूनच पुढें चिरपरिचित सहकारी तात्त्विक विरोधक आणि तथापिहि आदरपूर्ण स्नेही असा आमचा संबंध परिणत होत गेला. श्री. शंकरराव जावडेकर खेळतात हें वाचून, त्यांना दुरुन पाहणाऱ्या किती एक वाचकांना कांहींसें आश्चर्य वाटेल. परंतु बुद्धिबळांचा खेळ खेळण्यांत शंकरराव मोठेच पटाईत आहेत. त्या खेळाची त्यांना मोठी आवड आहे, नव्हे, एक प्रकारचें वेड आहे. बत्तीस सालीं चळवळीचा उत्साह लौकरच मंदावला होता; त्यामुळें तुरुंगांत आलेल्या मंद वातावरणांतच केवळ नव्हे तर बेचाळीसच्या अत्यंत धामधुमीच्या व प्राणपणाच्या वातावरणांत सुद्धां बुद्धिबळाचा डाव टाकायला शंकरराव मोठे उत्सुक असावयाचे. महिनेन महिने रोज तासन् तास आम्ही एकत्र खेळलों.त्यात शंकररावांचें व्यक्तिमत्त्व आम्हाला निदान मला तरी उत्तम परिचित झालें.

शंकररावांचा खेळ मोठा धिम्मा, चिवट, विचारी, दीर्घदृष्टीचा पण शांतवृत्तीचा असे. शास्त्रशुद्धतेकडे लक्ष अधिक, धांगडधिंग्याचा कंटाळा; थोडा जास्त वेळ लागला तरी हरकत नाहीं पण डाव अचूक टाकला गेला पाहिजे अशी भूमिका आणि प्रतिपक्षाला न चकवितां, त्याच्या गैरसावधपणाचा फायदा न घेतां, त्याला जिंकण्याची जबर इच्छा, असें त्यांच्या खेळाचें वैशिष्ट्य असे. गाडगीळ ( आतां नामदार ) प्रथम प्रथम आमच्या खेळांत येत नसत. पण ते जे एक दिवशीं आले ते शंकररावांच्या, त्यांच्या मतें चिकट खेळाला विरोध करण्यासाठीं. येतां क्षणींच आतांपर्यंत दोन्ही बाजूंकडून संयम, शिस्त, सावधपणा संभाळून चाललेल्या पटांत त्यांनीं धामधूम उडवून दिली. चारदोन मोहरीं सपाट्यासरशीं उडवून टाकून, आपलीं चार देऊन खेळाचा फडशा पाडला. दोन तासभर एक प्रकारें कुचंबलेला आमचा खेळ पांच मिनिटांत त्यांनीं अखेरीला आणला. आणि मौज ही कीं खेळ जिंकून ते गेले. त्यांनीं म्हणजे खेळाचे कोठले नियम धाब्यावर बसविले असें नव्हे. परंतु धामधूम घडली, डाव अंगावर घेतल्यासारखें करुन प्रतिपक्षाच्या विजयाच्या भरांतील गैरसावधपणाचा फायदा घेऊन तो उलटविणें वगैरे जीं लढाऊ कसबें गाडगीळांजवळ होतीं त्यांचा आश्रय शंकररावांना करतां येत नसे. जिंकला तरी डाव आपला, न जिंकला तरी डाव आपलाच ही वृत्ति त्यांची नसे. आणि म्हणून धामधुमीनें पट उधळण्याकडे त्यांची नजर नसे.

खेळांत जी रेखीवपणाची, सावधपणाची विचारी-








पणाची परंतु विजिगीषु वृत्ति शंकररावांची आढळली व आढळते तीच त्यांची जीवनांतील वृत्ति आहे. आणि विशेष म्हणजे आपला विचार मूलग्राही असावा आणि सर्वसामान्य विचारांहून कांहींसा भिन्न व स्वतःची स्वतंत्र प्रज्ञा दाखविणारा असावा असाहि एक पुसट भाव त्यांच्या ठिकाणीं आहे. आजूबाजूची आम्ही बहुतेक सर्व मंडळी गांधीवादी निदान काँग्रेसच्या अधिकृत धोरणाला चिकटून राहाणारी; पण एक शंकरराव तेवढेच हिरीरीनें साम्यवादाचें मंडन आणि पुरस्कार करणारे. समाजवादावर त्यावेळीं त्यांनीं एक व्याख्यानमालाच तेथें गुंफली. कां आपल्या जीवाचा एवढा आटापीटा हे करतात, असें माझ्यासारख्याला तरी वाटे. परंतु त्यावेळीं आटापीट वाटणारी, आमच्या चेष्टेचा विषय होणारी त्यांची भूमिका त्यांनीं मोठ्या दृढतापूर्वक अखिल महाराष्ट्रांत रुजविली.

## गांधीवाद व साम्यवाद यांचा समन्वय

आम्ही 'लोकशक्ती'मध्यें एकत्र काम करीत असतांना त्यांची ही भूमिका एक दिवस जास्त स्पष्टपणें त्यांनीं मांडली. काँग्रेसनें कांहीं अधिकृतरीत्या अजून समाजवादाचा अंगीकार केलेला नाहीं, अशा स्थितींत काँग्रेसपक्षीय अशा आपल्या वृत्तपत्रांत समाजवादी दृष्टिकोन इतक्या ठसठशीतपणें आपणाला कसा येऊं देतां येईल, असा माझा प्रश्न होता. त्यावर त्यांनीं आपली जी दृष्टि व्यक्त केली तीच त्यांची स्वतंत्र आणि भविष्यांतील घटना हेरून स्थिर केलेली भूमिका. ते म्हणाले: "गांधीवाद म्हणजे काय, हाच पुढेंमागें एक मोठा वादाचा प्रश्न होऊन राहणार आहे. गांधीजींनीं सुसंगतपणें एखाद्या ग्रंथांत कोठें आपला पक्ष म्हणून मांडला नाहीं. प्रसंगानुरूप ते लिहितात. त्यांतून स्वतःला अनुकूल अर्थ काढण्याची खटपट स्वार्थी धनिकांची आजहि आपण पाहतों. आज गांधीजी हयात आहेत. त्यामुळें असा अर्थ करणारांचा हा प्रयत्न यशस्वी होणार नाहीं. पण गांधीजींच्या नंतर परिस्थिति वेगळी होईल. धनिकवर्गाचें रक्षण म्हणजेच वर्गसमन्वयवादी गांधीवाद असें सांगितलें जाईल. टिळकांच्या भूमिकेचा गायकवाडवाड्यानें जसा गैरअर्थ केला तसें हें होईल. म्हणून आतांपासूनच आपण सावध राहिलें पाहिजे. गांधीवादाचा खरा गाभा जनतेच्या विचारांत दृढमूल केला पाहिजे. दलितांचें उद्धरण, सर्वांचें सुख हा गांधीवाद आहे. त्यांत आणि समाजवादाच्या भूमिकेंत कांहीं फरक नाहीं. सध्यांच्या दृष्टीनें, फरक साधनापुरता आहे. हें साध्य गांधीजींना अहिंसेनें साधावयाचें आहे. याहून अधिक फरक नाहीं. ही भूमिका आपण आतांपासूनच स्पष्ट करून ठेवली पाहिजे. सरदार पटेल व त्यांच्या पक्षाची मंडळी गांधीवादाचा गायकवाडवाड्यांतील मंडळीप्रमाणें दुरुपयोग करतील, तो त्यांनीं करूं नये यासाठीं सावध राहिलें पाहिजे आपण. म्हणूनच गांधीवाद हा साम्यवादाशींच जुळता कसा आहे परंतु साधनशुद्धीचें वैशिष्ट्य त्यांत कसें आहे हें दाखविलें पाहिजे. काँग्रेसच्या धोरणाशीं विरोधी ही भूमिका नाहीं, त्या धोरणांत भर घालणारी, तें अधिक बलिष्ट करणारी ही भूमिका आहे व तीच आपल्या पत्राची राहिली पाहिजे."

## कांहीं बिनतोड वाद

१९४२ सालीं आम्ही येरवड्यास एकत्र आलों. पहिले ३-३॥ महिने आम्ही अंधेरींत एकत्र होतों. आमच्या खोल्या एकमेकाला लागून होत्या. येथें दोन-अडीच महिने आमचे जे वाद झाले ते आम्ही कधींच विसरूं शकणार नाहीं. इतकी विचिकित्सा आमच्या सामाजिक व राजकीय भूमिकांची तेथें आम्ही केली कीं, उभयतांच्या दृष्टिकोनांची अगदीं पुरेपूर ओळख एकमेकांना पटली; विरोध कोठें आहे व तो कसा बिनतोड आहे हें समजलें व मग वाद थांबले. बुद्धिबळांचा खेळ मात्र त्याहीनंतर अखंड चालू राहिला.

अराजकवाद हा साम्यवादाचा अखेरचा बिंदु; गांधीवादाचाहि तोच. असें असून आणि मार्क्सची दृष्टि मान्य असूनहि गांधीवादाशीं चिकटून तुम्ही कसे राहतां, असा वाद मी त्यांच्याशीं पुष्कळदां केला. हळूहळू त्यांच्या ठिकाणची व्यक्तिवादी दृष्टि जास्त बलिष्ठ झालेली आहे. तिच्यामुळें साम्यवादांतील व्यक्तित्व दडपणारी शिस्त त्यांना आक्षेपार्ह वाटते. हें एक मोठें कारण, गांधीवादाकडे त्यांचें मन ओढतें याचें आहे, असें त्या वादांत आढळून आलें. साधनशुद्धि हें दुसरें मोठें कारण. साधनशुद्धि म्हणजे सत्य आणि अहिंसा. चांगल्या मार्गानें गेलें म्हणजे चांग-

त्याच ठिकाणीं जाऊन पोंचूं; आणि नच पोंचलों तरी अयोग्य कांहीं केल्याची नोंचणी तरी राहणार नाहीं. हा एक त्यांच्या ठिकाणचा मोठा बलिष्ठ विचार.

एक दिवस वेब दांपत्याच्या सोव्हिएट कम्युनिझम या पुस्तकाच्या वाचनाच्या वेळीं कम्युनिस्ट पक्षानें आपल्या कार्यकर्त्या सभासदांवर जीं बंधनें घातलीं आहेत त्यांचें वाचन चालू होतें. अशा सभासदानें लग्न केलें पाहिजे, घर करून राहिलें पाहिजे, नियमित आहार–विहार केला पाहिजे, नियमित झोंप घेतली पाहिजे, कार्यतत्पर राहिलें पाहिजे, बुद्धीची शुद्धता गमावेल असें कांहीं करतां कामा नये, अशी माहिती वाचली गेली. तेव्हां मी म्हटलें, "शंकरराव, तुमच्या गांधीसेवासंघाचा कार्यक्रम तरी याहून वेगळें काय सांगतो ?" तेव्हां ते म्हणाले "दोघांच्या हेतूंत मूलभूत फरक आहे, तो पाहा; गांधीसेवासंघ ही सगळी शिस्त, पावित्र्य आणि परमेश्वरयोग यावर भर ठेवून, सांगतो; तर कम्युनिस्ट पक्षाचें धोरण निव्वळ जडवादी आहे." "पण परिणाम एकच आहे ना ? मनःशुद्धि, बुद्धीचा अपक्षपातीपणा, वृत्तीचें स्थिरत्व वगैरे सगळ्या गोष्टी साम्यवादी पक्ष तरी, कर्तृत्व जास्त वाढावें आणि कार्य निर्भय निरहंकार वृत्तीनें व्हावें, या साठींच सांगतो ना !" असा पुन्हां प्रतिपक्ष मी केला. "पण त्यांचा मार्ग श्रद्धेचा नाहीं; श्रद्धेशिवाय सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं समत्व पाहण्याची वृत्ति संपादित होणार नाहीं हें एक, आणि कागदावर जरी हें सगळें ठीक दिसलें तरी प्रत्यक्ष रशियांतील कम्युनिस्ट पक्षांत या विचारशील शिस्तबद्धतेपेक्षां जोहुकुमी शिस्तबद्धताच अधिक नाहीं का ? त्यांत व्यक्तीच्या विकासाला बिलकूल वाव नाहीं. व्यक्तीची बुद्धि मारून तेथें हुकुमशाही धोरण अंगीकारलें जात आहे" त्यांनीं उत्तर केलें. या आपल्या आक्षेपाच्या समर्थनार्थ दोनतीन पुस्तकें त्यांनीं मला वाचावयास दिलीं; व त्याबद्दल वादही केला. त्यावर मी म्हणे "ही सर्व एकांगींच पुस्तकें नाहींत का ? दुसऱ्या बाजूचीं पुस्तकें आहेतच कीं. शिवाय रशियांतील प्रयोग चुकतो असें धरूं या. तो सुधारून नाहीं का आपल्याला चालतां येणार ?"

व्यक्तिवादावर निष्ठा आणि जडवादाची संपूर्ण भूमिका मान्य करण्याला विरोध यांच्या पोटीं साम्यवाद व त्याचा रशियांतील प्रयोग याबद्दलचें त्यांचें असमाधान वाढतेंच आहे. तदनुकूलच तेवढें ते वाचतात. विजिगीषु आग्रहीपणा वाढलेला; आणि गांधीजींबद्दल विलक्षण निष्ठा. यामुळें पुढें मग आम्ही चर्चा करण्यांत फायदा नाहीं असें ठरविलें.

## शुद्ध शास्त्रीय दृष्टि

परंतु या निष्ठेंतूनही केव्हां केव्हां त्यांची शुद्ध शास्त्रीय दृष्टि उफाळून वर येई. आमच्यापैकींच एक गृहस्थ एक दिवस म्हणाले, "मार्क्सवादाचा सगळा भर परिस्थितीवर आहे. पण परिस्थिती तर सदैव बदलते आहे. मार्क्सवादावर आधारून आज तुम्ही कांहीं कांहीं कार्यक्रम आम्हांला सांगतां. पण शंभर वर्षांनीं हीच परिस्थिति राहील का ? मग त्यावेळीं हे तुमचे कार्यक्रम कसे उपयोगी पडणार ?" त्यावर शंकरराव उसळूनच म्हणाले, "कोण म्हणतो हेच कार्यक्रम शंभर वर्षांनंतर लागू पडतील म्हणून ? शंभर वर्षांनंतर ज्या पिढ्या येतील त्या पाहतील कीं त्या वेळीं काय करावयाचें तें. त्यांना आमच्या कार्यक्रमानें बांधून ठेवणारे आम्ही कोण ? तें स्वातंत्र्य असूं दे कीं त्यांचें त्यांना. साऱ्या जगासाठीं आणि अनंत काळपर्यंत एकच एक कार्यक्रम प्रस्थापित करण्याची आमची इच्छाच नाहीं. तसें करणें शास्त्रीय नाहीं. जग जर नित्य बदलणारें आहे तर त्याबदला-नुरूप त्या त्या वेळच्या लोकांनीं आपल्या गरजानुसार आपला जीवनक्रम आंखावा हेंच युक्त आहे. मार्क्स नेमकें हेंच सांगतो. त्यानें फक्त सामाजिक व्यवहाराकडे पाहण्याची एक विशिष्ट शास्त्रीय रीत तेवढी सांगितली आहे. त्या रीतीप्रमाणें जो कार्यक्रम प्राप्त परिस्थितींत आवश्यक दिसेल तो अंमलांत आणला पाहिजे हें मार्क्सचें म्हणणें. आपला अमुक एक कार्यक्रम तिन्ही त्रिकाळ लागू पडेल किंवा पडावा, असें त्याचें अशास्त्रीय तत्त्वज्ञानच नाहीं !"

आमच्या मित्रांना शंकररावांची ही भूमिका पाहून थोडासा धक्काच बसला. परंतु त्यापेक्षांही आमच्या बरोबरच्या एका नाझीपक्षीय गृहस्थांना शंकररावांनीं जें चीत केलें तें तर विशेषच. सदर










अनुक्रमणिका

गृहस्थ मोठ्या मानभावीपणानें सांगत होते कीं " गांधीजींचें तत्त्वज्ञान राष्ट्रवादी आहे म्हणून तें आपण मानतों. " वस्तुतः हे गृहस्थ हिट्लरच्या तत्त्वज्ञानाशीं समरस झालेले. हिट्लरचा जर्मन राष्ट्रवाद, जर्मन आर्यवंशवाद हा त्यांना मान्य. गांधीजीहि असेच एका हिंदु राष्ट्राचे अभिमानी व हिंदी आर्यत्वाचे पुरस्कर्ते होत, म्हणून ते आपणास मान्य, असा भास त्यांना उत्पन्न करावयाचा होता. शंकरराव त्यांचा तो युक्तिवाद शांतपणें ऐकत होते. त्यामुळें त्या नाझींची समजूत झाली कीं, ते आपल्याला अनुकूलच असावेत. म्हणून " विचारा जावडेकरांना " असा पवित्रा त्यांनीं टाकला; परंतु " गांधीजींची तात्त्विक भूमिका राष्ट्रीय मुळींच नाहीं; तर संपूर्णपणें आंतरराष्ट्रीय आहे. त्यांना आपला साधनशुद्धीच्या पायावर आधारलेला, अराजकतावाद साऱ्या जगाच्या पचनीं पाडावयाचा आहे. हिंदुस्थानांत ते कार्य करतात याचें कारण आपल्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराला ही भूमि त्यांना अधिक अनुकूल वाटते म्हणून. पण त्यांची आकांक्षा साऱ्या जागाला एकरूप करण्याची आहे. गांधीजींवर एक राष्ट्रवादीपणाचा आरोप करणें अन्यायाचें आहे, अगदीं अशास्त्रीय आहे " असें शंकररावांनीं इतक्या दृढतेनें आणि चढाईच्या वृत्तीनें प्रतिपादन केलें कीं हिट्लरवादी नाझी संपूर्ण निरुत्तर झाले! त्यावेळची त्या अहंमन्य गृहस्थांची झालेली फजीती आणि केविलवाणी अवस्था आम्ही मंडळी कधीं विसरणार नाहीं. त्यांनीं—श्री. तेंडुलकरांनीं—पुन्हां शंकररावांशीं कसलीहि चर्चा करण्याचें धाडस केलें नाहीं.

## आमचा अखेरचा वाद

" शांततेनें क्रांति झाली तर आम्हांला नको का आहे? पण सनदशीर, अहिंसात्मक मार्गानें यश कोठेंच मिळालेलें नाहीं. आजवरच्या इतर राष्ट्रांतील क्रांतिमार्गांच्या दर्शनानें हिंदी भांडवलदार वर्ग जागरूक झाला आहे. तो हिंसात्मक मार्गानें मुद्धां पराभूत होईल कीं नाहीं ही शंका. तेथें गांधीजींचा हा मार्ग देशाचें दुःख आणि दारिद्र्य कधीं नाहींसें करणार? आपणा उभयतांना अंतिम एकच समाज-व्यवस्था अभिप्रेत आहे. पण गांधीजींच्या मार्गानें ती स्थिति येण्याला किती युगें लागतील कोणाला ठाऊक? तुमच्या या प्रयोगाला तुम्ही कांहीं तरी मुदत घालाल कां?"

" हो, " शंकरराव म्हणाले, " तीस वर्षें फक्त तुम्ही आम्हांला द्या. "

" तीस वर्षें तुमच्या हक्काचीं आहेत. तुम्ही तीं स्वतःच्या रक्तानें मिळविलेलीं आहेत. आम्ही कोण देणार तीं तुम्हांला? पण या तीस वर्षांत निवडणुकांच्या साहाय्यानें तुम्हांला यश कसें मिळेल? शास्त्रीय दृष्टिकोन असून हें तुम्ही कसें मानतां?

" ह्याचें असें आहे, ही आमची श्रद्धा आहे. चांगलीं माणसें निवडून पाठविण्याची शक्य ती खटपट आम्ही करूं. पण त्यांचेकडून सामान्य दलितांचें हित व्हावें यासाठीं वेळीं सत्याग्रहाचा प्रयोग आमच्या राज्याविरुद्धहि आम्ही करूं. अधिकारपदावर ज्यांचा लोभ नाहीं अशा सत्याग्रही कार्यकर्त्यांची एक मोठी फळी आम्ही तयार करूं आणि त्यांच्या विशुद्ध सत्याग्रही चळवळीनें राज्यकर्त्यांना आम्ही सन्मार्गावर ठेवूं. "

" तुमचें हें रम्य स्वप्न खरें ठरो. पण तसें तें ठरेल अशी मला मात्र आशा वाटत नाहीं. तीस वर्षांचा काळ म्हटलें तर थोडा आहे; म्हटलें तर पुष्कळच मोठा आहे. परंतु तीस वर्षांच्या अखेरीस आम्ही आज जेथें आहों तेथेंच तुम्हांला यावें लागेल. मात्र त्या वेळीं गांधीवादी म्हणविणारे लोक तुम्हांला आपल्यामधून घालवून देतील; आणि साम्यवादी तुमचा स्वीकार करणार नाहींत! "

या आमच्या वादानंतर आम्ही ८ । १० महिने एकत्र होतों. पण कडकडून वाद असा केला नाहीं. शंकररावांची भूमिका पूर्ण शास्त्रीय; पण गांधीजींच्या सत्याग्रही साधनाची, आणि त्याहीपेक्षां गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाची त्यांचेवर फार मोठी छाप पडलेली; त्या श्रद्धेपुढें तर्काचें चालण्यासारखें नव्हतें.

असो. शंकररावांचें संपूर्ण शब्दचित्र रेखाटण्याचा माझा हेतु नाहीं. कांहीं थोडे प्रसंग घेऊन त्यांची भूमिका आणि सामर्थ्य यांचें दिग्दर्शन मला करावयाचें होतें. १९२० ते १९३० पर्यंत शंकररावाचा काळ तयारीचा होता.








त्यावेळीं टिळक महाविद्यालयाचे ते प्रभावी शिक्षक होते. १९३० नंतर त्यांनीं साऱ्या महाराष्ट्राचें अध्यापकत्व पत्करलें. आजच्या महाराष्ट्रीय पुरोगामी मंडळीची ती भूमिका तयार करण्याचें फार मोठें श्रेय शंकररावांना आहे. १९३२ सालीं आम्ही तरुण मंडळी त्यांचेकडे साशंकतेनें पहात असूं; मोठी "महात्मा मंडळी" यांच्या वर्गाला बसत तीही कांहींशी अश्रद्धेनेंच. १९४२ सालीं त्यांनीं कांहीं तरी सांगावें अशी मोठ्या मंडळींनाहि उत्सुकता उत्पन्न झाली इतका प्रभाव शंकररावांच्या लेखणीला या दहा वर्षांत प्राप्त झाला. ते वक्ते नाहींत, धांवपळ करण्याची त्यांना ताकद नाहीं. त्यांची ती वृत्तिहि नाहीं. महाराष्ट्राच्या कोपऱ्यांत एकीकडे बसून आपल्या एका लेखणीच्या द्वारें महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनांत त्यांनीं क्रांति केली आहे; वृत्तपत्री जगांत आल्यानंतर त्यांच्या भाषेंतील पूर्वींचा तो अवजडपणा पार गेला, रेखीव माधुर्य त्या भाषेंत निर्माण झालें. अलिकडच्या काळांत शंकररावांच्या इतका प्रभावी अग्रलेखक कोणीच झाला नाहीं. महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनाला कलाटणी देण्याइतकें प्रभावी सामर्थ्य ज्यांच्या लेखणींत आहे त्यांना महाराष्ट्र वाग्देवीच्या मंदिरांत मानाची जागा यंदा मिळते आहे हें उभयतांना भूषणावह आहे. वैचारिक गल्लत आज इतक्या मोठ्या प्रमाणावर झालेली आहे कीं, काव्यनाटकांच्या ललित चर्चेपेक्षां नव्या शास्त्रीय भूमिकेचा प्रसार करण्याचें महत्कार्य आज भाषेकडून व्हावयास हवें आहे. या कार्याचें महत्त्व महाराष्ट्रभाषेच्या पाइकांपुढें प्रभावीपणानें मांडण्याचें महत्कार्य शंकररावांच्या इतकें निःपक्षपातीपणानें आणि सर्वसंग्राहक विशुद्ध वृत्तीनें करावयाला दुसरें कोणी नाहीं. म्हणूनच तर त्यांचीच निवड साहित्यसभेच्या अध्यक्षस्थानीं होण्याचा योग आला नसेल ना?

---

## प्रो. बाळ गंगाधर शास्त्री यांच्या स्मृतीला अभिवादन

आधुनिक महाराष्ट्राच्या गेल्या सुमारें १५० वर्षांच्या काळांत मराठी गद्य, नियतकालिक–सृष्टि प्राच्यविद्यासंशोधन, समाजसुधारणा इत्यादि कार्यक्षेत्रांतील एक आदिम श्रेष्ठ कार्यकर्ते आणि दादाभाई नौरोजीसारख्यांचे शिक्षक प्रो. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांना दिवंगत झाल्याला येत्या मे १७ ला १०३ वर्षे पुरीं होतात. प्रो. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांच्या चारित्राचा एक महान् साधन–ग्रंथ 'लोकशिक्षणा'चे विद्वान् संपादक श्री. गणेश गंगाधर जांभेकर यांनीं अत्यंत परिश्रमानें आणि संशोधनपूर्वक तयार केला असून तो प्रकाशनाच्या मार्गावर आहे. श्री. ग. गं. जांभेकरांच्या या साधन–ग्रंथांतील साहित्याच्या आधारें, बिहारचे गव्हर्नर ना. मा. श्री. अणे यांनीं नुकतेंच ९–४–४९ रोजीं अलाहाबाद येथील 'गंगानाथ झा रिसर्च इन्स्टिटयूट'च्या वार्षिक सर्वसाधारणसभेसमोर प्रो. बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांच्या थोर कामगिरीवर एक भाषण केलें. त्या भाषणांत ना. अणे यांनीं श्री. ग. गं. जांभेकर यांच्या या आगामी ग्रंथाचा 'एक अद्वितीय, वैशिष्ट्यपूर्ण चरित्रग्रंथ' म्हणून अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख केला असून, शेवटीं बाळ गंगाधर शास्त्र्यांच्या स्मृतीला अभिवादन करतांना पुढील उद्गार काढले आहेत : "आरंभींच्या काळीं ज्या कार्यकर्त्यांनीं पुढाकार घेऊन आपल्या देशबांधवांत जागृति उत्पन्न केली आणि अंधकारांत चांचपडणाऱ्या राष्ट्राला प्रकाश दाखविला, त्यांचें कृतज्ञतापूर्वक स्मरण ठेवणें हें आपलें–स्वतंत्र भारतांतील प्रत्येक नागरिकाचें पवित्र कर्तव्य आहे. अशा त्या पुरःसर कार्यकर्त्यांपैकीं प्रो. बाळ गंगाधर शास्त्री हे एक अग्रेसर होत यांत शंका नाहीं. त्यांच्या देशबांधवांनीं त्यांचें सदैव कृतज्ञ रहावें, एवढी त्यांची कामगिरी आहे. ब्रिटिश राज्याच्या आरंभींच्या काळांत ज्या ज्या राष्ट्रवीरांनीं आपल्या बौद्धिक संपदेनें आणि देशभक्तिप्रेरित सेवेनें हिंदुस्थानचा पश्चिम क्षितिज प्रकाशित केला, त्या राष्ट्रवीरांच्या दरबारांत बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर हे एक अग्रगण्य मानकरी आहेत हें निश्चित. त्यांच्या पवित्र स्मृतीला माझे प्रणाम."








श्री. नारायण गणेश गोरे

# जावडेकरांच्या वैचारिक यात्रेचा मागोवा

## काळभैरवाचें तांडव

चालू युगाचें वैशिष्ट्य कोणतें असा प्रश्न मला जर कोणी विचारला तर मी म्हणेन 'गति.' १९०० सालापासून गेल्या चाळीस वर्षांत किंवा अधिक निश्चितपणें बोलावयाचें झाल्यास १९१४ पासूनच्या गेल्या चौतीस वर्षांत मानवसमाजाच्या सर्वच व्यवहारांत–आर्थिक, राजकीय, सामाजिक व वैज्ञानिक क्षेत्रांत झाला इतका मोठा बदल एवढ्या मोठ्या वेगानें कधीं घडून आला असेल असें मला वाटत नाहीं. गेल्या तीस वर्षांतील राज्य-क्रांत्या, मनुष्यसंहार व संपत्तिविनाश यांच्याकडे जरा तिऱ्हाइतपणें पाहूं लागलें तर हा काल म्हणजे काल-भैरवाच्या उद्दाम तांडवाचाच काळ असून त्या प्रलयंकराचें बेहोष नृत्य अद्यापिहि संपलेलें नाहीं, असें वाटूं लागतें. कालाची ही अनिरुद्ध गति कवीच्या प्रतिभाचक्षूनें पाहूनच जणूं कांहीं कविवर्य तांब्यांनीं १९२० सालीं पुढील पद्यपंक्ति लिहून ठेवल्या होत्या :

> "पाड सिंहासनें दुष्ट हीं पालथीं !
> ओढ हत्तीवरुनि मत्त नृप खालती !
> मुकुट रंकास दे, करटि भूपांप्रति !
> झाड खट्खट् तुझें खड्ग क्षुद्रां !
> जळ तडागीं सडे ! बुडबुडे ! तडतडे !
> 'शांति ही !' बापुडे बडबडति जन किडे !
> धडधडा फोड तट, रुद्र ! ये चहुंकडे !
> धगधगित अग्निमधिं उजळ भद्रा !"

हा कमालीच्या अशांततेचा काळ आचार्य जावडेकरांनीं नुसता पाहिलेला किंवा अनुभवलेला नाहीं तर अभ्यासिलेला व परीक्षिलेला आहे. आणि मनःपूर्वक केलेल्या अभ्यासापासून व परीक्षणापासून त्यांनी कांहीं निर्णयहि काढलेले आहेत. मराठी भाषेच्या द्वारां आपले विचार व निष्कर्ष वाचकांपुढें सतत ठेवण्याचें कार्य आचार्य जावडेकरांनीं अत्यंत निःस्पृहपणानें व निरलसपणानें गेलीं दोन तपें चालूं ठेवलें आहे. म्हणूनच या काळांत प्रत्ययास येणारें विचारमंथन आणि त्यासंबंधीं आचार्य जावडेकरांच्या प्रतिक्रिया यांचा धांवता परामर्श आज त्यांच्या अभिनंदनाच्या निमित्तानें घेणें उचित ठरेल.

## उदारमतवादाचा डोलारा कोलमडला

आचार्य जावडेकरांच्या व्यासंगाला प्रारंभ झाला तेव्हां यंत्रयुगाबरोबरच जन्मलेल्या पाश्चात्यांच्या प्रागतिक अथवा उदारमतवादाचा जमाना इतिहास-जमा झालेला होता. यंत्रोत्पादन जसजसें वाढत गेलें तसतसें मानवी समाजांत दोन विरोध ठळक-पणानें दृग्गोचर होऊं लागले. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादिकांसारखीं जीं राष्ट्रें औद्योगिक राष्ट्रें म्हणून उत्पादनाचीं मक्तेदारी बळकावून बसलीं होतीं त्या राष्ट्रांत प्रत्यक्ष धनोत्पादन करणाऱ्या लक्षा-वधि कामगारांचा एक वर्ग व त्याच्या धनावरची साय खाऊन अपरंपार संपत्तीचे मालक बनलेल्या धनिकांचा एक वर्ग असे दोन वर्ग पडले आणि त्यांच्यामध्यें संघर्ष चालू झाले. त्याचबरोबर औद्योगिक राष्ट्रांतला माल ज्या देशांत खपविण्यांत येई व ज्यांच्याकडून औद्योगिक उत्पादनासाठीं कच्च्या मालाचा पुरवठा सतत करवून घेण्यांत येई ते मागासलेले, कृषिप्रधान व वासाहतिक देश आणि त्यांना तसेच मागासलेले ठेवण्याची सतत धडपड करणारीं हीं औद्योगिक राष्ट्रें यांच्यांतहि हितविरोध निर्माण होऊन संघर्षास



अनुक्रमणिका






तोंड लागलें. यंत्र-प्रधान राष्ट्रांत बाजारपेठासाठीं लागलेल्या चढाओढींमुळें जीं आपसांतील वैरें निर्माण झालीं होतीं तीं वेगळींच. औद्योगिक उत्पादनाची ही तत्कालीन परिस्थिति अभ्यासून तिच्यापासून निर्माण होणाऱ्या या हितविरोधांची मीमांसा जगापुढें मांडणारे मार्क्स व दादाभाई नौरोजी यांच्यासारखे प्रज्ञावंत व्हिक्टोरिया राणीच्या ऐन उत्कर्षाच्या काळांतच जगासमोर आले ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. उदारमतवादाचा मूलाधार असें जें व्यक्तिस्वातंत्र्य तें या औद्योगिक पद्धतीच्या राजवटींत किती अर्थशून्य व दिखाऊ बनलें आहे हें मार्क्स व दादाभाई नौरोजी यांसारख्या बुद्धिवंतांनीं सिद्ध केल्यामुळें उदारमतवादाचा इंग्लंडांतील राज्यकर्त्यांनीं उभा केलेला डोलारा कोलमडून पडला. मिल-स्पेन्सरसारखे उदारमतवादाचे इंग्लंडमधील जे तत्त्वज्ञानी आचार्य होते, त्यांना आपल्या उत्तर वयांत याची जाणीव झाली असावी असें वाटतें. पण व्यक्तिस्वातंत्र्याला निरर्थक बनवणारी व अर्थाचा अनर्थ बनवणारी ही अर्थव्यवस्था बदलावी कशी याचा मार्ग मात्र त्यांना दाखवितां आला नाहीं.

हिंदुस्थानांत जी राष्ट्रीय चळवळ सुरू झाली होती तिला चालना देणाऱ्यांनीं सुद्धां इंग्लंडांतील मिल–स्पेन्सरादिक उदारमतवाद्यांपासूनच स्फूर्ति मिळविलेली होती. इंग्लंडच्या साम्राज्यवादी जोखडांत मात्र अडकलेल्या हिंदी लोकांना उदारमतवाद्यांकडून पुरस्कारण्यांत येणारा व्यक्तिस्वातंत्र्यवाद व त्याला अंगभूत असणारी जबाबदार राज्यपद्धति प्रिय वाटावी यांत नवल नाहीं. पण घरीं उदार व हिंदुस्थानासारख्या देशांत अरेराव असलेल्या इंग्रजांच्या हातून आपण मुक्त कसें व्हावें याचा मार्ग त्यांनाहि उमगलेला नव्हता. अनिर्बंध व खुल्या व्यापाराच्या उच्च तत्त्वांच्या आसऱ्यानें इंग्लंड हिंदुस्थानाचें रक्त शोषीत आहे हा दादाभाईंचा सिद्धांत टिळक, घोष वगैरे देशभक्तांना पटला होता. लॉर्ड मोर्लेसारखा तात्त्विक क्षेत्रांत उदारमतें मांडणारा विचारवंत व्यवहाराच्या क्षेत्रांत अस्सल हुकूमशहासारखा वागतो याचा पडताळा त्यांना मिळालेला होता. खऱ्या अर्थानें व्यक्तिस्वातंत्र्य, प्रातिनिधिक सरकार वगैरे गोष्टी पदरांत पाडून घ्यावयाच्या असतील तर हिंदुस्थानासारख्या देशांनीं प्रथम बंधमुक्त झालें पाहिजे आणि त्यासाठीं देशामध्यें अफाट पसरलेल्या जनतेची संघटन केली पाहिजे. हा सिद्धांतहि त्यांना प्रतीत झाला होता. आणि स्वतःच्या बंधविमोचनासाठीं हिंदी जनतेला कोणत्या मार्गानें साधारणतः जावें लागेल याची कल्पना लोकमान्यांना आलेली असावी असें त्यांच्या Tenets of the New Party मधील विचारांवरुन वाटतें. पण अरविंदांनीं ऐहिक पातळीवरचें राजकारण सोडल्यावर व लाला लजपतराय हद्दपार झाल्यावर लोकमान्यांनींहि १९०८ सालीं स्फुरलेले विचार तसेच सोडून दिले असावेत. १९१४ ते १९२० पर्यंत लोकमान्यांनीं पुन्हां राजकारण करुन विझलेल्या निखाऱ्यावरची राख झाडली यांत शंका नाहीं. पण राजकारणांत झालेली कोंडी फोडण्याच्या बाबतींत आणि उदारमतवादी तत्त्वांना गतिमान् जनतेकडून करवून घेतलेल्या आचारामार्फत चालतीं बोलतीं करणाऱ्या बाबतींत लोकमान्यदेखील आपल्या अखेरीच्या क्षणापर्यंत चांचपडत राहिल्यासारखे दिसतात. पाश्चात्य विचारसरणीनें निर्माण केलेला कायद्याबद्दलचा व न्यायासनाबद्दलचा आदर लोकमान्यांच्या पिढीमध्यें इतका दृढमूल झालेला होता कीं कायदेभंग आणि तो देखील सामुदायिक कायदेभंग करण्यास लाखों लोकांना उद्युक्त करुन सरकारला शह देण्याची कल्पना लोकमान्यांना कदाचित् सुचती पण पटती ना !

## आचार्य जावडेकरांची अद्वितीय कामगिरी

अशा वेळीं उदारमतवादांतच वाढलेले पण सरकारच्या वा समाजाच्या सैतानी शक्तीशीं असहकार पुकारुन आपल्या बुद्धीला जें सत्य प्रतीत होत असेल त्याच्यासाठीं अहिंसक लढा करण्यांत चूक नाहीं; इतकेंच नव्हें तर तोच खऱ्या सत्यवादी व्यक्तीचा धर्म होय अशी प्रेरणा रशियन तत्त्वज्ञ टॉलस्टॉय यांच्यापासून मिळविलेले गांधीजी यांनीं हिंदी राजकारणांत पदार्पण केलें. त्यांनीं टॉलस्टॉयची विचारधारा नुसती समजून घेतलेली नव्हती तर आफ्रिकेमध्यें तिच्या अनुरोधानें व्यक्तीला आणि समुदायाला कसें आचरण करतां येईल तें

# जावडेकरांच्या वैचारिक यात्रेचा मागोवा

प्रयोगानें सिद्ध करून टॉलस्टॉयच्या कल्पनातरंगांना व्यावहारिक व राजकीय आचारधर्माची जोड दिली होती. आफ्रिकेंत छोट्या प्रमाणावर केलेल्या त्यांच्या प्रयोगांना हिंदुस्थानांत अतिविशाल भूमि मिळाली; आणि १९१८ सालापासून सत्याग्रहाच्या नवीन तंत्रामुळें हिंदी राजकारणाची कोंडी फुटत चालली.

उदारमतवादाला झुंजार बनविण्याचा जो मार्ग गांधीजींनीं सांगितला तो हिंदुस्थानांतील तथाकथित उदारांना (प्रागतिक, लिबरल्स्, मवाळ इत्यादि नांवांनीं ओळखले जाणारे गट यांना) मानवला नाहीं आणि राष्ट्रवादाला जनताभिमुख बनविण्याचें जें तंत्र गांधीजींनीं बसविलें तें येथील तथाकथित राष्ट्रवाद्यांना (टिळकपंथीय, प्रतिसहकारवादी, हिंदुसभावादी इत्यादि नांवांनीं ओळखले जाणारे गट यांना) पचलें नाहीं! सुदैवानें म्हणा कीं दुर्दैवानें म्हणा उदारमतवादाचे व राष्ट्रवादाचे जनक जे न्यायमूर्ति रानडे व लोकमान्य टिळक ते दोघेहि महाराष्ट्रीयच असल्यामुळें ते गेल्यानंतर त्यांच्या वादांतील प्रसरणशीलता नष्ट झाली आणि ती नष्ट झाल्यावर वाळक्या खरासारखा जो त्यांच्या विचारसरणींतील भाग राहिला तो त्यांच्या त्यांच्या अनुयायांनीं मूळ अधिकृत वाद म्हणून आपल्यापाशीं जपून ठेवला. त्यामुळें महाराष्ट्रांतील विद्वानांकडून-निदान राजकीय दृष्ट्या जागृत मंडळींकडून तरी—गांधीजींच्या विचारावर, संघटनापद्धतीवर आणि राजकीय विरोधाच्या तंत्रावर खूपच कडाडून हल्ले चढविण्यांत आले. या वेळीं कालप्रवाहांतून महाराष्ट्र बाहेर फेकला जाऊं नये आणि संबंध हिंदुस्थानाचा व महाराष्ट्राचा सांधा निखळूं नये म्हणून ज्यांनीं विशेष प्रयत्न केले त्यांत श्री. शंकरराव देव आणि आचार्य जावडेकर यांची कामगिरी विशेष उल्लेखनीय आहे. श्री. देवांनीं महाराष्ट्रांत काँग्रेसचें चिमुकलें निशाण १९३४ पर्यंत सतत फडकत ठेवलें. मध्यें त्यांना १९३० च्या सुमारास श्री. केशवराव जेधे येऊन मिळाल्यावर महाराष्ट्रांतील काँग्रेसच्या देहांत भरपूर रक्त व मांस आलें. म्हणून श्री. देव व श्री. जेधे यांची कामगिरी महत्त्वाचीच यांत शंका नाहीं. पण या काळांत म्हणजे १९२० पासून पुढें १९३७ मध्यें मुंबई प्रांतांत काँग्रेसचें मंत्रिमंडळ स्थापन होऊन जनताजागृतीची गरज काँग्रेसला वाटेनाशी होईपर्यंत काँग्रेसवर व गांधीवादावर होणाऱ्या बौद्धिक हल्ल्यांना केवळ तोंड देण्याचेंच नव्हें तर ते परतवण्याचें कार्य एकट्या जावडेकरांनींच केलें हें कबूल केलें पाहिजे.

## हिंदी राजकारणांत मार्क्सवादाचा धागा गोंवला

पण याच काळांत गांधीवाद्यांनाहि आचार्य जावडेकरांनीं एक नवीन दृष्टि देण्याचा प्रयत्न चालविला होता. ती म्हणजे समाजवादी दृष्टि. १९१८ सालीं हिंदुस्थानांत राजकारणाचा नवा अध्याय सुरू झाला तेव्हां रशियांतील झारशाही उलथून पडून तेथें लेनिनच्या नेतृत्वाखालीं कम्युनिस्ट सरकार प्रस्थापित झालेलें होतें; आणि हें कसें झालें, याबद्दलच्या आश्चर्यात हिंदुस्थानांतील जाणती मंडळी पडली होती. या क्रांतीच्या मागची ऐतिहासिक, बौद्धिक, व आर्थिक प्रेरणाच असा जो मार्क्सवाद तो त्यावेळच्या आपल्याकडील भल्याभल्यांना ऐकून देखील ठाऊक नव्हता; मग त्याचा अभ्यास तर दूरच राहिला. त्यावेळीं डेक्कन कॉलेजच्या ग्रंथालयांत मार्क्सचें एकहि पुस्तक नव्हतें असें आचार्यांनीं मला सांगितल्याचें स्मरतें. या नव्या क्रांतीची स्वतः नीट ओळख करून घेऊन आणि तिला प्रेरक झालेल्या वादाचा स्वतः अभ्यास करून मग मराठी वाचकांना शहाणे करण्याचा उद्योग आचार्य जावडेकरांनींच व्यवस्थितपणें सुरू केला. गांधीवाद्यांनीं व काँग्रेसजनांनीं अभ्यासाची फिकीर कधीं फारशी केलीच नाहीं; निदान १९३२–३४ सालापर्यंत तरी नाहींच नाहीं. या गांधीवाद्यांच्या सर्वसाधारण प्रवृत्तीला जे दोन ठळक अपवाद होते ते म्हणजे आचार्य जावडेकर व आचार्य भागवत. या दोन आचार्यांपैकीं जावडेकरांना लिहिण्याची हौस मनापासून, तर भागवतांनीं लेखणी जवळ जवळ पाडुरंगाच्या चरणांवर वाहिलेली. तेव्हां गांधीजींचें सत्याग्रही राजकारण हा रानड्यांच्या उदार राजकारणाचा व लोकमान्यांच्या असंतोषात्मक राष्ट्रीय राजकारणाचा नैसर्गिक परिपोष होय हें महाराष्ट्रीय जनतेला पटवून देत असतांनाच मार्क्सप्रणीत समाजवाद हा सत्याग्रही








राजकारणाची पुढची पायरी होय असेंहि आचार्य पटवून देत होते. समाजवादावांचून सत्याग्रहाचें म्हणजे सत्याची प्रस्थापना व अन्यायाचें निमूर्लन करूं पाहाणाऱ्या वादाचें साफल्य सिद्ध होऊंच शकत नाहीं; ही विचारसरणी आचार्यांनीच महाराष्ट्रांत फैलावली. कम्युनिस्टांच्या तर्कटी व अवास्तव कार्यपद्धतीमुळें हिंदुस्थानांतील राजकारणाच्या मुख्य पटापासून अलग होऊं पाहाणारा मार्क्सवादाचा धागा आचार्यांच्या प्रयत्नामुळें पुन्हां मुख्य पटांत गोंवला गेला.

## कम्युनिझमची संदेशक्षमता लुप्त झाली

परंतु १९२८ पासून कम्युनिस्ट विचारसरणींतच भोंवरे निर्माण झाले आणि त्याचें युगसंदेशसामर्थ्य नष्ट झालें. अजून रशियामध्यें कम्युनिझमच्या नांवानेंच राज्य चालूं आहे. त्याचा दबदबा जगभर आहे आणि कोट्यवधि लोक अजूनहि कम्युनिझमच्या प्रभावाखालीं आहेत ही गोष्ट खरी. पण तशीच परिस्थिति १९१४ पर्यंत इंग्लंडची नव्हती काय? इतकेंच काय पण १९३९ च्या महायुद्धापर्यंत देखील इंग्लंडचा दबदबा जगभर नव्हता काय? पण त्यावरुन या काळांत इंग्लंडपाशीं जगाला देण्यासारखा कांहीं संदेश उरला होता असें आपण समजत नाहीं. उदारमतवादाचे प्राण केव्हांच नष्ट झाले होते. पुढें ५०–७५ वर्षें फक्त त्याच्या कलेवराची सजावट करुन त्याचें प्रदर्शन चालूं होतें इतकेंच. त्याचप्रमाणें रशियामध्यें विरोधीपक्षाचें ज्यावेळीं शिरकाण करण्यांत आलें आणि प्रस्थापित राजवटीला विरोध म्हणजे देशद्रोह असें ठरुन त्याची पाळेंमुळें खणण्यांत आलीं तेव्हांच कम्युनिझमची संदेशक्षमता लुप्त झाली. रशियाच्या पंचवार्षिक योजनांनीं आमचे डोळे दिपले. पण तेथें उठणाऱ्या प्रचंड कारखान्यांच्या आड लक्षावधि लोकांचे मुडदे लपवणें अशक्य होतें आणि शेंकडों धुराड्यांतून निघणाऱ्या धुरानें देखील या मनुष्यसंहारांत सांडलेल्या रक्ताचा वास मारला जात नव्हता. रशियाच्या प्रगतीचें रेषाचित्र (ग्राफ) अभिमानपूर्वक दाखविणाऱ्यांच्या लक्षांत ही गोष्ट येईना कीं इंग्लंडइत्यादि रक्तपिपासु साम्राज्यवादी राष्ट्रांतील औद्योगिक वाढहि एकोणीसाव्या शतकांत अशीच असामान्य वेगानें झाली होती, आणि रेड इंडियनांची शिकार खेळणाऱ्या व नीग्रोंच्या रक्ताची रंगपंचमी साजरी करणाऱ्या अमेरिकनांनीं सुद्धां पाहातां पाहातां आपल्या घरावर सोन्याचीं कौलारें चढवलीं होतीं! (हाच चमत्कार १९२२ ते १९३५ पर्यंत फॅशिस्ट इटलीनें, १९३१ ते १९३८ पर्यंत नाझी जर्मनीनें व १९१४ ते १९४२ पर्यंत शिंतोवादी जपाननेंहि करुन दाखवला होताच.) म्हणून नवसमाज प्रस्थापित करण्याचा प्रश्न हा फक्त एका वाराऐवजीं चार वार कापड देण्याचा व एका भाकरीऐवजीं दीड भाकरी ताटांत फेकण्याचा प्रश्न नाहीं. तो प्रश्न तर सोडवणें क्रमप्राप्तच आहे. पण तो सोडवीत असतां ' वानरतुल्य नरनारींना मानवी कोटीला कसें आणावयाचें तें मी सांगतों ' अशी प्रतिज्ञा कम्यूनिझमनें केली होती म्हणून त्याला युगसंदेशाची पदवी प्राप्त झाली होती. पण ती प्रतिज्ञा रशियानें धुळीस मिळविली. त्यामुळें गांधीजींच्या विचारसूत्रांतील अहिंसेचें मूल्य विशेषेंकरुन पटूं लागलें. प्रतिपक्षीयांच्या बरोबर वागतांना कोणत्या वृत्तीनें वागावें, विरोधाला नीतीचीं, माणुसकीचीं कांहीं बंधनें आहेत कीं नाहीं, आणि असतील तर तीं सर्वाभूतीं प्रेम करावयास शिकवणाऱ्या अहिंसेवांचून पाळणें कसें शक्य होईल याचा विचार सुरू होऊन मार्क्सवादाचा अर्थप्रधान दृष्टिकोन नव्या समाजाच्या संपूर्ण निर्मितीसाठीं अपुरा आहे असें आचार्यांनीं प्रतिपादलें. मार्क्स-व-एंजल्सनें आपल्या प्रतिपादनांतील एकांगीपणाचा हा दोष स्वतःच प्रसंगानुरोधानें कबूल केला होता. पण आचार्यांनीं तो स्पष्टपणें मांडण्यास सुरवात केली.

त्यामुळें मजा अशी झाली कीं, कम्युनिझमचे हिंदुस्थानांतील अधिकृत प्रतिनिधि तर त्यांच्यावर साहजिकच खवळले पण मार्क्सवाद व फ्रॉइडवाद हीं दोन्हीं समाजांतील अत्यंत सर्वसाधारण व क्षुद्र अशा स्वार्थबुद्धीचें समर्थन करणारीं दर्शनें होत, अशा गैरसमजुतीनें महाराष्ट्रांतील ज्या " नवमतवादी " साहित्यिकांनीं त्यांना कवटाळलें होतें ते देखील आचार्यांवर आपल्या भेंडाच्या धनुकलीनें मारा करूं लागले! मार्क्सवादाचा वर्गकलह त्या बिचाऱ्यांना जसा समजला नव्हता तसेंच आचार्यांच्या प्रतिपादनां-








तील धर्म, आत्मशक्ति, मोक्ष इत्यादि शब्दांचा उलगडाहि त्यांना झालेला नव्हता. 'धर्माचरण करा' असें आचार्य म्हणतात म्हणजे ते पुन्हा 'पुण्याच्या सदाशिव पेठेच्या हौदावर जाऊन सूर्योदयाच्या आंत स्नान करा व गयेला जाऊन पितरांचें पिंड देऊन श्राद्ध करा' असें सांगत असावेत असें त्यांना वाटलें. या नवमतवादी लोकांच्या गिल्ल्यामुळें पुन्हां एकवार सिद्ध झालें तें इतकेंच कीं महाराष्ट्रांतील साहित्यपुंगवांना दर्शनें वाचण्याची व त्यावर विचारविमर्श करण्याची बौद्धिक धमक मुळींच नाहीं. त्यामुळें ते पुरोगामित्वाची झूल पांघरीत असले तरी अन्तःकरणानें स्थिरतावादीच आहेत याचा पुन्हां एकवार प्रत्यय आला! मार्क्सवाद व कम्युनिझम यांच्या संबंधींच्या अशा प्रकारच्या प्रतिक्रिया आतां सर्वच पाश्चात्य देशांत निर्माण झालेल्या आढळतात. आचार्य जावडेकरांनीं तसेच विचार निर्भयपणें मांडून महाराष्ट्राला आघाडीवर ठेविलें यांतच त्यांचा मोठेपणा आहे.

## राजदंड हा प्रगतीचा हन्ताच आहे का?

उदारमतवाद व मार्क्सवाद यांच्यावर अधः-पतनामुळें गेल्या पन्नास वर्षांत जी हवालदिली निर्माण झाली होती तिच्यापेक्षांहि अधिक दाट अशी निराशा अथवा वैकल्याची भावना प्रस्तुत निर्माण झालेली आहे. कारण इंग्लंडचा दिवा मालवला तेव्हां रशियाची मशाल पेटली होती. ती विझत चालली तेव्हा गांधीजींचा चंद्रोदय पूर्व क्षितिजावर होत होता. आतां तेंहि तेज लुप्त झालें असून गांधीवादाच्या मूलतत्त्वांची जतणूक अथवा त्यांच्या शिकवणुकीचा आचार हिंदुस्थानाची राज्यधुरा ज्यांच्या हातीं गेलेली आहे ते करतील असा मुळींच संभव दिसत नाहीं. त्यामुळें नव्या संदेशाची तुतारी आपल्या देशांतून फुंकली जाईल ही आशा आतां राहिलेली नाहीं. दंडधारी इंग्लंडला उदारमत आचरतां आलें नाहीं. दंडधारी रशियाला कम्युनि-झमचा निरोप घ्यावा लागला आणि आतां दंडधारी हिंदुस्थान गांधीवादाच्या चिर्‍यावर फक्त फुलें घालीत आहे! अशीं दृश्यें पाहिल्यावर विचारवंताच्या मनांत असा विचार सहजच येतो कीं, राजदंड हा मुळीं प्रगतीचा हन्ताच आहे कीं काय? भगवान् मनूंना राजदण्ड हातीं घेण्याची विनंति ब्रह्मदेवानें केली तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें होतें कीं, 'मला पाप-कर्माची भीति वाटते; असन्मार्गी मनुष्यावर राज्य करणें हें पाप आहे!' भगवान् मनूंनीं व्यक्त केलेली भीतिच शेवटीं खरी असेल तर त्याचा अर्थ असा कीं अर्थव्यवस्था व तिच्यांतून उद्भवणारे व्यवहार-संबंध हे कितीहि बदलले तरी मानवसमाज आदर्श बनण्याची आशाच नको. मग उदारमतवाद्यांना हवें असलेलें अधिकांत अधिकांचें अधिकांत अधिक हित करणारें राज्य, किंवा कम्युनिस्टांना हवा असलेला शासन-संस्थेचा लोप, अथवा गांधीजींनीं कल्पिलेलें रामराज्य या भूतलावर कधीं अवतरण्याची तिळमात्र तरी आशा आहे काय? निदान सध्यां तरी तें लांबचें क्षितिज दृष्टिपथांत येत नाहीं ही गोष्ट नाकारण्यांत हशील नाहीं. म्हणून हक्स्ले, रॉय, कृष्णमूर्ति यांच्या सारख्या अंतर्मुख बनत चाललेल्यांना व्यक्तिवादी अथवा गूढवादी म्हणून निकालांत काढणें मूर्ख-पणाचें होय. ते कांहीं कायर अथवा मंदबुद्धि लोक नव्हते. राजकीय पक्षामार्फत समाजहित साधण्याची आशाच आम्ही सोडली असें जेव्हां ते बोलून दाख-वितात तेव्हां गेल्या अर्ध्या शतकांत विफल ठरलेल्या तीन मतप्रणालींचा अनुभव जमेस धरून ते बोलत असतात हें आपण विसरून चालणार नाहीं. आचार्य जावडेकरांच्या बुद्धीनें सुद्धां या अर्थपूर्ण घडामोडींची नोंद केलेली आहे. या अन्ध-तमांतून बाहेर पडण्याचा कोणता मार्ग ते सुचवितात?

## आचार्यांच्या शुद्ध विचारांचें पायस

राजर्षींच्या हातीं दण्डशक्ति असावी असें मत आचार्य जावडेकर कांहीं वर्षांपूर्वीं मांडीत असत. पण सिंहासनारूढ झाल्यानंतर राजर्षींच्या ठिकाणचें ऋषित्व लोपून राजेपणा मात्र परितुष्ट होतो असें अनुभवास येत चालल्यामुळें शासनसंस्था समाज-वाद्यांच्या हातीं सोपवून जनतेला विशुद्ध मार्गांनीं संघटित करण्याचें व अहिंसक मार्गानें समाजवाद आणण्यासाठीं तिची सिद्धता करण्याचें कार्य गांधी-वाद्यांनीं हातीं घ्यावें असा एक पर्याय आचार्यांनीं सुचवून पाहिला. दंडधारणा ही अधर्मोप्रत नेणारी व पापकारी असल्यानें तिचा विटाळ मानावा ही जी











भगवान् मनूची वृत्ति हॅक्स्ले अथवा भाई रॉयसारख्यांच्या मनांत प्रादुर्भूत झाली आहे ती जावडेकरांनीं स्वीकारलेली नाहीं. तर उलट राजदंड कोणी तरी धारण करून समाजशासन हें केलेंच पाहिजे असें ते म्हणतात; परंतु राज्यसत्तेला वळण लावण्यासाठीं व सन्मार्गावर ठेवण्यासाठीं सत्याग्रही विचाराच्या व अहिंसक आचाराच्या मानवधर्मी समाजसेवकांनीं सत्तेपासून स्वतः दूर राहून सतत प्रयत्नशील राहावें असें त्यांच्या विचारांतील अलिकडचें सूत्र दिसतें. वाल्मीकि–आश्रमांतील प्रवचनें या आचार्यांच्या अलिकडच्या पुस्तिकेंत पहिल्याच प्रवचनामध्यें रामराज्यांतील वाल्मीकीच्या कार्याचा जो अन्वय त्यांनीं लावून दाखविला आहे त्यावरून राजा व सत्याग्रही यांचे परस्पर संबंध कसे असावेत याबद्दलचे आचार्यांचे विचार नीट कळून येतात. खऱ्या सत्याग्रहीनें समाजवादी बनलें पाहिजे आणि समाजवाद्यानें सत्याग्रही बनलें पाहिजे हें गांधीजींचें वाक्य घेऊन त्यावरहि त्यांनीं जें विवरण लिहिलें आहे त्यांत ही दृष्टि दिसून येते. कर्म पापावलिप्त म्हणून कर्माचा त्याग न करितां तें 'सर्वभूतहिते रतः' अशा प्रकारें करीत राहणें आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या जबाबदाऱ्यांचा व संकटांचा आनंदानें स्वीकार करणें हाच सध्यां भारतावर व सर्व जगावर कोसळलेल्या सर्वनाशाच्या संकटांतून बचावून जाण्याचा मार्ग दिसतो. तोच मार्ग आचार्य जावडेकर मराठी भाषिकांना समजावून सांगण्याची पराकाष्ठा करीत आहेत.

हा मार्ग यशस्वी होईल किंवा काय? कीं आतांपर्यंत अनेक श्रेष्ठांनीं सुचविलेल्या अनेक मार्गांची जी गत झाली तीच याचीहि होईल, तें कोण सांगूं शकेल? पण कांहींहि झालें तरी उपनिषत्कालीन दर्शनापासून गांधीवादी दर्शनापर्यंत आपली बुद्धि सतत फिरती ठेवून केवळ 'समाजहिताय' आचार्य जावडेकरांनीं शुद्ध व समर्थ विचारांचें जें पायस महाराष्ट्राला सतत दिलें आहे त्याबद्दल महाराष्ट्र त्यांचा उपकृत राहील, निदान त्यानें तसें राहावें असें मला वाटतें! आधुनिक कालाच्या वेगाबरोबर सारींच विचारसूत्रें भ्रमत आहेत, एकमेकांत गुंतत आहेत. हीं विचारसूत्रें जेथें तुटतील तिथें नीट सांधून घेऊन, गुंततील तेथें तीं उलगडून समाजाच्या मनाची भ्रांति दूर करीत राहाण्याचें थोर वैचारिक कार्य अधिकाधिक सफलपणानें आचार्यांच्या हातून अखेरपर्यंत घडत राहो! I will not rest असें रोमाँ रोलाँची वीरवाणी म्हणाली होती. आचार्य जावडेकरहि या महायात्रेंत थांबणार नाहींत. विश्वबंधुत्वाच्या पंढरीचें दर्शन झालें तर अर्थात्‌च त्यांना अपरंपार आनंद वाटेल. पण पंढरीच्या या प्रदीर्घ वाटेवर चालतां चालतां मध्येंच कोठें देह पडला तरीहि ते खिन्न होणार नाहींत याविषयीं मला मुळींच शंका नाहीं!

---

## कर्मप्रधान समाजवादी संस्कृति

समाजांतील निरनिराळ्या शक्ती याच देवता आहेत. प्रस्तुत देवतांच्या प्रसन्नतेंतून सर्व भोग किंवा संपत्ति उत्पन्न होत असते. ही संपत्ति हें एक 'हवनद्रव्य' समजून ती पुनः त्या देवतांकडे गेली पाहिजे. हा एक सामाजिक यज्ञ आहे. आणि या यज्ञाची उत्पत्ति कर्मांतून होत असते. हें यज्ञचक्र चालविण्यासाठीं कोणतेहि श्रम किंवा कर्म न करतां जे वर्ग सामाजिक संपत्तीचा उपभोग घेतात, परपीडेचें पाप करीत असतात आणि दुसऱ्यांच्या श्रमाचें फल उपभोगून स्वतः श्रम करीत नाहींत म्हणून चोर ठरत असतात, त्यांच्यावर सामाजिक श्रमशक्तिरूप देवतांचा कोप होऊन त्यांचा कालांतरानें नाश होणें हिच धर्मस्थापना म्हणतां येईल. या दृष्टीनें विचार केला तरी भोगप्रधान धनसत्ताक संस्कृतीपेक्षां कर्मप्रधान समाजवादी संस्कृति हीच वर्णाश्रमधर्माच्या मूलतत्त्वास अनुसरून आहे, हें मान्य करावें लागेल. वर्णाश्रम-धर्म समाजसेवा व समता यांवर अधिष्ठित असेल तर त्यापासून लोकसंग्रह किंवा समाजधारणा होईल.

—**आचार्य जावडेकर**, 'आधुनिक राज्यमीमांसा' पान १३९








श्री. गोपीनाथ तळवलकर

# जावडेकरांची भाषाशैली

"माझें एकंदर जीवन चिंतनप्रधान आहे. चिंतन आणि चर्चा हे माझे नित्याचे व्यवसाय आहेत लेखन आणि अध्यापन हे दुय्यम व्यवसाय आहेत." असें आचार्य जावडेकर यांनीं स्वतः विषयीं म्हटलें आहे (मनोहर, मार्च १९४५). पण असें असलें तरी त्यांचें लेखन इतकें विपुल व प्रभावी आहे कीं महाराष्ट्रांतल्या अनेक तरुण कार्यकर्त्यांना व युवकांना तें मार्गदर्शक झालें आहे. इतकेंच नव्हे, तर मराठी भाषेची विचारसंपत्ति समृद्ध करण्याचेंहि काम आचार्यांच्या लेखनानें केलें आहे. "गीतारहस्या" नंतर "आधुनिक भारत" हाच जावडेकरांचा ग्रंथ सर्वमान्य व विचारदृष्ट्या क्रांतिकारक ठरला असें कै. वामनराव जोशी यांनीं म्हटलें होतें तें यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल! 'मराठीचिये नगरीं' जावडेकरांनीं जो विद्येचा सुकाळ करून सोडला त्याविषयीं कृतज्ञतेचें चिन्ह म्हणून भाषाप्रेमी महाराष्ट्रीयांनीं त्यांना यंदा साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद देऊन त्यांचा गौरव केला आहे. अशा या चिंतनशील लेखकाच्या भाषाशैलींत आढळणाऱ्या सामर्थ्याचें रहस्य शोधणें फार उद्बोधक ठरेल.

भाषाशैली ही लेखकाच्या व्यक्तित्वाचें स्पष्ट प्रतिबिंब असते ही गोष्ट सत्य आहे. या ठिकाणीं व्यक्तित्व याविषयींच्या कल्पना मात्र आपण अचूकपणें समजून घेतल्या पाहिजेत. थोर माणूस हा त्याच्या जीवनांतल्या वरवरच्या बाजूनेंच कित्येकदां जगांत लोकप्रिय झालेला असतो. आणि सामान्य माणसें तीच बाजू म्हणजे त्याचें सर्व व्यक्तित्व असें समजतात. पण थोर माणसाला विशेषतः लेखकाला एक खोल आणि आंतर असें व्यक्तित्व असतें. त्या ठिकाणीं त्याच्या विधायक वृत्ती, त्याचीं स्वप्नें, त्याचीं ध्येयें यांना सारखा आकार येत असतो. हें आंतर व्यक्तित्व म्हणजेच त्या लेखकाची मनोमय वाङ्मयमूर्ति होय. प्रत्यक्ष शब्दांत ती उतरवितांना मुळाबरहुकूम ती उतरावी असा लेखकाचा आटोकाट प्रयत्न असतो. आणि येथेंच कलेचें प्रयोजन असतें. आंतर व्यक्तित्व म्हणजेच खरें कलात्मक व्यक्तित्व. हें जितकें संपन्न असेल तितकी भाषाशैलीहि संपन्न असणार हें उघडच आहे.

या संपन्नतेच्या दृष्टीनें आचार्य जावडेकर हे केव्हांहि उणे पडणार नाहींत. त्यांच्या चिंतनशील स्वभावाप्रमाणें त्यांचें लेखनहि गंभीर निबंधाचें रूप घेऊन प्रकट होतें. वृत्तिप्रमाणें विषयाचाहि परिणाम शैलीवर होतो. "भेदनदीच्या दोन्ही थडीं। आरडती विरहवेडीं। बुद्धिबोध" अशा तऱ्हेनें ब्रह्मविद्येच्या वर्णनांत प्रणयरसाची सूक्ष्ममधुर छटा मिसळणारे ज्ञानेश्वर केव्हांहि अपवादभूत होत. सामान्यतः वृत्ति व विषय याला धरूनच शैलींतली सजावट होते. खाजगी जीवनांत जावडेकर पोषाख व देहसंतर्पण याविषयीं जितके उदासीन आहेत तितकेंच भाषेला नटविण्याच्या बाबतींतहि आहेत. पण तरीहि त्यांच्या शैलींत अव्यवस्था किंवा भोंगळपणा मुळींच नसतो. तर्कवादाच्या आधारावर त्यांचें सारें म्हणणें रचलेलें असतें.

गायनपद्धतीप्रमाणें भाषाशैलीचेंहि घराणें म्हणून असतें. बखलेबुवासारखे तपस्वी गायक दोनतीन गुरूंच्या जवळ राहून कडक तपश्चर्या करतात आणि आपल्या गायनांत या सर्व घराण्यांच्या वैशिष्ट्यांचा बेमालूम संयोग करतात. जावडेकरांच्या भाषाशैलीसंबंधीं हेंच म्हणतां येईल. त्यांनीं सत्याग्रहशास्त्राचा अभ्यास व प्रचार केला आणि म्हणून गांधीजी हे आदर्श म्हणून त्यांना जवळचे असले पाहिजेत.

भाषेच्या आशयाच्या दृष्टीनें हें खरें असलें तरी भाषाशैलीच्या दृष्टीनें जावडेकर हे लोकमान्यांच्या घराण्याचे 'शागिर्द' आहेत. त्यांच्या विचारांची बैठकहि लोकमान्यांसारखी वेदांती आहे. आपल्या विचारांची वाढ भावनोद्रेकानें न होतां चिंतन व चर्चा यायोगें होत असतें असें जावडेकरांनीं आरंभीं उल्लेखिलेल्या त्यांच्या लेखांत स्वतःविषयीं म्हटलें आहे. यांत त्यांच्या शैलीचेंहि रहस्य आपणांस सांपडेल. लोकमान्यांप्रमाणें ते वेदांती आहेत असें मी म्हणतों तें याचमुळें. दैनंदिन राजकारणापासून साहित्य--संस्कृतीपर्यंत सर्व लहानथोर गोष्टींचा विचार उच्च पातळीवरून करण्याची त्यांची वृत्ति असते. आणि म्हणूनच त्यांच्या वाणीला प्रौढत्व आलें आहे. वेदांती माणूस विकारांच्या तावडींत न सांपडण्याचा प्रयत्न करतो. म्हणूनच त्याच्या बुद्धींत प्रसाद येतो व तो भाषेंतहि उतरतो. जावडेकरांच्या भाषेंत सुबोधता पराकाष्ठेची असते, त्याचें रहस्य हेंच होय. मात्र जावडेकरांची भाषाशैली मी लोकमान्यांच्या घराण्याची म्हटली तरी तींत त्या घराण्याचीं कांहीं वैशिष्ट्यें आलेलीं नाहींत. राजकीय प्रतिपक्षावर तुटून पडतांना लोकमान्य जो झुंझार उग्रपणा दाखवीत तो जावडेकरांच्या वृत्तींत नाहीं. पण मी हा दोष मात्र समजत नाहीं. कारण लोकमान्य व जावडेकर यांच्या भूमिकाच तेवढ्यापुरत्या निराळ्या असतात.

जावडेकरांच्या भाषाशैलीचीं वैशिष्ट्यें विशद करावयाचीं झाल्यास त्यांच्या समकालीन असलेल्या कांहीं उत्तम साहित्यिकांशीं त्यांच्या वाङ्मयाची तुलना करणें युक्त होईल. अर्थात् तुलनेसाठीं निवड करतांना सुद्धां कांहीं आंतर साम्य ज्यांच्यांत आहे असेच साहित्यिक निवडले पाहिजेत. गांधीजींच्या उज्ज्वल जीवनदर्शनाची ओळख आपल्या अजोड भाषाशैलीनें पटवून देणाऱ्यांत पूज्य विनोबा भावे अग्रगण्य ठरतील. विनोबांच्या वाणींत 'शब्द थोडे अर्थ फार' अशी जादू आहे, प्रतिभेचा व साक्षात्काराचा संस्पर्श आहे. जावडेकरांच्या भाषेंत तशी प्रतिभा नाहीं, पण प्रज्ञा आहे. काकासाहेब कालेलकर यांची परिश्रमपूर्वक आकर्षक बनविलेली भाषा जावडेकरांच्या पुस्तकांत दिसत नसेल; पण जावडेकरांच्या अनलंकृत शैलींत मांडलेले तर्कशुद्ध विचार अधिक सुबोध वाटतात. आचार्य भागवत यांच्या लेखनांत रवीन्द्रांच्या किरणांची रमणीय प्रभा प्रत्यक्ष उमटलेली किंवा परावर्तित झालेली दिसते, ती शोभा जावडेकरांच्या भाषाशैलींत नाहीं हें खरें. पण भागवतांच्या भाषेंत क्वचित गूढवादामुळें येणारी संदिग्धताहि जावडेकरांच्या शैलींत कुठें आढळून येत नाहीं. सानेगुरुजींची आबालसुबोध भाषा व भाबड्या अंतःकरणाची रसवन्ती जावडेकरवाङ्मयांत नाहीं. पण गुरुजींच्या वाङ्मयांतला ढिसूळपणाहि जावडेकरांच्या लेखनांत आढळणार नाहीं. विनोबा, कालेलकर, भागवत, गुरुजी इ० थोर विचारवंतांच्या शैलींतल्या उणीवा मी केवळ आचार्य जावडेकर यांच्या शैलींतली पोषक द्रव्यें दाखविण्याकरितांच उल्लेखिल्या. एरव्हीं या सर्व वाग्भटांच्या भाषाशैली आपापल्या परीनें अप्रतिमच आहेत, असें माझें मत आहे.

भाषाशैलीविषयीं लिहितांना शेवटीं एकच मुद्दा मला सांगावयाचा आहे. मनुष्याची जीवनविषयक दृष्टि ज्या तऱ्हेची असेल ती तऱ्हा त्याच्या पोषाखांत व बोलण्यांत उतरते. जीवन हें चैनीसाठीं आहे असें मानणाऱ्या माणसाचा पोषाख आणि जीवन हा एक कर्तव्यरूप यज्ञ आहे असें मानणाऱ्या माणसाचा वेष एक कसा असूं शकेल ? भाषाशैलीचेंहि तसेंच आहे. चार पुरुषार्थांपैकीं पहिला व शेवटचा म्हणजे धर्म व मोक्ष हे दोन पुरुषार्थ श्रेष्ठ मानले पाहिजेत असें प्रतिपादन करून आचार्य जावडेकर यांनीं क्रांतिकारक वाङ्मयाची सुंदर व्याख्या केली आहे :

"ध्येयनिष्ठा जागृत करणारें, परिस्थितीवर विजय मिळविण्यास प्रवृत्त करणारें आणि कर्तव्याच्या आनंदापुढें इंद्रिय सुखाचा त्याग करण्यास शिकविणारें जें वाङ्मय तेंच खरें क्रांतिकारक वाङ्मय होय." (पुरोगामी साहित्यसंमेलन, अध्यक्षीय भाषण, १७ ऑगस्ट १९४१)








श्री. दि. के. बेडेकर

# व्यक्तिवादी राष्ट्रवादाचे आचार्य

## श्री. जावडेकरांचें व्यक्तित्व

आचार्य जावडेकर हे सत्याग्रही समाजवादी आहेत, म्हणजेच व्यक्तिवादी व राष्ट्रवादी आहेत. रानडे, टिळक व गांधीजी यांची परंपराच ते चालवीत आहेत. माझ्यासारख्या मार्क्सवाद्याला या व्यक्तिवादाविषयीं काय वाटतें, तें पुढें आचार्यांच्या भूमिकेचें विश्लेषण करतांना मी आणखी स्पष्ट करीनच. परंतु तीव्र तत्त्वविरोध असूनहि माझ्या मनांत त्यांच्याविषयीं आदरभाव आहे. तो अगदीं वस्तुनिष्ठ आहे; कारण भोंवतालच्या परिस्थितीमुळें तो मनांत उत्पन्न होणें साहजिकच आहे.

गेल्या अठरा वर्षांपुरतेच माझे सार्वजनिक अनुभव आहेत. त्यांत साहित्य आणि राजकारण या क्षेत्रांत मला काय दिसलें? तर व्यवहारवाद, ध्येयवादाचा काळाबाजार, पांडित्याचा भंपकपणा व कलेचा बाजारीपणा. परिस्थितीच्या या अनुभवांची पार्श्वभूमि असल्यामुळें श्री. जावडेकर मला असें आढळलें कीं त्यांच्याजवळ साधेपणा आहे पण महंती नाहीं, तत्त्वजिज्ञासा आहे पण पंडिती नाहीं, ध्येयशीलता आहे पण स्तोम व जाहिरात नाहीं. त्यांच्या लिखाणांत मानवधर्माची भावना म्हणजे बहुजनहिताची कळकळ दिसून येते पण उगीच ओलीचिंब भावनाशीलता नाहीं.

थोडक्यांत म्हणजे त्यांच्याजवळ कशाचें 'भांडवल' नाहीं व म्हणूनच कीं काय आज ते वाळींत पडल्यासारखे आहेत. तेंहि एकप्रकारें बरेंच! त्यामुळें व्यक्तिवादी राष्ट्रवादाचें तात्त्विक पातळीवरून चिंतन व प्रवचन करण्याची शांतता त्यांना मिळाली आहे.

## व्यक्तिवादी राष्ट्रवाद

व्यक्तिवादी राष्ट्रवाद हें रानडे, टिळक व गांधीजी यांचें तत्त्वज्ञान होतें. तडजोड, बहिष्कार, पुन्हा तडजोड हा त्यांचा व्यवहारवाद होता. फाळणी, सत्तांतर व कॉमनवेल्थमधील नांदणूक हें त्या राजकारणाचें अटळ फळ आहे.

या व्यक्तिवादाचें आश्रयस्थान व्यक्तिवादी म्हणजे चढाओढ व नफेबाजी यावर आधारलेली भांडवलदारी अर्थव्यवस्था आहे. रूसो व टॉलस्टॉय, मॅझिनी व डी व्हॅलेरा, रिकार्डो व ओवेन, मॅक्डोनाल्ड व टिटो, स्पेन्सर व ड्यूई हे सारे विद्वान् संत व मुत्सद्दी घ्या. व्यक्तिवादाच्या कोंडींतच सारेजण आपापलें जीवितकार्य करीत गेले आहेत. इंग्रजांबरोबर हा व्यक्तिवाद येथें आला; भांडवलदारवर्ग व नवा सुशिक्षित वर्ग निर्माण झाला. इंग्रजी राजवटींतल्या या नव्या वर्गाचें पोषण ज्या वाघिणीच्या दुधावर झालें असें शास्त्रीबोवांनीं म्हटलें आहे त्या दुधाचें नावच व्यक्तिवाद.

त्या दुधाचें आतां हालाहल बनलें आहे. 'आतां समाजवादी नवसंस्कृतीकडे, खऱ्या व्यक्तिविकासवादी समाजधारणेकडे वळा' असें गर्जून सांगणारा मार्क्सवाद शंभर वर्षें ठाण मांडून लढत आहे. पण सोमलांतल्या किड्यांप्रमाणें व्यक्तिवादी तत्त्वज्ञ व व्यवहारज्ञ वागत आहेत. समाजवादाला (म्हणजे मार्क्सवादाला) व्यक्तित्वशून्य गुलामांचें व क्रूर हुकुमशहांचें तत्त्वज्ञान असें नांव देणारे विद्वान्, मुत्सद्दी व राजकारणी पुरुष तर सर्व दूर पसरले आहेतच; व्यक्तिशः मिंधे नसलेले विद्वानहि मार्क्सवादाला विरोध करण्यासाठीं समाजवादालाच राष्ट्रीय,







व्यक्तित्वपूजक, आध्यात्मिक रूपें देऊन नवे विश्वतारक पंथ व तत्त्वज्ञानें काढीत आहेत. या विशेषणांनींच स्पष्ट दिसत आहे कीं हे सारे नवोदित 'समाजवाद' म्हणजे व्यक्तिवादाचाच प्रपंच आहेत. विषाच्या कुपीवरील बालामृताचीं लेबलें आहेत!

**क्रांतिकालीन तत्त्वच्छल**

'सत्याग्रही' या विशेषणानें म्हणजे साधनशुद्धतेच्या आग्रहानें, विशिष्ट रूप धारण करणारा श्री. जावडेकरांचा समाजवाद हा समाजवादच नाहीं, उलट व्यक्तिवादी राष्ट्रवाद आहे, ही माझी भूमिका पुढें विशद करण्याच्या आधीं एक सर्वसाधारण अनुभव सांगतो. शब्द एक व अर्थ दुसराच लादलेला असें करणारास शब्दच्छल करणारा म्हणतात तसें 'समाजवाद' या शब्दांत व्यक्तिवाद सांठविणारे श्री. जावडेकर तत्त्वच्छल करणारे आहेत, असें म्हणावयाचें काय?

हाच प्रश्न इतर बहुतेक समाजवादी विद्वानांच्या बाबतींत विचारला तर उत्तर असेंच द्यावें लागेल कीं त्यांचा 'समाजवाद' हा दांभिक तत्त्वच्छल आहे व भांडवलदारी समाजव्यवस्था टिकविण्यासाठीं जनतेला फसविण्याच्या उद्देशानें पांघरलेला मुखवटा आहे. पण श्री. जावडेकरांच्या व्यक्तिगत चारित्र्यामुळें त्यांच्या सत्याग्रही समाजवादांत तत्त्वच्छल आहेच; पण तो खुद्द त्यांच्या मनांतल्या द्वंद्वामुळें उद्भवलेला आहे, असें मला वाटतें. सामाजिक परिणामाच्या दृष्टीनें श्री. जावडेकरांच्या हातून होणारा हा तत्त्वच्छल तितकाच घातुक व जनतेची वंचना करणारा आहे; पण त्यांच्यासारख्यांच्याहि हातून अशी वंचना घडणें या निकराच्या संग्रामांत, क्रांतिकाळांत अटळ आहे.

एकीकडे जुन्या व्यवस्थेचा, श्रद्धांचा व श्रेयांचा आश्रय करून सत्ताधारी वर्ग क्रूर बनलेला असतो व दुसरीकडे जनतेच्या नव्या क्रांतिकारक लढ्याचा व ध्येयाचा अरुणोदय होत असतो. या संक्रमणाच्या क्षणीं मध्यस्थ वर्गाचें व व्यक्तींचें तत्त्वज्ञान भ्रामक, दुरंगी, तत्त्वच्छलावर आधारलेलें, साध्याऐवजीं साधनांचा व उपकरणांचा खल करणारें, संशयाच्या व निराशेच्या अध्यात्मांत थिजलेलें असें बनतें. मावळत्या तत्त्वज्ञानावरहि उगवत्या क्रांतिकारक ध्येयांचा रंग प्रतिबिंबित होतो; पण तो नुसता रंगच असतो. चौकट जुनीच असते. मध्यमवर्गीय तत्त्वज्ञानाचें हें ढोबळ पण अटळ स्वरूप आहे. सहेतुक दंभ व प्रामाणिक गोंधळ यांची गल्लत या ढोबळ चौकटींत होण्याचा धोका असतो म्हणून अगदी काटेकोरपणें व्यक्तित्वाचा शोध घेणें भाग पडतें. याच दृष्टीनें मी श्री. जावडेकरांच्या विषयींचा माझा आदर व्यक्त करून वरील सर्व खुलासाहि देत आहे.

**टिळकयुगीन व्यक्तिवाद**

श्री. जावडेकर हे महाराष्ट्रीय गांधीवादी आहेत, म्हणजे त्यांच्या व्यक्तिवादांत टिळकयुगीन श्रद्धांना अढळ स्थान आहे. टिळकयुगीन व्यक्तिवाद व श्रद्धा म्हणजे काय? याचें उत्तर रानडे, टिळक, राजवाडे प्रभृति पुढाऱ्यांच्या व्यवहारांत व राजकारणांत सांपडतें; पण साररूपानें 'गीतारहस्य' या ग्रंथांत सांपडते. तो ग्रंथ म्हणजे आधुनिक महाराष्ट्रीय मध्यमवर्गाचा वेद बनला आहे.

गीतारहस्यामध्यें टिळकयुगीन व्यक्तिवादाची दुहेरी घडण स्पष्ट होते; एकीकडे, स्पर्धेसाठीं निर्बंध व्यक्तिस्वातंत्र्य, वैयक्तिक व राष्ट्रीय अभ्युदयासाठीं दुर्दम्य आकांक्षा या कल्पनांची म्हणजेच युरोपीय व्यक्तिवाद व राष्ट्रवाद यांची ठळक छाप या ग्रंथांतील प्रवचनावर आहे. संन्यासाचा निषेध व प्रवृत्तिपर कर्मयोगाचें मंडन या अनुरोधानें व प्रेरणेनेंच झालेलें आहे. पण, दुसरीकडे हा सारा प्रवृत्तिमार्ग, लोकसंग्रह व कर्मयोग मोक्ष, स्थितप्रज्ञता व निष्कामता यांच्या अध्यात्माखालीं दडपलेला आहे.

इंग्रजांनीं भांडवलदारीचीं बीजें येथें रोंवलीं खरी पण त्यांच्या अंकुरांवर मध्ययुगीन भारतीय अवशेषांची सावट केली. सुशिक्षितांना मिल्‌—स्पेन्सरांचें तत्त्वज्ञान पुसटतें लाभलें. त्या अर्धवट संस्कारानें भूक जागी झाली. पण खाद्य मिळालें तें मध्ययुगीन व प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अभिनिवेशाचें! इंग्रजांनीं आणलेल्या व्यक्तिवादाविषयीं, विज्ञानाविषयीं, भांडवलदारीविषयीं, पार्लमेंटांविषयीं अनुकरणाची व हीनगंडाची चोरटी भावना प्रबळ होती. म्हणूनच राष्ट्रीय अहंकारानें एका कपोलकल्पित रम्य भूतकाळाची निर्मिति टिळकयुगीन सुशिक्षितां-








नीं केली. व्यक्तिवादी सुखवादाचा व्यवहार व त्याच सुखवादाविरुद्ध अद्वैताचें व अध्यात्माचें अवडंबर असा दुहेरी प्रकार त्यावेळीं झाला.

## एकाकी आगरकर

या दुहेरी घडणीच्या गीतारहस्य–प्रणीत व्यक्तिवादाला विरोध करणारी एकच मोठी व्यक्ति म्हणजे आगरकर. त्यांनीं इंग्रजी राज्याला व लुटारू नीतिशास्त्राला उघड विरोध केलाच पण तो हीनगंडाला बळी न पडतां; आणि म्हणूनच युरोपीय व्यक्तिवादाचें रूसोप्रणीत श्रेष्ठ स्वरूप त्यांना दिसूं शकलें व त्याचा पुरस्कारहि त्यांनीं केला. आगरकरांचा हा बुद्धिवादी व्यक्तिवाद महाराष्ट्रांत रुजता तर...! पण कुवंशाच इतकी थोर होती कीं आगरकरांप्रमाणें त्यांच्या तत्त्वज्ञानालाहि 'जिवंतपणीं तिरडीवरून मिरविण्याचें' भाग्य लाभलें! आगरकरांची सरस्वती वाळूंत गडप झाली असें श्री. जावडेकरांनीं म्हटलें आहे तेंच खरें. महाराष्ट्रांत व नंतर साऱ्या भारतांतहि विजयी ठरला तो रानडे–टिळकप्रभृतींचा 'भारतीय' वळणाचा व्यक्तिवाद.

या भारतीय व्यक्तिवादाचें वैशिष्ट्य 'गीतारहस्या'वरून स्पष्ट होतें. गीताप्रणीत निष्काम कर्मयोग हें चातुर्वर्ण्यसिद्ध भारतीय समाजाचें नीतिशास्त्र आहे. म्हणजेच राजा, पिता, ज्येष्ठ भ्राता, पति, स्वामी यांच्या निरंकुश श्रेष्ठत्वाचें व शंबूक, राम, लक्ष्मण, पन्नादाई यांच्या अगतिक आज्ञापालनाचें तें शास्त्र आहे. प्रत्येकाला कर्म करण्याचा उपदेश पण तें प्राप्त कर्मच करण्याचा आदेश त्यांत आहे. 'प्रवृत्ति' आहे पण ती स्वतंत्र नसून 'आध्यात्मिक' आहे. गांधीजींची 'ट्रस्टीशिप'ची व रामराज्याची कल्पना, जावडेकरांच्या राज्यनीतिशास्त्रांतला महाजनसत्तावाद ह्या साऱ्या 'भारतीय' कल्पना या टिळकयुगीन व्यक्तिवादांत, श्रेष्ठिवादांत उगम पावलेल्या आहेत.

श्री. जावडेकरांच्या लिखाणांत व एकंदर तत्त्वज्ञानाच्या घडणींत टिळकयुगीन श्रेष्ठिवादाची, 'सामुराई' वळणाच्या समाजशास्त्राची, मोठीच भर आहे. एकतर सरळ टिळकयुगीन विचारांतूनच त्यांनीं ह्या कल्पना घेतल्या आहेत. दुसरें असें कीं गांधीजींच्या समाजशास्त्रांत हाच श्रेष्ठिवाद आहे. टिळक व गांधीजी यांच्या मार्गांतील हिंसा-अहिंसेचें द्वैत मूलभूत नाहीं, दोघांचें नीतिशास्त्र एकच आहे आणि दोघांचा बहिष्कारयोग एकच आहे हें सिद्ध करण्यासाठीं जावडेकरांनीं बरेच परिश्रम घेतले आहेत. टिळक व गांधीजी यांच्या व्यक्तिवादांचें 'भारतीय' म्हणजे श्रेष्ठिवादी स्वरूप कसें एकच आहे, हें पाहिलें म्हणजे या दोघांच्या तत्त्वज्ञानांची व व्यवहारांचीही एकरूपता नीट मूलभूत रीतीनें कळते, असें मला वाटतें.

## गांधीजींचा व्यक्तिवाद

श्री. जावडेकरांच्या लिखाणांत गीताप्रणीत श्रेष्ठिवाद व युरोपीय व्यक्तिवाद व बुद्धिवाद यांचा जो समन्वय सारखा आढळतो तो टिळकयुगीन आहे. हें पाहिल्यावर त्यांच्या तत्त्वज्ञानांतील मुख्य व स्थायी भूमिकेकडे वळूं. ती भूमिका गांधीवादाची आहे. गांधीवाद हा देखील व्यक्तिवादच व परंपरेनें तो टिळकयुगीन व्यक्तिवादाचेंच पुढील सूत्र आहे. अर्थात् गांधीवादांत श्रेष्ठिवाद आहे व गीताप्रणीत अनासक्तियोग, कर्मयोग, आध्यात्मिक नीतिशास्त्र वगैरे सर्व आहे. पण टिळकयुगापेक्षां त्यांत नवें काय आहे तेवढेंच पाहणें येथें जरूर आहे.

रूसो व मिल-स्पेन्सर यांच्याकडे वळून ज्याप्रमाणें टिळकयुगीन व्यक्तिवादाची प्रेरणा आपण पाहिली त्याप्रमाणें गांधीवादाच्या प्रेरणेसाठींहि आपल्याला युरोपीय विचारसंक्रमणाकडे वळावें लागेल. टॉलस्टॉय, इमर्सनप्रभृतींना गांधीजी गुरु मानीत याचा अर्थ काय? तो अर्थ असा सांगतां येईल :

सन १८५० पासून १९०५ पर्यंतच्या कालखंडांत युरोपची भांडवलदारी व तिचा व्यक्तिवाद विकासाच्या अवस्थेंतून विनाशाच्या वाटेपर्यंत चालत आला. कम्युनिस्ट जाहिरनाम्यापासून पहिल्या १९०५ च्या रशियन क्रांतीपर्यंतच्या या काळांत दोन गोष्टी ठळकपणें दिसूं लागल्या : एक कामगारवर्गाच्या नेतृत्वाखालीं आमूलाग्र समाजक्रांति होण्याची अपरिहार्यता व दुसरी गोष्ट भांडवलदारी समाजाची नीतिभ्रष्टता, आर्थिक बोजवारा, क्रूर लष्करशाहींत परिणति. या दोन गोष्टींचा जबरदस्त प्रहार मध्यमवर्गीय व भांडवलदारी व्यक्तिवाद्यांवर होत होता.








परिणाम असा झाला कीं भांडवलदारींतले दोष टाळण्यासाठीं सुधारणा, व आमूलाग्र क्रांति टाळण्यासाठीं क्रांतिकारक मार्क्सवादाचा निषेध व तिरस्कार— यांच्या समन्वयाचें भांडवलदारी, व्यक्तिवादी तत्त्वज्ञान युरोपभर पसरूं लागलें. गांधीजींचें युरोपीय गुरु या सुधारणावादी व क्रांतिविरोधी तत्त्वज्ञानाचे आचार्य होते. क्रांतिविरोधासाठीं अहिंसा या साधनशुद्धीच्या आग्रहाचा मुख्य प्रणेता म्हणजे टॉलस्टाय. झारची क्रूर दडपशाही व हिंसा चालूं असतांना टॉलस्टायनें रशियन शेतकऱ्याला सांगितलें कीं, 'तूं प्रतिकारार्थ हिंसाहि करूं नको'! मग क्रांतिकार्यांत अपरिहार्य असा सशस्त्र उठाव जनतेनें करावा असें सांगणें दूरच राहिलें !

सारांश, टिळकयुगांतील व्यक्तिवाद्यांना अपरिचित असलेला सुधारणावादी,क्रांतिविरोधी असा हा युरोपीय व्यक्तिवादी विचारप्रवाह गांधीजींच्या जीवनाला येऊन मिळाला. या व्यक्तिवादी विचाराला युरोपांत 'समाजवाद' हें नांव घेऊनच मार्क्सवादीशीं सामना द्यावा लागत होता. ब्रिटिश 'मजूर' पक्षाचा 'समाजवाद' म्हणजे हेंच क्रांतिविरोधी व्यक्तिवादी तत्त्वज्ञान आहे. याच सर्व मतांचा संस्कार गांधीजींच्या मनावर झाला व सन १९२० नंतरच्या राष्ट्रीय आंदोलनांत त्या सर्व संस्कारांचा व अंकुरांचा परिपाक झालेला आपल्याला आढळून येईल.

युरोपीय राष्ट्रांतील 'समाजवादी' म्हणजे साम्राज्यवादी प्रथेला व भांडवलदारी राष्ट्रवादालाच उचलून धरणारे व्यक्तिवादी आहेत व खरे कामगारवर्गीय समाजक्रांतिवादी हे मार्क्सवादीच आहेत, हें युरोपच्या गेल्या शतकांतल्या इतिहासांत दिसून आलें आहे. युरोपांतल्या या मार्क्सवाद्यांशीं संबंध येण्याऐवजीं तेथल्या समाजवाद्यांशीं भारतीय राष्ट्रवाद्यांचा संबंध जुळून आला याचें कारणहि आतां उघड आहे. दोघांची प्रकृति जमणें अटळ होतें व आजहि ब्रिटिश मजुरपक्षाचा आदर्श येथील समाजवाद्यांपुढें आहे, यांत नवल नाहीं. गांधीजींना देखील टॉलस्टॉयप्रभृति क्रांतिविरोधी अध्यात्मवादी लोक जवळचे वाटले. कारण येथील राष्ट्रवादाची व व्यक्तिवादाची अशीच टिळकयुगीन भूमिका गांधीजींच्या मनांत परंपरेनें तयारच होती. श्रेष्ठिवाद व क्रांतिविरोधी व्यक्तिवाद त्या भूमिकेंत पुरेपूरच होता व तोच टॉलस्टायच्या तत्त्वज्ञानांत होता. म्हणून संगम झाला.

## गांधीवादाची भूमिका

श्री. जावडेकर यांच्या विचारांचा विस्तार मोठा आहे, पण त्याची भूमिका गांधीवाद हीच आहे आणि मध्यबिंदु व्यक्तिवादच आहे. म्हणून, येथवर मांडलेल्या विवेचनाचा प्रथम गोषवारा घेऊन श्री. जावडेकरांच्या राज्ययंत्रासंबंधींच्या सिद्धान्ताकडे मग वळूं. गांधीवादाचे, व पर्यायानें श्री. जावडेकरांच्या भूमिकेचे मुख्य तीन घटक सांगता येतील.

(१) श्रेष्ठिवाद : भारतीय समाजव्यवस्थेला शतकानुशतकें आधारभूत असलेला गीताप्रणीत कर्मयोग, (म्हणजेच व्यक्तिस्वातंत्र्य व समता यांना विरोधी असा 'अनासक्त' आज्ञापालनाचा धर्म), टिळक, रानडे, अरविंदबाबू यांच्या परंपरेंतून गांधीवादांत आला होता.

(२) व्यक्तिवाद : उदयोन्मुख भांडवलदार व मध्यमवर्गाला हाच व्यक्तिवाद हवा होता. गांधीवादामध्यें सदसद्विवेकबुद्धि व विवेकवाद यांना महत्त्व असून संपत्तीच्या वैयक्तिक मालकीवर पूर्ण श्रद्धा सांगितली आहे. ह्या श्रद्धा युरोपीय व्यक्तिवादांतून घेतल्या आहेत.

(३) क्रांतिविरोधी 'समाजवाद' : ह्या तिसऱ्या घटकांत टॉलस्टायप्रभृति क्रांतिविरोधी मानवधर्मवाद्यांची परंपरा आहे व ब्रिटनमधील मजूरपक्षीयांच्या क्रांतिविरोधी, राष्ट्रवादी 'समाजवादा'चें शिष्यत्व आहे.

सनातनी, व्यक्तिवादी व 'समाजवादी' अशा या तिरंगी भेसळीनें गांधीवादाची घडण झाली आहे. जुन्या नव्या युगधर्माचा हा संकर अटळच होता. टिळक, गोखले व टॉलस्टॉय हे तिघे गांधीजींचे गुरु आहेत, तेहि याच अर्थानें आहेत. वर्णाश्रमाचें तत्त्व व रामराज्य यांना गौरविणारा 'सामुराई' वळणाचा राष्ट्रवाद, सत्याग्रही प्रतिकाराचा व्यक्तिप्रधान मार्ग प्रभावी करणारा राष्ट्रवाद व साधनशुद्धतेचा खल करून समाजक्रांति टाळूं पाहणारा राष्ट्रवाद, हे भारतीय राष्ट्रवादाचे तीन पैलू आहेत व ते गांधीवादांतच सामावणारे आहेत. आज पटेल, नेहरू व











विनोबा भावे या तिघांच्या व्यक्तित्वांत व कार्यांत या गांधीवादाचा म्हणजे वरील तीन प्रवृत्तींचा, आविष्कार होत आहे.

याच तीन प्रवृत्तींच्या त्रिकोणांत श्री. जावडेकरांचें तत्त्वज्ञान सामावत आहे व याच अंकुराचें पोषण व वाढ करण्यासाठीं त्यांच्या विचारांचा प्रपंच आहे.

## बहिष्कार व सत्तांतर

श्री. जावडेकरांच्या तत्त्वज्ञानाची गुरुपरंपरा येथवर सांगितली. त्या तत्त्वज्ञानाच्या रसायनांत गीता-मनुस्मृती, मिल्ल-स्पेन्सर, ओवेन-टॉलस्टॉय आणि टिळक-गांधीजी यांच्या तत्त्वगुटिकांचे वळसे आहेत एवढें सांगून त्यांच्या आजच्या राजकीय घोषणांचा अर्थ लागतो काय ?

या कसोटीसाठीं त्यांची आजची मुख्य घोषणाच घेऊं. आपण चीनची वाट चालूं लागलों नाहीं, कारण नेहरू हे चँग-कै-शेक नाहींत असें समाजवादी नरेंद्रदेव म्हणाले खरें; पण श्री. जावडेकरांना वाटतें कीं हा आशावाद सोडून आतांच सत्तांतराची घाई केली पाहिजे; इंग्रज गेले व नेहरूसरकार आलें; पण जनतेचे प्रश्न कायम राहिले, यांत धोका आहे व सशस्त्र क्रांति किंवा अराजक माजण्याची शक्यता आहे. म्हणून नेहरूंनीं जयप्रकाशांना सत्ता द्यावी, अशी श्री. जावडेकरांची आजची घोषणा आहे. या एका मागणींत सारें आलें. कारण आज महाप्रश्न सत्तेचाच आहे !

श्री. जावडेकरांच्या या घोषणेंत काय काय आहे पहा ! जनतेनें सशस्त्र ( किंवा निःशस्त्रहि ! ) क्रांति आज न करतांच सत्तांतर होईल अशी आशा त्यांना आहे. या आशेच्या बुडाशीं काय आहे ? तर एक-दोघांच्या किंवा हजारोंच्या आळवणीमुळें नेहरूंच्या मनांत बदल झाला कीं ते आपला मुकुट दुसऱ्याच्या डोक्यावर ठेवतील, हा विश्वास आहे. पण, नुसती आशा व विश्वास यांवरच श्री. जावडेकरांची भिस्त नाहीं; तर हें सत्तांतर न घडल्यास सत्याग्रह, संप, करबंदी हें सारें घडेल अशी सूचना सत्ताधाऱ्यांना त्यांनीं दिली आहे. 'सार्वत्रिक संप व सत्याग्रह अशा शांततेच्या मार्गांनीं ' देशांतील शेतकरी व कामकरी जनतेला मार्गदर्शन करण्याचें कर्तव्य आज गांधी-वाद्यांनीं पार पाडलें पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. (' गांधीवादाचें भवितव्य,' मार्च १९४९, नवभारत पान ४८३). या साऱ्या घोषणेची टिळकांच्या व गांधीजींच्या सत्तासंपादनविषयक राजकारणाशीं एक-रूपता आहे. टिळकांच्या काळांत याला 'बहिष्कार' हें नांव होतें, गांधीजींच्या काळांत त्याला 'सत्याग्रह' हें नांव मिळालें. श्री. जावडेकरांच्या परिभाषेंत ' सत्तांतर ' हें नांव येईल; पण नांवांत फरक पड-ल्यानें एकरूपता जात नाहीं. बहिष्काराच्या परंपरें-तल्या या सत्तांतराच्या कल्पनेची राज्यनीतिशास्त्राच्या दृष्टीनें छाननी करणें जरूर आहे.

## राज्ययंत्राचा व्यक्तिवादी सिद्धान्त

बहिष्कार, सत्याग्रह किंवा सत्तांतर या सर्वांचा अर्थ एकच व सर्वांच्या बुडाशीं रूसोची राज्य-यंत्राबद्दलची कल्पना आहे ती अशी : स्वार्थ व स्पर्धा यांनीं प्रेरित अशा व्यक्तींचा समाज बनतो. स्पर्धे-मध्यें दुर्बळांना सबळांनीं गिळावें हें चालणारच. पण ही स्पर्धा सुयंत्र चालावी म्हणून सर्व व्यक्तींनीं सर्वसंमतीनें एक पार्लमेंटरी राज्ययंत्र बनविलें पाहिजे. या राज्ययंत्राचा ताबा कोणाकडे ? तर बाजारपेठ ज्याप्रमाणें खुल्या स्पर्धेंत तेजीवाले किंवा मंदीवाले जिंकतात त्याप्रमाणें निवडणुकांच्या खुल्या आखा-ड्यांत हुजूर, मजूर किंवा अशा अनेक पक्षांनीं उतरावें. विजयी पक्षांचे उमेदवार हे लोकसंमतीनें शासक बनतील, उद्या सत्ताभ्रष्ट होतील. सर्व उला-ढाल लोकसंमतीनें होत राहील.

या रूसोप्रणीत सिद्धान्तांचा पगडा युरोपभर होता व आपल्या राष्ट्रवादी पुढाऱ्यांवर व समाजावर आहेच. याच सिद्धान्ताच्या आधारानें सत्तांतराची मागणी उद्भवते. पण तो सिद्धान्तच तसा भ्रामक आहे.

रूसोच्या सिद्धान्तांत तीन असत्य अशा गोष्टी गृहीत धरलेल्या आहेतः ( १ ) राज्ययंत्र वर्गनिर-पेक्ष असतें, ( २ ) तें व्यक्तिप्रधान असतें व ( ३ ) तें लोकसंमतीवर आधिष्ठित असतें. वस्तुस्थिति काय असते ? तर राज्ययंत्र ही कांहीं आकस्मिक घडलेली गोष्ट नव्हे. तिला इतिहासक्रमांत आकार येतो, साहजिकच ज्या काळांत जो वर्ग समाजांत मालक असतो तोच राज्ययंत्राचा सूत्रधार असतो. यंत्र-








विशारदाप्रमाणें सरकारी गाडा चालविणाऱ्या व्यक्ती असतात, पण त्यांच्या हातीं मूळ सूत्रें व कळी नसतात. लोकसंमतीचेंहि तसेंच आहे. मालकवर्ग हा सूत्रधार असल्यामुळें त्या यंत्राचा स्वार्थासाठींच वापर करतो. अशा वेळीं पिळणुकीनें जर्जर झालेला बहुजनसमाज आंधळेपणानें थंड गोळ्याप्रमाणें पडून असेल किंवा संगिनीखालीं वांकून शंभर टक्के मतें हिटलरला देईल; पण त्याला लोकसंमति म्हणतां येणार नाहीं. इंग्लंडचे साक्षर मजूर मतें देतात ती लोकसंमतिच नव्हे कां? ती-देखील खरी संमति नव्हे. कारण पिळणुकीचें सत्य कळल्यावर मालकशाहीची राज्यसत्ता मजूर-वर्ग ठेवील हेंच संभवत नाहीं. मग संमतीचा भास निर्माण होतो व निवडणुका होतात त्यांचें काय? त्या भासाचें कारण असें कीं मॅक्डोनाल्ड, बेव्हिन-प्रभृति 'समाजवादीच' मजूर-वर्गाच्या मनांत रूसोचा व्यक्तिवादी सिद्धान्त व निवडणुकांवरील भ्रामक विश्वास कायम ठेवण्यास कारणीभूत आहेत, व मजूर अजून आंधळे आहेत.

ब्रिटिश मजूर पक्षाचे आचार्य प्रा. लास्की यांच्या अलीकडच्या राजनीतिविषयक ग्रंथांत रूसोच्या सिद्धान्ताचा फोलपणा दाखवून मीं मांडलेल्या मार्क्स-वादी मताचा स्वीकार केला आहे. पण हा स्वीकार पुस्तकांत राहतो व पुन्हा मजूरपक्षीय समाजवादाचें राजकारण ते करीत बसतात. श्री. जावडेकरांचें देखील या बाबतींत असें होण्याचाच संभव जास्त आहे. कारण केवळ्या मोठ्या चिवट परंपरेंतून रूसोचा तो लोकशाहीचा सिद्धान्त उतरत आला आहे! या घटकेला मात्र ते अनेकपक्षीय निवड-णुकांच्या ब्रिटिश लोकशाहीच्या या सिद्धान्तांतच गुरफटून आहेत. (वरील लेख, पान ४८१ पहा.)

## सत्तांतर कसें संभवतें?

एकदां, रूसोचा व्यक्तिवादी सिद्धान्त मानला कीं मग आपोआपच येतें कीं सत्ताधारी व्यक्तींनीं खुषीनें सत्ता सोडावी व लोकविश्वासपात्र माणसाला सिंहासनावर बसवावें! वर्गांच्या स्वार्थाचा, मालकी हक्कांची उलटापालट होण्याचा प्रश्न या व्यक्ति-वाद्यांना भेडसावीत नाहीं! नेहरू-पटेलांचें 'सरकार' म्हणजे कांहीं व्यक्ती ह्या काळाबाजार थांबवूं शकत नाहींत तर त्यांनीं जयप्रकाशांना राजदंड द्यावा; ते काळाबाजार नामशेष करतील, असा श्री. जावडे-करांचा हा आशावाद आहे. पण काळाबाजार-वाल्याचें या बाबतींत कांहीं मत, धोरण व रणनीति आहे, इतकेंच नव्हे तर नोकरशाही, लष्कर, पोलिस, उत्पादन, बाजारपेठ, शिक्षण, सिनेमा, छापखाने, कंपॉझिटर, संपादक वगैरे सारा प्रपंचच काळा-बाजारवाल्यांच्या हातीं आहे, त्याचें काय!

रूसोची दुसरी कल्पना लोकसंमतीची! अमुक व्यक्ति राजदंड पेलीत आहेत हें आम्हाला मान्य आहे असें जनता म्हणते तोंवर राज्ययंत्र टिकें; मान्य नाहीं म्हटलें, बहिष्कार टाकला, सत्याग्रह केला, संप केला तर राज्ययंत्रच काय पण भांडव-लदारी कोसळते, असा अपसिद्धांत या रूसोच्या कल्पनेंतून निघतो. आपल्या दहशतवादानें एकदम लोकांतहि अराजक निर्माण होईल व ब्रिटिश राज्य-यंत्र कोलमडून पडेल असें दहशतवाद्यांना वाटे. सत्याग्रहानें लोकांत बहिष्काराची भावना निर्माण होऊन राज्ययंत्र कोसळेल असें गांधीवाद्यांना वाटे. दोन्ही व्यक्तिवादी भ्रम होते व आहेत. मूलभूत दृष्टीनें गांधीवाद व दहशतवाद एकरूपच आहेत!

राज्ययंत्राबद्दल खरी भूमिका ही हवी कीं समाज-क्रांति करणारा वर्ग रूढ राज्ययंत्राचीं सर्व अंगो-पांगें व सर्व शक्ती आपल्या प्रतिसंघटनेच्या बळावर मोडून टाकतो, मालकवर्गाचें मालकी हक्क नाहिसे करतो व अगदीं नवें वर्गीय राज्ययंत्र बनवितो. फ्रेंच व सोव्हिएट क्रांती अशा झाल्या म्हणून त्यांना मानवी समाजविकासाचे दोन टप्पे मानणें भाग पडतें.

मार्क्सवादाच्या दृष्टीनें ब्रिटिश निवडणुका, जपानी दहशतवाद व आयरिश बहिष्कार ह्या तीनहि मार्गांचा क्रांतिकारक लढ्यांतल्या वर्गीय सत्तासंपादनाच्या दृष्टीनें काडीमात्र उपयोग नाहीं. राज्ययंत्र हें जर व्यक्तिप्रधान नाहींच तर दहशत-वादानें किंवा अराजक माजवून काय होणार? दुसरीकडे, कायदेभंग किंवा तुरुंगभरतीहि निष्फळच ठरणार. तेव्हां कामगार वर्गाला व इतर जनतेला अखेरच्या क्रांतिकारक उठावासाठीं संघटित करणें एवढेंच मार्क्सवाद्याचें ध्येय उरतें व असतें.








# व्यक्तिवादी राष्ट्रवादाचे आचार्य

## साध्यसाधनांची फारकत

श्री. जावडेकरांची सत्तांतराची आजची मुख्य घोषणा रूसोप्रणीत सिद्धान्तावर कशी आधारलेली आहे तें आपण पाहिलें. पण रूसोच्या काळचा व्यक्तिवाद, म्हणजे उगवत्या भांडवलदारीचें तत्त्वज्ञान, व श्री. जावडेकरप्रभृति आधुनिकांचा व्यक्तिवाद यांत एक मोठा फरक आहे, तो कोणचा ? तर, मार्क्सच्या आधीच्या काळांतील व्यक्तिवाद्यांना व मानवधर्मवाद्यांना व्यक्तिवादाचें तत्त्वज्ञान तरी निःशंक, मूलगामी व अंतिम श्रेय म्हणून पटलेलें होतें. उलट या आजच्या व्यक्तिवाद्यांचा स्वतःच्या तत्त्वज्ञानावरचा विश्वासच डळमळीत आहे व श्रेयांच्या बाबतींत तर मार्क्सवादी आदर्शांचें विरोधी व श्रेष्ठतर श्रेय त्यांना दिसत आहे.

व्यक्तिवादी असून तें श्रेय अपुरें वाटतें व मार्क्स-वादी श्रेय तर कळून घेण्याचें व स्वीकारण्याचें पिंडाला मानवत नाहीं, अशा आड-विहीरींत पडलेले आधुनिक व्यक्तिवादी एका नव्या भ्रमाचा आश्रय करतात. ' मूलभूत सिद्धान्त व अंतिम श्रेय कोणी तपासीत बसेल तो बसो, आम्ही ह्या भानगडींत न पडतां फक्त साधनांचा व तपशिलाचाच विचार करणार. साधनें शुद्ध असावींत, बाकी साध्य व्यक्तिवादाचें कीं मार्क्सवादाचें तें गौण आहे ', अशी विचारसरणी आधुनिक व्यक्तिवादानें तत्त्वज्ञान म्हणून स्वीकारली आहे. तत्त्वाचा तिरस्कार व तपशीलाचें स्तोम, साध्यावरून साधनाकडे घसरलेलें लक्ष व एकंदरींतच मूलगामी विचाराऐवजीं बाह्यो-पचारिकतेकडे कल ह्या आधुनिक व्यक्तिवादी तत्त्व-ज्ञानाच्या आणि इतरहि व्यवहाराच्या खाणाखुणा झाल्या आहेत. यालाच तत्त्वज्ञानाच्या परिभाषेंत व्यवहारसत्तावाद ( प्रॅग्मॅटिझम् ) असें मोठें भारदस्त नांव आहे !

या व्यवहारवादाची पकड आपल्या टिळकयुगीन, गांधीयुगीन व अद्यतन् विचारांवर आहे. एकीकडे, फॅसिझमच्याच थेट वळणाचा, नुसत्या शिस्तबाजी-वर, क्रियाशीलतेच्या स्तोमावर व पाशवी बलोपासने-वर पोसलेला आणि तत्त्वनिष्ठेच्या अभावीं धर्म-भावनेची ढाल घेणारा राष्ट्रवाद महाराष्ट्रांत व इतरत्रहि पसरत आहे; दुसरीकडे, कताई, सफाई, सेवा या गांधीवादी आचारधर्मांत साध्य व साधन यांची फारकत होत आहे व नुसता साधनशुद्धतेवर सारा भर दिला जात आहे. दोन्ही नुसते क्रियाप्रधान व्यवहारवादच आहेत.

श्री. जावडेकरांचें तेंच आहे. साध्य व साधन यांची फारकत त्यांनीं मानली आहे व तीं एकदां मानली कीं फक्त साधनांचा विचार व तत्त्वभ्रष्टता पदरीं येणारच. साधनांचा विचार व चिकित्सा फक्त एकाच तऱ्हेनें होणें शक्य आहे. अमुक साध्य आहे तर तें साधण्याचा जो उपाय व विधि तें त्या साध्याचें साधन. विस्तव हें घरांना आग लावण्याचें किंवा स्वयंपाकाचें साधन होऊं शकतें, यावरून साधन म्हणून एकाद्या वस्तूचाच काहींतरी गौरव किंवा तिरस्कार करणें अशक्य आहे, हें उघड आहे. मुख्य दृष्टि साध्यावर पाहिजे व कोणत्याहि मूलगामी तत्त्वज्ञानांत हेंच असतें. पण संक्रमणाच्या काळांत असें होतें कीं प्रतिगामी वर्ग आपलें आसन टिक-विण्यासाठीं हातीं येतील तीं साधनें क्रूरपणें वापरतो आणि क्रांतिकारक वर्गाहि या क्रूरतेचा प्रतिकार शक्य त्या प्रभावी व कठोर साधनांनीं करतो. साधनशुद्धतेची शंकाकुल वृत्ति लढणाऱ्या दोन्ही वर्गांची नसते. पण जुन्याशीं जखडलेले व नव्याकडे नुसतें पाहणारे मध्यस्थ लोक साधनशुद्धतेचा खल करतात. कारण त्यांच्यापुढें स्पष्ट साध्यच उरलेलें नसतें. या खलांतून निष्पन्न एकच होतें कीं क्रांति-कारक वर्गाला हिंसक, घातपाती, देशद्रोही, गुंड वगैरे विशेषणें लावण्याची सोय करून देण्याचें पाप साधनशुद्धतेच्या उपासकांकडून घडतें. या सोयींचा फायदा प्रतिगामी वर्ग, त्यांचे सत्ताधारी, प्रचारक व मुत्सद्दी यांनीं न घेतला तरच नवल !

## निष्कर्ष व अपेक्षा

सत्तांतर व साधनशुद्धता या दोनच गोष्टी घेऊन श्री. जावडेकरांच्या विचारांचें मी परीक्षण येथवर केलें. इतर विचारांच्या व श्रेयांच्या बाबतींत खल करणें या लेखमर्यादेंत शक्य नाहीं. देशांत तीव्र यादवी चालू असून त्या यादवींतच जावडेकरांच्या गांधीवादाचें भवितव्य ठरावयाचें आहे व मार्क्स-वादाचेंहि.

( पुढील मजकूर पान ६८७ वर पहा )








श्री. प्रभाकर पाध्ये

# आचार्य जावडेकरांची लेखनशैली

'आचार्य जावडेकरांची लेखनशैली' हा या लेखाचा मथळा वाचून अनेकांना आश्चर्य वाटेल. आचार्य साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष झाल्यामुळें त्यांच्या लेखनावर शैलीचा आरोप करण्याचा हा प्रयत्नपूर्वक आग्रह आहे असाहि कांहीं जणांचा ग्रह होण्याचा संभव आहे. याचें कारण उघड आहे. साहित्यसंमेलनाचे कांहीं भूतपूर्व अध्यक्ष 'शैलीकार साहित्यिक' म्हणून जसे प्रसिद्ध होते तसे आचार्य जावडेकर नाहींत. म्हणजे ते शैलीच्या दृष्टीनें अगर शैलीची जाणीव ठेवून लेखन करणारे लेखक नव्हत. कित्येकांना अर्थात् जाणिवेचा हा अभाव हाच त्यांच्या अभिजात शैलीचा पुरावा वाटण्याचा संभव आहे. कारण सहजता हा कलेचा आत्मा आहे. कलात्मक लेखनांत शैली वगैरे गुणांचा साहाजिक आविष्कार झालेला असतो. एका अर्थी हें निर्विवाद आहे. कारण अभिजात लेखन एक प्रकारच्या दिव्य, अनिर्वचनीय अशा समाधींतून सिद्ध झालेलें असतें. पण ही समाधि, केळकरांनीं बजावल्याप्रमाणें, सविकल्प स्वरूपाची असते हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. शैलीच्या आविरत, अतिरिक्त जाणिवेनें केलेलें लेखन बिघडण्याचा संभव असतो हें खरें. पण लेखकानें स्वतःच्या लेखनाकडे निदान निष्ठाशील रसिकतेनें पाहाणें जरूर असतें. स्वतःच्या लेखनशैलीवर त्याची रसज्ञ भक्ति नसेल तर त्याचें लेखन इतर अनेक दृष्टींनीं गुणसंपन्न असलें तरी नीरस ठरेल. कारण रसिकता अंतर्मुख बनली म्हणजेच कलेचा जन्म होतो. Art lies in concealing art हें खरें असलें तरी प्रत्येक कलावन्ताला स्वतःच्या कलात्मक गुणांची रसज्ञ जाणीव असते, तो त्यांच्यांत रंगून गेलेला असतो अशी माझी समजूत आहे. बाण-कालिदासांपासून माटे-माडखोलकरांपर्यंत सर्वांना हा नियम लागू आहे. आचार्य जावडेकर हे अशा प्रकारें स्वतःच्या शैलीबद्दल सतत जाणीव बाळगून लिहिणारे लेखक असतील असें वाटत नाहीं. त्यांनीं स्वतःच एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें, त्यांचें एकंदर जीवन विचार-प्रधान आहे; चिंतन आणि चर्चा हे त्यांचे नित्याचे व्यवसाय आहेत; लेखन आणि अध्यापन हे दुय्यम व्यवसाय आहेत. तेव्हां आचार्यांच्या लेखनांत शैली इत्यादि वाङ्मयीन गुणांची अपेक्षा करण्यापेक्षां विचारांची, वैचारिक वैशिष्ट्यांची अपेक्षा करणें अधिक योग्य ठरेल. एकादा कलात्मक शब्दप्रयोग सुचल्यामुळें अगर एकादें शब्दसुंदर वाक्य लेखणींतून उतरल्यामुळें त्यांना जितका आनंद होत असेल त्याहून अनेकविध आणि श्रेष्ठतर प्रकृतीचा आनंद एकादा नवा, क्रांतिकारक विचार त्यांच्या मनःपटलावर तरळूं लागल्याबरोबर त्यांना होत असेल. 'असंतोषात्मक देशभक्तीची मीमांसा' हा केसरीकारांचा मथळा त्यांनीं 'असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा' या मथळ्यानें उलटविला तेव्हां, अगर "राष्ट्रशक्तीचे पेशे नेहमींच बदलत राहणार. आज ती दरबारी पेहरावांत असली, तर उद्यां ती वकिली पेशांत दिसूं लागेल. यानंतर ती कांहीं काळ शुद्ध व शुभ्र फकिरी वेशांत दिसली, तर कदाचित् कांहीं काळानें त्याच शुभ्र फकिरी वेषावर रामदासी भगवा रंग चढेल" असें रंगदार लेखन त्यांनीं केलें तेव्हां त्यांना ज्या समाधानाचा अनुभव आला असेल त्यापेक्षां किती तरी उत्कट अगर उच्चतर समाधानाचा अनुभव त्यांना टिळकांचें नीतिशास्त्र आणि गांधीजींचें नीतिशास्त्र यांच्यामधील साम्य प्रतीत झालें किंवा, "गांधीवाद हा अंतिम दृष्ट्या ख्रिस्ताच्या किंवा टॉलस्टॉयच्या मताप्रमाणें अराज्यवादी असला, तरी व्यवहारदृष्ट्या राज्य-








यंत्राची समाजाला आवश्यकता आहे तोंपर्यंत जनतेच्या हिताला अधिकांत अधिक दक्ष राहणाऱ्या राजसत्तेशीं सशर्त सहकार करण्याइतका वास्तववाद गांधीवादांत अंतर्भूत आहे व टॉलस्टॉयहून गांधींचें माहात्म्य तेंच आहे" हा विचार त्यांनीं मांडला तेव्हां लाभला असेल. आणि एका अर्थानें हेंच आचार्यांच्या लिखाणाचें सामर्थ्य आहे. शैलीच्या जाणिवेनें लिहिणारे लेखक पुष्कळदां वाचकांना, आणि अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वतःला, फसवतात. शब्दांवर प्रभुत्व असलें म्हणजे विचारांची व्यक्तता सुरू होते ही गोष्ट खरी; पण शब्दांची आकर्षक आतषबाजी करणारे लेखक आशयाला विसरतात आणि उच्च शब्दरचनेमुळें अर्थपूर्ण विचार व्यक्त केल्याच्या आभासांत निमग्न होतात. आचार्यांच्या लेखनांत असल्या आत्मवंचनेस तिळमात्र थारा नाहीं. विचारांच्या आशयावरील त्यांची पकड कधींहि सुटत नाहीं. लेखाच्या वैचारिक कक्षेबाहेरचा, कांहींसा अनावश्यक वाटणारा मजकूर त्यांच्या लेखणींतून उतरल्याचें एकच उदाहरण माझ्या आढळांत आहे. 'लोकमान्य टिळकांनंतरचा महाराष्ट्र' या लेखांत, मराठी वाङ्मयांत भक्तिरसाच्या जोडीला क्रांतिरस येऊन बसला, हा विचार मांडतांना केशवसुतांच्या कवितेंत आपल्याला क्रांतिरसाचा आस्वाद चाखायला कसा मिळाला याचा जो उहापोह त्यांनीं केला, तीं पांचसहा वाक्येंच त्या लेखांत मला कांहींशीं अकारण वाटलीं. पण याचें कारण सुद्धां शैलीचा स्वच्छंद विलास हें नव्हे. केशवसुतांच्या कवितेबद्दल जो एक नवीन विचार त्यांना सुचला त्याचें विवेचन करण्याचा मोह त्यांना पडला एवढाच त्याचा अर्थ आहे.

## टिळक आणि जावडेकर

या साऱ्या विवेचनाचा निष्कर्ष आचार्यांच्या लेखनाला शैली नाहीं असा मात्र नव्हे. आणि हें विधान करायला Style is the man या साहित्य शास्त्रांतील निरपवाद सत्याचाच आधार घेतला पाहिजे असें नाहीं. लेखन आणि अध्यापन हे आपले दुय्यम व्यवसाय आहेत असें जरी आचार्य म्हणत असले तरी गेलीं पंचवीस वर्षें त्यांनीं आपल्या विचारांच्या विशदीकरणासाठीं इतकें विपुल आणि निष्ठाशील लेखन केलेलें आहे कीं त्यांच्या लेखनांत एक वैशिष्ट्यपूर्ण शैली प्रतीत होणें अपरिहार्यच ठरावें. साचेबंद ठाशीवपणा हा त्यांच्या लेखनशैलीचा प्रमुख गुण मला वाटतो. जावडेकरांचें लिखाण वाचतांना मला लोकमान्य टिळकांच्या लिखाणाची आठवण होते. लोकमान्य टिळकांच्या लिखाणांत विचारप्रतिपादनाशीं जशी पक्की गांठ मारलेली आढळते तशीच ती आचार्यांच्या लिखाणांत आढळते. जो ठाशीवपणा, सुस्पष्टता आणि तेजस्विता टिळकांच्या वाङ्मयांत अनुभवास येते तीच त्यांच्या वाङ्मयांत येते. विशेषतः लोकमान्यांविषयींच्या त्यांच्या लिखाणांत तेजस्वितेचा प्रत्यय विशेष येतो. 'आधुनिक भारत' या महान् ग्रंथांतलीं टिळकांविषयींचीं पानेंच्या पानें तेजस्वितेनें रसरसलेलीं आहेत असें आढळून येईल. बारिसालला 'वंदे मातरम्' सत्याग्रहाचें प्रकरण उद्भवल्यानंतर लोकमान्यांनीं केसरींतून कायदेपालन आणि कायदेभंग यांचें जें तेजस्वी विवेचन केलें त्याचें विश्लेषण करतांना तर आचार्यांची लेखणी धगधगलेली आहे असें वाटतें. जणुं टिळकांच्या तेजस्वितेचा साक्षात्कारच त्यांच्या लेखणीला तो भाग लिहितांना झाला! पण तेजस्वितेपेक्षांहि ठाशीव साचेबंदपणा या टिळकांच्या गुणाचा आढळ जावडेकरांच्या लिखाणांत विशेष होतो. अर्थात् लोकमान्यांच्या केसरींतील लेखांच्या शैलीपेक्षां आचार्यांची शैली अधिक प्रौढ आणि प्रगल्भ भासते. पण त्याचें कारण स्पष्ट आहे. लोकमान्य टिळक हे प्रथम व्यावहारिक राजकारणी व मुत्सद्दी होते. राजकीय लेखन करतांना व्यावहारिक राजकारणाचे वेढे त्यांच्या लेखणीला घट्ट बसलेले असत. उलटपक्षीं, आचार्य हे सदोदित तत्त्वज्ञानाच्या पातळीवर वावरत असतात. दैनंदिन राजकारणाकडेहि आचार्य तत्त्वज्ञानाच्या दुर्बिणींतून पाहतात. त्यांच्या प्रतिपादनाला तात्त्विक विचारांचें अचल अवगुंठण असतें. टिळक आणि जावडेकर या दोघांचीहि गणना महाराष्ट्राच्या नामवन्त संपादकांत सतत होत राहील. दोघांनींहि आपल्या वृत्तपत्रीय रकान्यांतून राजकारणाची चर्चा निरंतर केली. पण दोघांच्या वृत्तपत्रीय चर्चेंतला हा फरक तात्काळ जाणवल्या-










शिवाय राहात नाहीं. अर्थात् टिळकांच्या तात्त्विक लेखनाशीं आचार्यांच्या लेखनाची तुलना केली म्हणजे साम्याचा विशेष आढळ होऊं लागतो. जावडेकरांच्या लेखनशैलीचा विचार करतांना 'गीतारहस्या'ची आठवण याचमुळें होते. किंबहुना 'गीतारहस्या'च्या विचारसरणीचा प्रगाढ परिणाम आचार्यांच्या विचारसरणीवर झालेला जसा आढळतो तसाच गीतारहस्याच्या शैलीचा परिणाम त्यांच्या लेखनशैलीवरहि झालेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मागें, वामन मल्हार जोशींना आचार्यांच्या 'आधुनिक भारता'मुळें गीतारहस्याची आठवण झाली तिचें कारण मौलिक प्रतिपादन असें जरी त्यांनीं दिलें होतें तरी हें शैलीचें साम्य वामनरावांच्या नेणिवेंत तरी तरळत असावें अशी माझी समजूत आहे.

## भाषिक कामगिरी

गीतारहस्याच्या द्वारें टिळकांनीं मराठी वाङ्मयांत जी भाषिक कामगिरी केली तशाच प्रकारची कामगिरी आचार्य जावडेकरांनीं केलेली आहे. पाश्चात्य तत्त्वज्ञानाचीं गुह्यात् गुह्य रहस्यें मराठी भाषेंत व्यक्त करणें किती बिकट आहे याचा प्रत्यय आगरकरांच्या लिखाणांतून येतो. गीतारहस्य लिहून हीं रहस्यें समर्पक पद्धतीनें व्यक्त करण्याचें सामर्थ्य टिळकांनीं मराठी भाषेंत ओतलें. तसेंच सामर्थ्य जावडेकरांनीं आपल्या समाजवादावरील लेखनानें मराठी भाषेच्या अंगीं बाणविलें आहे. समाजवादी विचारसरणीनें पाश्चात्य राज्यनीतिशास्त्रांत आणि समाजशास्त्रांत मौलिक आणि गहन भर टाकली. या विचारसरणीचीं रहस्यें मराठी भाषेंत व्यक्त करतांना लेखकाच्या बुद्धीची कशी ओढाताण होते आणि लेखणीचे कसे हाल होतात याचा अनुभव मला स्वतःला आहे. श्री. पु. य. देशपांडे आणि लालजी पेंडसे यांच्या लेखनामुळें महाराष्ट्रीय वाचकांसहि त्याचा विपुल अनुभव आहे. हास्यास्पद भाषेमुळें सिद्धांताचीहि अवस्था कशी हास्यास्पद होते या अनुभवाच्याहि कांहींशा विषादपूर्ण आणि कांहींशा विनोदपूर्ण छटा या अनुभवांत मिसळलेल्या आहेत. जावडेकरांनीं आपल्या सुस्पष्ट आणि मर्मग्राही लेखणीनें समाजवादाच्या रहस्यांचा वेध घेऊन आणि भेद करून मराठी भाषेस समाजवादी परिभाषा आत्मसात् करण्याची अद्‌भुत शक्ति प्राप्त करून दिली आहे. जावडेकरांप्रमाणें पां. वा. गाडगीळांनींहि समाजवादावर विपुल लिखाण केलेलें आहे. सुलभ आणि समर्पक उपमा-दृष्टान्तांच्या देणगीमुळें तें अधिक प्रसन्नहि बनलेलें आहे. पण उच्च तात्त्विक विचारसरणीची जी बैठक आणि जी झळाळी जावडेकरांच्या समाजवादावरील लिखाणाला आहे ती गाडगीळांच्या आहे असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् जावडेकरांची स्वतःच्या विचारांवर इतकी पकड आणि भाषेवर इतकें प्रभुत्व आहे कीं त्यांचें लेखन तात्त्विक प्रकृतीचें आणि गहन विचारांनीं भरलेलें असूनसुद्धां तें बोजड बनलें आहे असें वाटत नाहीं. भाषेची कसरत करण्याची इच्छा त्यांची नसते. पण तिच्यावर त्यांचें असें कांहीं प्रभुत्व आहे कीं एकादा वैमानिक सहजगत्या विमानाला उलटीसुलटी वळणें देतो त्याप्रमाणें जावडेकर भाषा हवी तशी वळवितात असा अनुभव येतो.

## जावडेकर आणि आगरकर

जावडेकरांच्या वाङ्मयानें टिळकांच्याप्रमाणें आगरकरांच्या लेखनशैलीचीहि आठवण मला होते. आगरकरांची वाक्यरचना मोठी वैशिष्ट्यपूर्ण असते. त्यांच्या वाक्यविन्यासाची एक विशेष पद्धत आहे. आगगाडीचे डबे एकामागून एक नजरेसमोरून जातांना जसें वाटतें तसें आगरकरांचें, अनेक तुकडे एकामागून एक जोडून तयार केलेलें, लांबलचक वाक्य वाचतांना वाटतें, अशा अर्थाचें विधान वि. स. खांडेकरांनीं केलेलें आहे. खवळलेल्या सागराच्या लाटा एकामागून एक झेंपावत येतात त्याप्रमाणें आगरकरांच्या वाक्यांचे अर्धविरामांच्या आधारानें जोडलेले विभाग एकामागून एक येतात असें वर्णन प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनीं केलेलें आहे. खांडेकरांच्या दृष्टान्ताहून कुळकर्णींचा दृष्टान्त अधिक समर्पक आहे. कारण भरतीच्या वेळीं समुद्राच्या अधिक अधिक उंच आणि पल्लेदार लाटा जशा येतात तसा आगरकरांच्या वाक्याचा एकेक विभाग चढत जातो. आगरकर हे शैलीच्या जाणिवेनें लेखन करणारे लेखक होते याचा प्रत्यय त्यांचीं हीं वाक्यें वाचतांना येतो. प्रत्येक वाक्यविभागाबरोबर त्यांचें

# आचार्य जावडेकरांची लेखनशैली

वाक्य अर्थ आणि सौंदर्य या दोनहि दृष्टींनीं अधिकाधिक उन्नत बनत जातें. जावडेकरांचींहि अनेक वाक्यें आगरकरांच्या वाक्यांप्रमाणें लांबलचक आणि विभाग-उपविभागांनीं विनटलेलीं असतात. यांत अर्थात् कांहीं नवल नाहीं. लोकमान्य टिळकां-प्रमाणेंच आगरकरांचा प्रभाव आपल्या जीवनावर आणि विचारसरणीवर पडलेला आहे असें आचार्यांनीं मोठ्या आदरानें आणि भक्तिभावानें नमूद ठेवलेलें आहे. पण आगरकरांच्या जावडेकरांच्या अशा प्रकारच्या वाक्यरचनेंत फरक आहे. आगरकरांच्या युयुत्सु आणि शैलीप्रिय वृत्तीमुळें त्यांच्या वाक्यांचा रंग आणि ढंग चढत जातो. उलट अशीं वाक्यें लिहितांना जावडेकरांची दृष्टि एकाद्या विधानाचीं सर्व अंगें-प्रत्यंगें सूत्ररूपानें मांडण्याची असल्यानें तीं वॉलसिटाच्या स्प्रिंगप्रमाणें चढत न जातां जला-शयावरील वलयाप्रमाणें विस्तारत जातात. आगर-करांच्या वाक्यांना भरतीच्या समुद्राची उपमा दिली तर जावडेकरांच्या वाक्यांना सखोल, संथ पण वाऱ्याच्या प्रेरणेनें किनाऱ्यावर लाटांचा अविरत आरव करीत राहणाऱ्या जलाशयाची देतां येईल. जें त्यांच्या वाक्यांना लागूं आहे तेंच परिच्छेदांनाहि आहे.

## प्रभावी प्रचारक

जावडेकर तत्त्वज्ञ लेखक असले तरी त्यांच्या प्रकृतींत एक प्रभावी प्रचारक वसत असलेला आढळतो. त्यांना प्रतीत झालेलीं सत्यें ते पुनःपुन्हां ठांसून प्रतिपादीत असतात. लेखन आणि अध्यापन हे आपले दुय्यम व्यवसाय आहेत असें ते सांगत असले तरी त्यांची मूळची वृत्ति प्रचारकाची आणि अध्यापकाची असावी असें दिसतें. कलात्मक अनुभव व्यक्त झाल्याबरोबर कलावन्ताच्या ठिकाणीं निर्माण झालेला प्रक्षोभ शमतो, त्या अनुभवाची आर्तता विराम पावते. विचाराचें सुद्धां असें होतें. पण एकादा नवीन, मौलिक विचार व्यक्त करून, जगापुढें मांडून आचार्यांचें समाधान होतें असें दिसत नाहीं. तो पुनःपुन्हां, आग्रहानें प्रतिपादून जगाला पटवून देण्याची तळमळ त्यांना लागलेली असते. म्हणून त्यांच्या वाङ्मयांत बरीच पुनरावृत्ति आढळते. उदाहरणार्थ, लोकमान्य टिळकांचा वारसा गांधीजीं-कडे आला आणि गांधीजींचा सत्याग्रही वारसा समाज-वाद्यांकडे आला आहे अगर आला पाहिजे, हें त्यांनीं वारंवार, निरनिराळे पुरावे देऊन आणि प्रसंग साधून महाराष्ट्राच्या अंतःकरणावर ठसविण्याचा प्रयत्न केला आहे. आज कित्येक वर्षे आचार्यांनीं हेंच प्रतिपादन केलेलें असल्यानें त्यांच्या विचारांना एक प्रकारचा संथपणा आणि ठामपणा प्राप्त झालेला दिसतो. आचार्यांनीं स्वतःच याचें विवेचन केलें आहे. ते म्हणतात : " माझ्या विचारांची वाढ भावनोद्रेकानें होत नसून चिंतन व चर्चा या मार्गांनीं होत असल्यानें तिच्यांत एक प्रकारचा संथपणा दिसून येतो. गेल्या पंचवीस–तीस वर्षांत माझ्या विचारांत बरीचशी वाढ झाल्याचें मला दिसून येतें; तथापि त्यांत एक-दम अनपेक्षित उलथापालथ अथवा आमूलाग्र विचारपरिवर्तन झालेलें नाहीं. " याचें आणखी एक कारण असावेंसें मला वाटतें. फार पूर्वीं, आपल्या वैचारिक जीवनाच्या जवळजवळ सुरुवातीस लोकमान्य टिळकांकडून, " ध्येयवादाची उत्पत्ति मनुष्याच्या तत्त्वनिष्ठेंतून किंवा धर्मबुद्धींतून होत असते अर्थात् याच्याइतकी उच्च मनोवृत्ति मनुष्य-समाजांत दुसरी कोणतीहि सांपडणें शक्य नाहीं. या धर्मबुद्धीचा विकास व्हावा, धर्मनिष्ठांचा प्रतिपाल व्हावा आणि उच्च तत्त्वरूपी मानवी ध्येयांचा अव-तार पृथ्वीतलावर व्हावा, याकरितांच राजकारणा-चाहि अवतार झालेला आहे " असा संदेश त्यांना मिळाला. सुदैवानें गांधीजींचें राजकारण नेमकें याच प्रकृतीचें असल्यानें आणि समाजवादानें या उदात्त भूमिकेचा त्याग केल्यास त्याचें कसें अधःपतन होतें याचा अनुभव याच कालांत रशियानें दिल्यानें या सत्याचा फेरविचार करण्याची पाळी मार्क्स-वादाचा आदर करूनहि त्यांच्यावर कधीं आली नाहीं. तें कांहींहि असलें तरी त्यांच्या विचारांत आमूलाग्र उलथापालथ झालेली नसल्यानें आणि त्यांची प्रचारकी वृत्ति जाज्वल्य असल्यानें त्यांच्या लेखनाला पुनरावृत्तीची बाधा झालेली आहे हें नाकारतां येणार नाहीं.

## उपरोधाचे पवित्रे

आचार्य जावडेकरांच्या लिखाणावरून त्यांच्या सरळ, सोज्वळ आणि तत्त्वनिष्ठ स्वभावाची ग्वाही

मिळते. त्यांचें प्रतिपादन स्पष्ट, सौजन्यपूर्ण आणि विषयाच्या गाभ्याचा वेध घेणारें असतें. डावपेंचाचा युक्तिवाद किंवा शब्दावडंबर यांचा त्याला आधार नसतो. विद्वत्ता, संशोधन आणि शुद्ध बुद्धीचा तर्कवाद यांच्या पायावरच त्याची उभारणी असते. थोडक्यांत म्हणजे त्यांची सत्यनिष्ठा आणि निःस्पृहता यांची प्रतीति त्यांच्या लेखनांत येते. वाङ्मयांतला उपरोध, वक्रोक्ति वगैरे प्रकार हिंसात्मक वृत्तीचे आणि सत्याशीं केलेल्या प्रतारणेचे द्योतक असतात अशा अर्थाचें विवेचन काकासाहेब कालेलकरांनी एकदां केलें होतें. त्यांच्या या विरक्त (आणि शुष्क) कसोटीस उतरेल असेंच जावडेकरांचें लिखाण आहे. सावरकर आणि केळकर यांच्या राजकारणाचा परामर्श घेतांना त्यांच्या लेखणीला विलक्षण धार चढते, पण याहि वेळीं वक्रोक्ति अगर उपरोध यांचीं अस्त्रें तीं क्वचितच धारण करते. पण एकदोन ठिकाणीं तिनें असे पवित्रे टाकलेले आहेत आणि जावडेकरांच्या लेखनशैलीचे विरळ पण आकर्षक नमुने म्हणून ते सादर करण्याचा मोह मला अनावर होतो. उदाहरणार्थ, 'असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा' या लेखांत टिळकभक्तांचें वर्णन करतांना ते म्हणतातः "तथापि, या असंतुष्ट टिळकभक्तांचें स्वतःचें असें कोणतेंहि राजकारण नाहीं. तुम्ही स्वतःचा एकादा कार्यक्रम देशापुढें कां ठेवीत नाहीं असें त्यांस विचारल्यास ते एकदम वेदान्तांत शिरून उत्तर देतील कीं, सृष्टि ही त्रिगुणात्मक आहे. सत्व, रज आणि तम या गुणांचें मिश्रण निरनिराळ्या व्यक्तींत निरनिराळ्या प्रमाणांत झालेलें असतें. अर्थात् ज्यानें त्यानें आपणांस जें सुचेल व पचेल तें करीत राहावें. आम्ही कोणास प्रोत्साहनहि देणार नाहीं व कोणाचा निषेधहि करणार नाहीं. हा आपला त्रिगुणात्मक सृष्टीचा सिद्धान्त दिक्कालाद्यनवच्छिन्न असल्यामुळें कोणीहि, केव्हांहि व कांहींहि करून दाखविलें तरी त्याचें श्रेय ते आपल्याच तत्त्वांना देऊं शकतात हें उघड आहे. त्यांचें ध्येय 'स्वराज्य' या मोघम शब्दानें व्यक्त होतें. या शब्दाचा अर्थ 'निर्भेळ स्वराज्य,' 'साम्राज्यांतर्गत स्वराज्य,' प्रांतिक स्वराज्य', किंवा 'स्थानिक स्वराज्य' यांपैकीं कोणताहि होऊं शकेल असें ते न्याय व मीमांसा या शास्त्रांच्या आधारें केव्हांहि सिद्ध करून देतील. त्यांना तुम्ही आपलें ध्येय कोणत्या साधनांनीं प्राप्त करून घेणार असा प्रश्न केल्यास 'साधनानामनेकता' ही टिळकस्मृति ते तुमच्या तोंडावर फेकून देतील! कायदेभंगासारख्या कोणत्याहि चढाईच्या कार्यक्रमाला हे व्यवहारनिपुण लोक 'अव्यवहार्य' कोटींत ढकलतील व आपलें राजकारण नेहमींच बचावाचें ठेवतील; पण अत्याचारी मार्गांचा कोणीं निषेध केला, कीं तो सरकारचा मित्र आहे व परंपरेनें तो देशाचा शत्रु आहे असें ते ध्वनित करतील.... कर्मवीरास ते कर्मसंन्यासी ठरवितील, आणि परकीय सरकारची लठ्ठ पगारी नोकरी करणाऱ्यांचें निष्काम कर्मयोगी म्हणून हे अभिनंदन करतील!" आता सावरकरांच्या युक्तिवादाची ही संभावना पाहा: "बॅ. सावरकरांच्या मतें, 'त्यांचें (म. गांधींचें) तत्त्वज्ञान हें मूलतः हास्यास्पद व भारतीय राष्ट्राला हानिकारक आहे. मानवसंस्कृतीच्या बाल्यावस्थेतील अवशेष म्हणून त्यांचें यथार्थ वर्णन करतां येईल. विमानांच्या व यंत्रांच्या या काळांत आजकालच्या पद्धतीशीं विसंगत असलेल्या जुन्यापुराण्या मार्गांचें व पद्धतींचें अनुकरण करण्यास आम्ही तयार नाहीं'. आणि हें एका अर्थी खरेंहि आहे! उपनिषत्कार ऋषी हे मानवकुलाच्या बाल्यावस्थेंतच होऊन गेले नाहींत काय? शिवाय ते रानांत राहत असल्यामुळें त्यांचें आत्मबल हें रानटी संस्कृतीचेंच प्रतीक नव्हे काय? आजच्या सारखी नागर-संस्कृति त्यांना कोठें उत्पन्न करतां आली? त्यांनीं बॉंबगोळे, टॅंक्स यांची प्रगत संस्कृति कोठें निर्माण केली? या अतिप्राचीन रानटी, बालसंस्कृतीचा अवशेष असा जो सत्याग्रह तो आजच्या सुधारलेल्या संहारयुगाला कसा समजणार? ब्रिटिशांच्या वैमानिक हल्ल्यांना गांधीजींसारख्या रानटी यतीचें आत्मबल कसें तोंड देणार? त्यास तोंड देण्यास विमानांचें ताफे व यांत्रिक तोफखानेच उभारले पाहिजेत. हिंदुसभेच्या धर्मवीरांनीं उघडलेल्या लष्करी शिक्षणाच्या बालशालेव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्या संस्थेला आज हे सशस्त्र विमानांचे ताफे व यांत्रिक तोफांचे तोफखाने उभारण्याचें सामर्थ्य







## आचार्य जावडेकरांची लेखनशैली

आहे !...... 'सरसेनापति' भोपटकरांनी निःशस्त्र असतांहि भागानगरांत 'भगवा झेंडा' नाचविलाच की नाहीं? आणि सावरकरांनी पेशवाईची थकलेली खंडणी वसूल करून विनदाढीच्या निजामाची दाढी कापलीच की नाहीं! हा अपूर्व पराक्रम गांधीजींच्या रानटी अवस्थेतील आत्मबलानें झाला असता काय!'' जावडेकरांच्या लेखणीला करवती-चे वक्र दांते जे येथें प्राप्त झाले आहेत त्याचें श्रेय आचार्यांच्या उपरोधप्रियतेपेक्षां लोकशाही स्वराज्य-पक्षाच्या मूलतः हास्यास्पद राजकारणालाच दिलें पाहिजे! एरवीं त्यांची लेखणी कितीहि धारदार बनली तरी ती वांकडा वार सहसा करीत नाहीं.

---

## व्यक्तिवादी राष्ट्रवादाचे आचार्य (पान ६८१ वरून पुढें चालू)

आजच्या सर्वगामी व कोसळत्या संकटांतून आपल्या देशाला जसेंच्या तसें वांचविण्याचा प्रश्नच उरलेला नाहीं. समाजक्रांति किंवा मरण हाच पेंच सर्व आशिॲटिक देशांपुढें आहे. त्यासाठीं मार्क्स-वाद व सशस्त्र जनक्रांतीची संघटना हीच पुरी पडणारी गोष्ट आहे, तेंच शुद्धतम साधन आहे, असें मार्क्सवाद्यांचें मत आहे. कामगारवर्गाच्या मार्क्स-वादी नेतृत्वाखालीं समाजक्रांति होणार व अशा क्रांतीमध्यें बुद्धिजीवी वर्ग व शेतकरीवर्गहि सामील होणार हा प्रत्यक्ष अनुभव जगभर येत आहे. स्पर्धे-ऐवजीं परस्परसहकार्य हाच समाजधारणेचा नवा पाया कम्यूनिस्टांना अंमलांत आणावयाचा आहे. ह्या नव्या पायावर उभारलेल्या समाजव्यवस्थेंत व्यक्तीची उपेक्षा व मुस्कटदाबी न होतां खरा वैशि-ष्ट्यपूर्ण विकास होतो, राष्ट्रीयत्वाची उपेक्षा न होतां राष्ट्रीय संस्कृती उत्कर्षास पोंचतात ही वस्तुस्थिति आहे. ह्या अर्थानेंच फक्त व्यक्ति व राष्ट्र यांचा मार्क्सवादांत समावेश व आदर आहे. स्पर्धायुक्त व्यक्तिवाद व राष्ट्रवाद यांना विरोध याच भूमि-केंवरून आहे. पण श्री. जावडेकरांच्या व्यक्तिवादी व राष्ट्रवादी भूमिकेंत हें बसत नाहीं. स्पष्ट आहे तें त्यांना दिसत नाहीं. तें एका आंधळ्यांच्या माळेंत वाटचाल करीत आहेत. या माळेंत जसे जन्मांध, अपघातांनीं अंध व अधू दृष्टीचे लोक आहेत तसेच चांगले डोळस पण डोळे मिटून घेतलेले व डोळे किलकिले करून पाहणारेहि लोक आहेत. या डोळस आंधळ्याकडून अपेक्षा करील तोच मूर्ख!

पण, श्री. जावडेकरांच्या बाबतींत तसें नाहीं. म्हणून अपेक्षा अशी व एवढीच करावयाची कीं आज ज्या ठिणग्या आहेत त्यांच्यातून खऱ्या क्रांतिकारक उठावाच्या ज्वाला पसरल्या म्हणजे त्यांच्या धगधगीत प्रकाशांत तरी त्यांना कामगार-वर्गाकडे वळणें शक्य होईल. ही अपेक्षा त्यांच्या-विषयींच्या आदरभावांतून व एकंदर आपल्या देशाविषयींच्या आशावादांतून उत्पन्न होणें हें, मला वाटतें, साहजिक आहे.

---








# संमेलनाध्यक्ष जावडेकर : अभिनंदन व व्यक्तिदर्शन

## स्थिरप्रज्ञ, जीवननिष्ठ तत्त्वचिंतक

काहीं व्यक्ती अशा असतात कीं त्यांचा जे मान अगर गौरव करतात ते स्वतःच त्या निमित्तानें सन्मानित अगर गौरवित होतात. कारण त्या व्यक्ती आपल्या अंगच्या गुणांनीं व कार्यानें, अशा मानानें अगर गौरवानें सम्मानित अगर गौरवित होण्याच्या स्थितीच्या वरच्या पदाला जाऊन पोहोंचलेल्या असतात. महाराष्ट्रसाहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदासाठीं श्री. शंकरराव यांची निवडणूक झाली आहे तिला हाच नियम लागू आहे असें मला वाटतें. एक काल असा होता कीं, जेव्हां महाराष्ट्रसाहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदानें श्री. शंकरराव यांचा मान महाराष्ट्रांत कदाचित् वाढला असता. पण थोडें उशीरा कां होईना महाराष्ट्रसाहित्यसंमेलनानें त्यांना आपले अध्यक्ष निवडले याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. या निवडणुकीमुळें श्री. शंकररावांच्या महाराष्ट्रांतील अनेक स्नेह्यांना व अनंत चाहत्यांना जसा आनंद झाला असला पाहिजे तसा तो मलाही झाला आहे.

महाराष्ट्रसाहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद या पूर्वींच श्री. शंकररावांना कां मिळालें नाहीं याचें प्रधान कारण महत्त्वाचें आहे. श्री. शंकरराव हे गाढे तत्त्वचिंतक व विद्वान् लेखक असले तरी ते साहित्यिक नाहींत अशी पुष्कळ महाराष्ट्रीय साहित्यिकांची प्रामाणिक समजूत हेंच तें कारण होय. अर्थात् साहित्य कशाला म्हणावयाचें व महाराष्ट्रसाहित्यपरिषदेच्या अध्यक्षपदाला पात्र होण्याइतके श्री. शंकरराव साहित्यिक आहेत किंवा नाहींत या वादांत माझ्यासारख्या सामान्य माणसानें न पडणें बरें. कारण तें कदाचित् 'अधिकाराविण' बोलणें होईल. पण साहित्याच्या कोणत्याहि अंगाच्या गुणावगुणांविषयीं विवेचन करून त्यावर अचूक मत देण्याचा श्री. शंकररावांचा अधिकार महाराष्ट्रांतील साहित्यिकहि अमान्य करतील असें मला वाटत नाहीं. मग जर साहित्यिक संमेलनाचा अध्यक्ष होतो तर साहित्यिकाचा मार्गदर्शक हा संमेलनाचा अध्यक्ष कां होऊं शकत नाहीं हें सामान्य मनुष्याच्या बुद्धीला न समजण्यासारखें आहे. शिवाय स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या देशांत जें सामाजिक व राजकीय पुनर्घटनेचें कार्य व्हावयाचें त्यासाठीं लागणारी तात्त्विक व मानसिक भूमिका उत्पन्न करणें हें जें साहित्यिकांचें या पुढील महान् कार्य आहे त्या बाबतींत त्यांचा वाटाड्या होण्याचा श्री. शंकररावांचा अधिकार मोठा आहे.

श्री. शंकररावांचा व माझा स्नेह हीं माझ्या जीवनांतील एक अमोल वस्तु मी मानतों. त्यांची व माझी पंचवीस वर्षांपूर्वीं जेव्हां प्रथम भेट झाली तेव्हां माझ्या सार्वजनिक सेवेच्या जीवनाला नुकताच प्रारंभ झाला होता. अर्थात् माझी श्रद्धा व मार्ग यापूर्वींच स्थिर व निश्चित झालीं होतीं. तथापि श्री. शंकररावांच्या स्नेहामुळें व सहकार्यामुळें तीं अढळपणें आचरण्यांत आणण्याला मला जें साहाय्य झालें त्याचें विस्मरण मला कदापि होणार नाहीं. श्री. शंकररावांच्यामध्यें अनेक गुण वास करीत आहेत. पण मला जर त्यांच्या कोणत्या एका गुणानें आकर्षित केलें असेल तर त्यांच्या 'स्थिर प्रज्ञा' या गुणानें. त्यांच्या प्रज्ञेनें प्रारंभींच ज्या कांहीं मौलिक सिद्धातांचें ग्रहण केलें त्या सिद्धांतांवर ती हिमालयाप्रमाणें स्थिर आहे. या त्यांच्या स्थिर प्रज्ञेमुळेंच श्री. शंकरराव यांना महाराष्ट्रांतील अनेकांची मति जागृत करून ती विशिष्ट तत्त्वांवर स्थिर करण्यांत एवढें मोठें यश मिळालें.

श्री. शंकररावांच्या प्रज्ञेचा मला आणखी एक








विशेष हा दिसला कीं तीं सर्वस्पर्शी व जीवननिष्ठ आहे. श्री. शंकररावांच्या मनाला तत्त्वचिंतनांत जितका आनंद मिळतो तितका अन्य कशांतही मिळत नाहीं हें खरें. त्यांची ज्ञानोपासना अखंड सुरू आहे. तथापि तत्त्वचिंतनांतून ज्या आचाराचा बोध होतो तो आचार स्वार्थत्यागपूर्वक स्वीकारण्यांतहि त्यांना तितकाच आनंद होतो; म्हणूनच ते क्रांतीचे केवळ तत्त्वज्ञ न राहतां नेतेहि बनले.

श्री. शंकररावांचें मानस उच्चार्थानें धार्मिक आहे. म्हणूनच त्यांच्या जीवनव्यवहारांत अनहंकार, अनासक्ति व उदारता मोठ्या प्रमाणांत आढळते. श्री. शंकररावांच्या इतक्या अनासक्तीनें खाजगी जीवन व अनहंकार वृत्तीनें सार्वजनिक जीवन घालविणारे पुरुष मी फारच थोडे पाहिले आहेत ! ते व त्यांच्या धर्मपत्नी यांचा गृहस्थाश्रम म्हणजे शांति व समाधान यांचें आलय आहे. श्री. शंकररावांचा गृहस्थाश्रम पाहिला कीं उपनिषत्-कालांतील संसारी ऋषींचें स्मरण होतें !

असा स्थितप्रज्ञ, तत्त्वचिंतक, जीवननिष्ठ, विद्वान् ग्रंथकार या वर्षी महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाला अध्यक्ष लाभला आहे. अशी आशा करूं या कीं समता व स्वातंत्र्य यांवर आधारलेला नवसमाज निर्माण करण्याच्या भारतीय कामांत आपला योग्य वांटा उचलण्याला ते महाराष्ट्रीय साहित्यिकांना मार्गदर्शन करतील.

—श्री. **शंकरराव देव**

---

## निष्कपट वृत्ति व शास्त्रीय दृष्टि

रा. शंकरराव जावडेकर हे पुणें येथें लवकरच भरावयाच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष बहुमतानें निवडून आले ही गोष्ट त्यांचा फार दिवसांचा स्नेही या नात्यानें मला फार अभिनंदनीय वाटली. शंकरराव माझ्यापेक्षां दोनचार वर्षांनीं लहान आहेत. आणि लहानपणीं कितीतरी दिवस आम्ही एका कुटुंबांतच होतों, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांचे वडील रा. रा. दत्तात्रेय जगन्नाथ जावडेकर हे कोल्हापूर येथें विशाळगडकर या छोट्याशा संस्थानिकांचे प्रायव्हेट सेक्रेटरी होते. प्रायव्हेट सेक्रेटरी होण्यापूर्वी ते त्यांचे शिक्षक होते. म्हणून शेवटपर्यंत त्यांना जावडेकर मास्तर असेंच म्हणण्याची वहिवाट असे. विशाळगड संस्थान आणि मोठें संस्थान कोल्हापूर (—हीं सर्व संस्थानें आतां विलीन झालेलीं आहेत—) यांच्यात बरेच तंटेबखेडे होते. व जावडेकर मास्तर त्या बाबतींत आपल्या चीफ्‌साहेबांना सल्लामसलत देत असत. या छोट्याशा संस्थानिकांच्या व कोल्हापूरच्या पुष्कळ तक्रारी होत असत. आणि विशाळगडच्या तक्रारी चालविण्याच्या बाबतींत जावडेकर मास्तर अतिशय श्रम घेत. जावडेकर मास्तरांना दोन मुलें झालीं. मुलगी धोंडूताई हिचें लग्न इस्लामपूरचे रा. रा. बापूराव कशाळकर यांजबरोबर झालें. कांहीं दिवस घरसंसार करून सौ. धोंडूताई मरण पावली. १९०८ सालीं प्रा. विजापूरकरांच्यावर कोल्हापूरदरबारनें राजद्रोहाची फिर्याद केली व त्यांत त्यांना शिक्षा झाली. याच सुमाराला जावडेकर मास्तर यांनीं आपलें बिऱ्हाड इस्लामपूर येथें नेलें, व तेव्हांपासून शंकररावांचें बिऱ्हाड तेथेंच आहे.

इस्लामपूरला कायमचें बिऱ्हाड करण्यापूर्वी जावडेकर मास्तर कांहीं दिवस पुण्यास राहिले. त्या वेळीं त्यांचें आमचें बिऱ्हाड एकत्रच पुण्यास शनवार पेठेंत मेहेंदळे यांच्या बागेंतील बंगल्यांत असे. अशा प्रकारें १९०५ सालापासून ते १९१२—१३ सालापर्यंत आम्ही बहुतेक वेळ एकमेकांजवळ होतों. पुढें जावडेकर मास्तरना दम्याच्या विकारामुळें इस्लामपुरास अधिकाधिक रहावें लागे व आम्ही १९१५ च्या एप्रिलांत मुंबईस कायमचे रहाण्यास आलों. शंकररावांची बी.ए.ची परीक्षा यथाक्रम पसार झाली. मी १९१५ सालीं एप्रिल महिन्याच्या सुरुवातीला 'इंदुप्रकाश'चा संपादक म्हणून काम करूं लागलों व जरी जावडेकर मास्तर हे वरचेवर भेटत असत तरी त्यांचें—आमचें एकत्र राहाणें अर्थात संपलें होतें.

शंकरराव बी. ए. झाल्यानंतर हळुहळू गांधीवादाकडे वळले व त्यांनीं लेखनालाहि आरंभ केला. अगदी निर्व्यसनी अशा स्थितींत सुद्धां त्यांना हळ-










हळूं वडिलांच्या कफविकाराची बाधा होऊं लागली. व आतां तर या विकारासाठींच त्यांनीं पुण्यांत राहाण्याचा इरादा सोडून इस्लामपूरासच कायमचें राहाण्याचें ठरविलें. त्यांची पत्नी पतिकार्याला अनुकूल अशा प्रकारची आहे. व सुदैवानें त्यांना दोन मुलगे आहेत. बहुधा लग्नानंतर शंकरराव गांधीवादाकडे वळले. व आजकाल महाराष्ट्रांत गांधीवादाचा पुरस्कार आणि अविष्कार करणाऱ्यांत त्यांची जवळजवळ प्रमुखांत गणना आहे.

गेल्या ऑक्टोबरमध्यें मी बरांच आजारी असतांना ते मुंबईस आले होते. त्यावेळीं माझ्या घरीं ते येऊन भेटले. त्यावेळीं अर्धापाऊण तास जी चर्चा झाली तींत साहित्यसंमेलनाचें नांवहि निघालें नव्हतें!

शंकररावांच्या सार्वजनिक आयुष्याविषयीं सध्यां मला कांहीं लिहावयाचें नाहीं. कोणतेंहि कार्य निरलसपणें आणि निष्कपटपणें चालवावयाचें हा शंकररावांचा जन्मस्वभाव आहे. म्हणूनच त्यांच्या-विषयीं मतभेद असणाऱ्यांचा देखील त्यांच्याबद्दल उत्तम ग्रह आहे. ते अनेकवेळां तुरुंगांत जाऊन आलेले आहेत. आणि सध्यांच्या सार्वजनिक आयुष्या-च्या नडीअडचणी त्यांच्या अनुभवाला आल्या आहेत. त्या नडीअडचणींना ते कधीं भ्याले नाहींत, त्याचप्रमाणें त्यांनीं त्या मुद्दाम ओढवून घेतल्या असेंहि नाहीं. गेल्या तीस वर्षांत देशांत जी धुमश्चक्री माजून राहिली होती तिचे धक्के शंकररावांना पुष्कळ वेळां खावे लागले. पण त्यामुळें त्यांच्या मानसिक स्थितींत विशेष अंतर पडलें आहे असा प्रकार नाहीं.

गेल्या तीस वर्षांत कॉंग्रेसचें प्रमुखत्व गांधीवादी मंडळींकडे गेलें, व महात्मा गांधींच्या मताप्रमाणें हळुहळूं कॉंग्रेसचा संसार थाटला. महात्मा गांधींची मतप्रणाली आतां स्वराज्यप्राप्तीनंतर कोणत्या प्रकारें टिकते हें हळुहळूं सर्वांस पाहावयास मिळेल. परंतु हिंदुस्थानांत पारतंत्र्य होतें तोंपर्यंत या मतप्रणालीचा प्रसार अतिशय झाला, ही गोष्ट तिच्याशीं सहमत नसणाऱ्यांनींहि मान्य केली पाहिजे. शंकरराव जावडेकरांचें मुख्य कार्य म्हणजे ग्रंथकर्तृत्व. त्यांनीं प्रकट केलेल्या विचारासंबंधीं कोणाचा कसाहि मतभेद असला तरी त्यांनासुद्धां शंकररावांची आपलें म्हणणें मांडण्याची पद्धति मान्य झाली पाहिजे. या छोट्याशा लेखांत त्यांनीं प्रकट केलेल्या मतांची चर्चा करण्याचा माझा विचार नाहीं. त्यांची विवेचनपद्धति बहुतेक निर्दोष आहे, एवढें तिच्यासंबंधीं सांगितलें म्हणजे पुरें. महाराष्ट्रांत लोकमान्य टिळकांनीं प्रकट केलेली विचारसरणी ज्यांना मान्य नव्हती त्यांतच शंकर-रावांचा उल्लेख करावा लागेल, असें मला वाटतें. टिळकांच्या विचारसरणीहून निराळी विचारसरणी महात्मा गांधींनीं काढली व तिला अनुमोदन देणाऱ्यांत कै. शिवराम महादेव परांजपे व कै. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर वगैरे मंडळी होती. त्यांच्या मानानें शंकरराव जावडेकर हे दुसऱ्या पिढीचे परंतु त्यांनीं गांधींच्या एका प्रकारें नव्या विचारांना जो पाठिंबा दिला त्यांत एक प्रकारचा शास्त्रीयपणा दिसून येतो. गांधीवाद आणि समाज-वाद यांचा संबंध जोडून त्यांनीं गांधीवादाला एका प्रकारचें शास्त्रीय स्वरूप दिलेलें आहे.

शंकरराव जावडेकर हे अत्यंत निष्कपट व शांत वृत्तीचे गृहस्थ आहेत. लहानपणीं त्यांच्या माझ्या कितीतरी चर्चा होत व त्यांमध्यें पुष्कळच वेळ जाई. तेव्हांपासून त्यांच्या सरळपणाविषयीं माझी खात्री झालेली आहे. कांहीं अंशीं प्रकृतीमुळें पण बहुतेक स्वभावामुळेंच ते सार्वजनिक कार्यांत फारसे गाजले नाहींत. पण आजपर्यंत केव्हांहि आपल्या मताप्रमाणें वागण्यास ते कचरले नाहींत. अलीकडे कित्येक वर्षें प्रकृतीमुळें ते कोणच्याहि-सार्वजनिक कार्यांत फारसा भाग घेऊं शकले नसतील. परंतु अंगीकृत कार्या-पासून ते केव्हांहि ढळलेले नाहींत.

शंकररावांची रहाणी जवळ जवळ एकाद्या तपस्व्याप्रमाणें आहे व तपस्वी पुरुषाचे पुष्कळसे गुणहि त्यांच्या अंगीं आहेत. महाराष्ट्रसाहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदीं त्यांची योजना करून पुणेकरांनीं जसा त्यांचा गौरव केला तसा स्वतःचाहि करून घेतलेला आहे. महाराष्ट्र साहित्यसंमेलन ही महाराष्ट्राची एक प्रमुख संस्था आहे व तिचें आधिपत्य ही मोठी जबाबदारीची जागा आहे. मुंबई येथें भरलेल्या प्रांतिक साहित्यसंमेलनाचे ते








अध्यक्ष होते व आतां त्याहीपेक्षां उच्च पदावर त्यांची निवडणूक झालेली आहे. त्या पदाची जबाबदारी ते उत्तम प्रकारें पार पाडतील याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. तसेंच पाहिलें तर शंकरराव हे आमूलाग्र साहित्यिक आहेत असें मला वाटतें. उत्कृष्ट साहित्यिक निष्क्रिय नसतो. शंकरराव निष्क्रिय आहेत असें त्यांचा शत्रु कोणी असल्यास म्हणूं शकेल असें वाटत नाहीं.

महाराष्ट्रवाङ्मयाची वीण ही अद्वैतावर रचलेली आहे हें ज्ञानदेवापासून ते रामजोश्यांपर्यंत सर्वांनीं सांगितलें आहे. त्या अद्वैताची आज महाराष्ट्राला किंबहुना हिंदुस्थानला फार जरूरी आहे. महाराष्ट्रप्रांतानें परकीयांना झुगारून स्वराज्य स्थापन केलें होतें. त्यांत पुढें दोष शिरले व तें नष्ट झालें. पण आतां सर्व (?) देशाला स्वराज्य पुनः मिळालेलें आहे व या नव्या हिंदीस्थानात "अद्वैत" कसें नांदेल, त्याला काय उपाययोजना करावी याबद्दल पुष्कळ ठिकाणीं विचार चालू आहेत. त्या विचारांना हि कदाचित् शंकररावांचें भाषण चालना देईल. शंकररावांना पुष्कळ आयुष्य आणि उत्तम आरोग्य मिळावें आणि त्यांच्या लेखणींतून आणखी उत्तम ग्रंथ प्रकट व्हावेत अशी इच्छा प्रकट करून हें लिहिणें संपवितों.

— प्रा. माधव दामोदर अळतेकर

---

## आचार्य जावडेकरांचें वैचारिक विभूतिमत्त्व

जावडेकरांस मी प्रथमतः ओळखूं लागलों तो ते माझ्या मित्रांचे एक मित्र म्हणून. माझे जुने मित्र मुंबईच्या न्यू सिटिझन बँकेचे व्यवस्थापक श्री. द. दा. देशपांडे यांचे ते मित्र असत. दोघेहि तत्त्वज्ञानाचे पदव्युत्तर विद्यार्थी असून 'न्यू इंग्लिश स्कूल' मध्यें सरकारी शिक्षक होते. जावडेकरांचा वाचनाचा हव्यास, त्यासाठीं ते करीत असलेले परिश्रम व पुष्कळसें द्रव्य खर्चून त्यांनीं जमविलेली तत्त्वज्ञानावरील ग्रंथसामग्री हे त्या वेळीं त्यांच्या परिचितांचा मोठ्या सादर कौतुकाचे विषय असत. हे त्यांचे ग्रंथ माझे मित्र देशपांडे यांजकडे मी पाहत असें व मीहि तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी असल्यामुळें जावडेकरांविषयीं माझें कुतूहल त्याच वेळीं जागृत झालें होतें.

पुढें जावडेकरांचा प्रत्यक्ष परिचय होण्याची संधि आली ती जावडेकरांनीं पुण्यास टिळकमहाविद्यालयांत १९२६।२७ सालीं अध्यापनास सुरुवात केल्यावर. मध्यंतरीं जावडेकर इस्लामपुरास जाऊन तेथें काँग्रेसप्रचार व हरिजनवसतिगृहाची स्थापना वगैरेसारखीं कार्यें करून ते परत पुण्यास अध्ययन–अध्यापन–लेखन करण्याचें ध्येय निश्चित करून आले होते. त्यावेळीं टिळक महाविद्यालयांतील माझे मित्र आचार्य हर्षे यांजमार्फत जावडेकरांशीं चांगला परिचय होण्याची संधि लाभली. हाच परिचय पुढें वाढत जाऊन जावडेकरांच्या विचारविभूतीचें दर्शन अधिकाधिक घडत गेलें. जांभेकरांच्या 'लोकशिक्षणां'त त्यांचें लेखन चालूं असतां हें दर्शन सतत व विशेष मूर्तस्वरूपांत घडत असें. त्यानंतर मात्र जावडेकरांच्या स्थलांतरामुळें व इतर व्यवसायभेदामुळें तें दर्शन तितकें सतत व मूर्तस्वरूपांत घडत नाहींसें झालें आहे. अर्थात् या विविध अवस्थांतून गेलेल्या परिचयांत त्यांच्या विभूतीचा माझ्या मनावर झालेला मूळ संस्कार विकास पावलेला आहे, बदललेला नाहीं.

आणि हा संस्कार म्हणजे जावडेकर हे एक मूलगामी विचारवंत सिद्धांती आहेत हा होय. जावडेकरांचें बौद्धिक चरित्र पाहिलें तर या माझ्या संस्काराचें यथार्थत्व सहज लक्षांत येईल. डेक्कन कॉलेजांत जावडेकर हे मूळचे गणिताचे विद्यार्थी होते. परंतु त्यांच्या विचारी विभूतीनें तो विषय मध्येंच सोडून त्यांस बी.ए.च्या परीक्षेसाठीं तत्त्वज्ञान विषय घ्यावयास लावला. डेक्कन कॉलेजांत तत्त्वज्ञान या विषयाच्या अध्यापनाची सोय नसल्यामुळें ते पुण्याहून मुंबईस विल्सन कॉलेजांत गेले. तेथें जॉन मॅकेन्झी व वाडिया (पेस्तनजी अरदेशर) हे त्यांचे प्राध्यापक होते. विल्सन कॉलेजांतील या एकाच वर्षाच्या वास्तव्याचा जावडेकरांवर विशेष व अक्षय परिणाम झाल्यासारखा दिसतो. त्यांनीं तेथें तत्त्वज्ञानाचा अभ्यास तर केलाच; परंतु तत्त्वज्ञानाची खरी परिसमाप्ति










घटपटादिचर्चा किंवा ब्रह्ममायानिरूपण एवढ्यांतच होत नसून ती खरी समाजव्यवस्थितिविचारांतच झाली पाहिजे—हा महत्त्वाचा सिद्धान्तहि त्यांनीं आत्मसात् केला. जावडेकरांची ही भूमिका आणि त्यांचा नंतरचा वैचारिक विकास पाहातां त्यांचे प्राध्यापक पेस्तनजी वाडिया यांचेशीं त्यांचें साम्य सहजच सुचतें. वाडिया स्वतःएका बाजूस सत्ताशास्त्र (Metaphysics), न्यायशास्त्र (Logic) वगैरे तात्त्विक शास्त्रें शिकवीत तर दुसऱ्या बाजूस अर्थशास्त्र, राजकारण इत्यादि समाजशास्त्रांचेंहि अध्यापन ते करीत; व या त्यांच्या अध्यापनांत ते सामाजिक शास्त्रांस तत्त्वज्ञानाची बैठक व तत्त्वज्ञानास समाजदृष्टि पुरवीत असत.

तत्त्वज्ञान घेऊन बी. ए. झाल्यानंतर जावडेकरांनीं एम्. ए. करतां इतिहास, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र हे विषय घेऊन एम्. ए. चाहि अभ्यास परिश्रमपूर्वक पूर्ण केला; पण प्रत्यक्ष परीक्षेस बसण्याचा विचार त्यांनीं सोडून दिला. याचें प्रमुख कारण गांधीजींच्या असहकारितेच्या कार्यक्रमाचें त्यांना वाटलेलें आकर्षण हें होय. अर्थात् त्यांना पदवीचा हव्यास नव्हताच. तत्त्वज्ञानाचा मूलगामी अभ्यास केल्यानंतर यापुढें राजकारणाच्या व समाजजीवनाच्या अभ्यासास व त्याप्रमाणें आचरणास लागलें पाहिजे अशी त्यांची श्रद्धा बनत चालली. याच श्रद्धेंत त्यांचें इस्लामपूरचें समाजकार्य झालें.

परंतु हें कार्य कांहीं वर्षें केल्यानंतर आपलें जीवनकार्य प्रत्यक्ष प्रचारापेक्षां विचार व लेखन हेंच होय असा त्यांस प्रत्यय आल्यानेंच त्यांनीं लेखन सुरू केलें. त्यांचा पहिला मोठा ग्रंथ "राजनीतिशास्त्र-परिचय" हा होय. या त्यांच्या महत्त्वाच्या ग्रंथामुळेंच त्यांची प्रसिद्धि होऊन पुण्याच्या टिळक-महाविद्यालयांत अध्यापक म्हणून त्यांची नियुक्ति झाली. मूळ तत्त्वज्ञानांत अवगाहन करणाऱ्या विचारवंतानें समाजविचाराकडे वळविलेल्या दृष्टीचा तो ग्रंथ म्हणजे परिपाक आहे. या कालखंडांत तत्त्वज्ञानांतून समाजविचारांत व तेथून पुन्हां तत्त्वज्ञानांत—अशी जावडेकरांची बुद्धि अप्रतिहत संचार करीत होती. खुद्द तत्त्वज्ञानावर त्यांनीं प्रत्यक्ष असें थोडें लिहिलेंहि; परंतु त्यापेक्षां तत्त्वज्ञानांतील मूलगामी कल्पना व सिद्धांत यांचा त्यांनीं आपल्या समाजविषयक लिखाणांत अनेक ठिकाणीं जो सुंदर उपयोग केला आहे त्यांत त्यांच्या बुद्धीचें तत्त्वशोधकत्व व समाजदृष्टि हे गुण उत्तम रीतीनें प्रतीत होतात. तत्त्वज्ञान म्हणजे एक समाजविमुख विषय, व तत्त्वज्ञ म्हणजे एक संन्यस्त व्यक्ति— हे समज जावडेकरांच्या वैचारिक विभूतिमत्त्वावरून अगदीं लटके पडतात.

यानंतर त्यांनीं बरेंच राजकीय लिखाण केलें व त्यापैकीं पुष्कळसें जांभेकरांच्या 'लोकशिक्षणां'त. जांभेकर–जावडेकरांचा निकट व अकृत्रिम स्नेह. त्यांची वैचारिक भूमिका बहुतांशीं एकच होती. यामुळें जांभेकरांनीं जावडेकरांकडून या कालखंडांत खूपच लेखन करविलें. याहि लेखनांत जावडेकरांची मूलसिद्धांत शोधण्याची दृष्टि प्रतीत होत असे. विशेषतः सामाजिक, आर्थिक व राजकीय जीवनांतील नियंत्रक कल्पनांचा वैकासिक आढावा घेण्याची व त्यावरून अनुमानें काढण्याची त्यांची प्रवृत्ति व हौस त्यांच्या लेखनांत भरपूर दिसे. महाराष्ट्रांतील राजकीय कल्पनांच्या विकासांत टिळकयुगांतून गांधीयुग जेव्हां अवतीर्ण झालें तेव्हां त्यांची वैकासिक सांधेजोड **तात्त्विक दृष्ट्या** विशद करून दाखविण्याचें बौद्धिक कार्य केवळ जावडेकरांनींच केलें असें मला वाटतें. किंबहुना, टिळकतत्त्वज्ञानांतूनच गांधीतत्त्वज्ञान सहजपणें विकास पावलें हा सिद्धांत महाराष्ट्रांत तरी जावडेकरांनींच विशेष प्रामुख्यानें प्रस्थापित केला. "टिळकांचें तें कांहीं वेगळेंच होतें; गांधींनीं कांहीं निराळेंच खूळ काढलें आहे!" असें प्रतिपादणाऱ्या महाराष्ट्रीय विचारवंतांस अनुलक्षून जावडेकरांनीं 'लोकशिक्षणां'त 'असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा' या मथळ्याचा जो विख्यात लेख लिहिला आहे त्याची या संबंधांत आठवण होणें अपरिहार्य आहे. त्या लेखांत जावडेकरांच्या तात्त्विक—व साहित्यिकहि—विभूतीचें प्रातिनिधिक दर्शन घडतें असें मला वाटतें. त्यांत ऐतिहासिक भूमिका, तत्त्वसिद्धांती व समन्वयी दृष्टि, आणि शुद्ध साहित्यिक गुण यांचा सुंदर मिलाफ झाला आहे यांत शंका नाहीं.

त्यानंतरच्या अलीकडच्या काळांतील जावडेकरांच्या लिखाणावरून त्यांच्या बुद्धीस आतां सिद्धांती स्थिरता प्राप्त झाली आहे असें वाटतें. विशेषतः

## संमेलनाध्यक्ष जावडेकर : अभिनंदन व व्यक्तिदर्शन

त्यांचा महाग्रंथ " आधुनिक भारत " हा त्यांच्या पक्व व स्थिर बुद्धीचें अत्यंत मनोहारी फळ होय. याच सुमारास त्यांची सांगलीस एकदां गांठ पडली असतांना संभाषणांत मीं त्यांस विचारल्यावरून आपलें तात्त्विक सिद्धांतन आतां स्थिर झाल्याचा आत्मप्रत्यय व आत्मविश्वास आल्याचें त्यांनीं मजजवळ मोकळेपणानें सांगितल्याचें स्मरतें. " Henceforward I may grow, but I shall not change " असें त्यावेळीं त्यांनीं उद्गार काढले. बैठकींतील संभाषणांत मुख्य मुद्द्याचा उच्चार करीत असतांना एकदम जमीनिवर उजव्या हाताची जोरदार थाप मारण्याची जी त्यांची ढब आहे ती त्यांच्या सिद्धांती आत्मप्रत्ययाचीच द्योतक आहे. हिंदुस्थानच्या प्रदीर्घ सांस्कृतिक इतिहासांत गांधीयुगाचें कांहीं विशिष्ट स्थान असून ' सत्याहिंसे 'च्या गांधीतत्त्वज्ञानानें या इतिहासांत कांहीं अक्षय स्वरूपाची भर टाकल्याबद्दलचा त्यांचा सिद्धांत त्यांनीं आपल्या महाग्रंथांत ऐतिहासिक विवेचनपूर्वक व सविस्तरपणें मांडला आहे. लोकशाही हा शासनसंघटनेचा एक सर्वसामान्य प्रकार आहे. परंतु प्रत्यक्ष जीवनांत तो स्वीकारणाऱ्या लोकांच्या संस्कृतीस धरून त्याचीं विविध स्वरूपें दृग्गोचर होणारच. लोकसंस्कृतिभेदाप्रमाणें लोकशाहीचेहि प्रकारभेद होणें अपरिहार्य आहे; व यामुळेंच हिंदी संस्कृतीच्या वैशिष्ट्यावरून हिंदी लोकशाहीचेंही वैशिष्ट्य ठरणार आहे. हिंदी संस्कृतीचें अधिष्ठान आध्यात्मिक, धार्मिक, नैतिक स्वरूपाचें असल्यानें हिंदी लोकशाहींतहि त्याच प्रकारच्या कल्पनांस प्राधान्य मिळणार हें उघड आहे. हिंदुस्थानांत नवीनच अवतीर्ण झालेल्या लोकशाहीस गांधींनीं हा नैतिक पाया पुरविला आहे, हें गांधींचें अवतारकार्य होय व त्याची जोपासना आपण विशेष दक्षतेनें करून जगांतील इतिहासांत हिंदचें वैशिष्ट्यपूर्ण स्थान टिकविलें पाहिजे, असा जावडेकरी तत्त्वज्ञानाचा संदेश आहे. गांधींच्या विचारप्रणालीस भक्कम अशी ऐतिहासिक व तात्त्विक भूमिका पुरविणारा व त्यासाठीं इतिहास, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रें यांच्या अव्वल ज्ञानाचा मोठाच प्रपंच प्रभावीपणानें मांडणारा असा दुसरा लेखक या किंवा दुसऱ्या देशांत बहुशः सांपडणार नाहीं असें वाटतें. ' गांधीवादाचे अव्वल प्रतीचे एकमेव तत्त्वज्ञ ' असें जावडेकरांचें वर्णन केल्यास तें सार्थच ठरेल असें वाटतें. हिट्लरच्या अनुयायांत रोझेनबर्गचें जें स्थान होतें, तेंच (भिन्न अर्थानें, गांधींच्या अद्वितीय राजकारणाचें वैशिष्ट्य लक्षांत घेऊन) गांधींच्या अनुयायांत जावडेकरांचें म्हणतां येईल.

अगदीं अलीकडे जावडेकरांचें वैयक्तिक तत्त्वज्ञान समाजवादाकडे वळलें आहे असें दिसतें. परंतु त्यांतहि त्यांची शुद्ध गांधीवादी बैठक त्यांनीं सोडलेली नाहीं. ते 'वाढत आहेत, पण बदलत नाहींत' असें त्यांच्याच शब्दांत म्हणतां येईल. पण त्या संबंधांत विशेष लिहिण्याची प्रस्तुत तरी जरूरी नाहीं. वैचारिक जीवनाच्या या सर्व अवस्थांतून जावडेकर जात असतांना त्यांची मूलगामी विचारवंत सिद्धांती विभूति सर्वत्रच प्रतीत होत आली आहे. शास्त्रें अनेक असलीं तरी समग्र ज्ञान हें एकच आहे व त्याच दृष्टीनें शास्त्रांचा समन्वय लावला पाहिजे; व केवळ ज्ञानाचा समन्वय साधून उपयोग नाहीं, तर त्याचा उपयोग व्यावहारिक समाजजीवनास झाला पाहिजे; जीवनाचे आर्थिक, राजकीय व इतर सामाजिक प्रश्न सोडविण्यांतच त्याची खरी परिसमाप्ति आहे—ही जावडेकरांची मूळ जाज्वल्य श्रद्धा आहे व तीस अनुलक्षूनच त्यांनीं परिश्रमपूर्वक व रुग्ण प्रकृतीची तमा न धरतां आपलें सर्व लेखनकार्य केलें आहे.

अशा सिद्धांती साहित्यिकाचा महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचा अध्यक्ष म्हणून गौरव होत आहे, ही अत्यंत उचित अशी गोष्ट आहे. त्या योगें आम्हां जावडेकरांच्या जुन्या मित्रांना फार आनंद होत आहे. आणि जावडेकरांच्या या सन्मानाचें निरागस व हृद्य वैशिष्ट्य असें कीं त्यांत त्यांचे निवडणुकींतील प्रतिस्पर्धी प्रा. कृ. पां. कुलकर्णी हेहि आत्मीयतेनें भाग घेत आहेत. हीहि गोष्ट जावडेकरांच्या वैयक्तिक चांगुलपणाचीच निदर्शक नव्हे काय ?

— प्रा. दे. द. वाडेकर








## सत्याग्रही समाजवादी आचार्य जावडेकर

यंदाच्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद आचार्य जावडेकर यांना देण्यांत आलेलें पाहून महाराष्ट्रांतील धडपडणाऱ्या तरुण कार्यकर्त्यांना व मानवधर्म–उपासकांना विशेष समाधान वाटेल. इतक्या उशीरा कां होईना पण आचार्य जावडेकरांची अध्यक्षपदीं निवड करून मराठी साहित्यसंमेलनानें आपली गुणग्राहकता व्यक्त केली आहे. यामुळें आचार्य जावडेकरांच्यापेक्षां साहित्यसंमेलनाचाच अधिक गौरव आहे. एक ध्येयवादी पंडित व वृत्तपत्रसंपादक म्हणून आचार्य प्रसिद्ध आहेत. 'नवशक्ति' व 'लोकशक्ति' यांचे संपादक म्हणून त्यांनीं लिहिलेल्या कित्येक लेखांत लो. टिळक व आगरकर यांच्या प्रतिभेचें सामर्थ्य दृग्गोचर झालें आहे. त्यांची वाङ्मयसेवाहि अतिशय मोलाची आहे. मराठी वाङ्मयांत असलेली शास्त्रीय ग्रंथाची उणीव त्यांच्या ग्रंथलेखनानें भरून काढली आहे. 'राजनीतिशास्त्रपरिचय', 'राज्यशास्त्रमीमांसा', 'लोकशाही', 'गांधीवाद', 'अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र', 'आधुनिक भारत' वगैरे ग्रंथ लिहून त्यांनीं मराठी वाचकांना आधुनिक राज्यशास्त्र–समाजशास्त्रांचीं दालनें खुलीं करून दिलीं आहेत. त्यांनीं लिहिलेल्या 'आधुनिक भारता'चें परीक्षण करतांना कै. वामनराव जोशी यांनीं असे उद्गार काढले कीं, "लोकमान्यांच्या 'गीतारहस्या'नंतर 'आधुनिक भारता'इतका स्वतंत्र बुद्धीचा दुसरा ग्रंथ मराठींत सांपडणार नाहीं." आचार्यांच्या सर्वच लिखाणाला एक वैचारिक बैठक आहे. अनेक वर्षांच्या चिंतनानें, वाचनानें व राजकीय चळवळीच्या अनुभवानें त्यांनीं समाज-परिवर्तनासंबंधीं एक विशिष्ट असा प्रगतिशील दृष्टिकोन बनविला आहे. आचार्यांनीं आपल्या एका प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें "सत्याग्रह हा श्रुतिरूप सनातनधर्माचें आधुनिक रूप असून समाजवाद हा आजचा स्मृतिरूप युगधर्म आहे. अर्थात् हा सत्याग्रही समाजवाद केवळ एका राष्ट्राचा धर्म नसून तो मानव-धर्मच आहे. समाजवादाचा जनक मार्क्स व सत्याग्रहाचे जनक महात्मा गांधी हे आधुनिक प्रजाधर्मांचे प्रणेते आहेत. राजर्षि व ब्रह्मर्षि यांच्या धर्मांचा समन्वय करून मध्ययुगीन महाराष्ट्रानें भारताचें एकीकरण करण्याचा प्रयत्न केला. तोच महाराष्ट्र आधुनिक युगास अनुरूप अशा सत्याग्रही व समाजवादी क्रांतिशास्त्राचा समन्वय करील अशी माझी अपेक्षा आहे. तसें होण्यास महाराष्ट्राचा आत्मा सत्याग्रही व बुद्धि समाजवादी बनली पाहिजे." आचार्यांच्या तत्त्वज्ञानाचें हें सारसर्वस्व आहे व त्यांच्या सर्व लिखाणाची ही पार्श्वभूमि आहे असें आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल.

आचार्य जावडेकरांनीं १९२० पासून १९४२ पर्यंत म्हणजे महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीच्या प्रारंभापासून तों 'चले जाव' चळवळीपर्यंत स्वातंत्र्ययुद्धांत भाग घेतलेला आहे. धकाधकीचें व रेटारेटीचें राजकारण त्यांच्या शरीर-प्रकृतीला व स्वभावप्रवृत्तीला मानवणारें नसलें तरी महात्मा गांधींचें नेतृत्व संपूर्णतया मान्य करून राष्ट्रीय सभेनें चालविलेल्या स्वातंत्र-युद्धांत त्यांनीं उडी घेतली. १९२२ सालानंतर गांधींच्या नेतृत्वाला विरोध करणारा जो 'केसरी'पक्ष महाराष्ट्रांत निर्माण झाला त्या पक्षाला पद्धतशीर विरोध करून त्याचें मतखंडन अत्यंत प्रभावीपणें व शास्त्रशुद्धतेनें करून लो. टिळकांच्या इस्टेटीचा वारसा 'केसरी'-कंपूकडे असला तरी त्यांच्या वैचारिक व राजकीय कार्याचा वारसा महाराष्ट्रांतील कॉंग्रेसपक्षाकडे आहे, हें त्यांनीं निर्विवादपणें सिद्ध केलें. गांधीवाद ही एक भावनाप्रधान बोवाबाजी नसून तो एक शास्त्रपूत क्रांतिमार्ग आहे, हें त्यांनीं आपल्या तर्कशुद्ध व ऐतिहासिक पद्धतीच्या कोटिक्रमानें सिद्ध केलें. म. गांधींचा असहकार हा लो. टिळकांच्या बहिष्कारयोगाची अपरिहार्य परिणति आहे हें त्यांनीं आग्रहानें प्रतिपादिलें व शंकरराव देव, दास्ताने प्रभृति मंडळी महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें नेतृत्व प्रभावी करण्या-करतां जी चळवळ करीत होते त्या चळवळीस बहुमोल साहाय्य केलें. आचार्य गांधीवादाचें महा-राष्ट्रांतील सर्वश्रेष्ठ प्रचारक व भाष्यकार आहेत. महाराष्ट्रांतील सुशिक्षित तरुण पिढीला गांधीवादाचें रहस्य समजावून देण्याचें कार्य आचार्यांच्या ग्रंथांनीं-च करून दिलें आहे. १९४५ सालापर्यंत कॉंग्रे-सच्या गोटांत आचार्य जावडेकर हे कॉंग्रेसचा जिवंत








विचारानिधि (brain-trust) आहेत असें सार्थ म्हटलें जात होतें. तात्यासाहेब केळकरांनीं लिहिलेल्या 'राज्यशास्त्र' या पुस्तकाचें आचार्यांनीं केलेलें परीक्षण वाचलें किंवा 'असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा' किंवा 'लो. टिळकांचें विवेकी राजकारण आणि बॅ. सावरकरांची अविवेकी हुल्लड' हे त्यांचे १९३९ सालीं लिहिलेले लेख आजहि वाचले तरी त्यांची लेखणी किती प्रभावी व विदारक आहे व आपल्या तर्कशुद्ध कोटिक्रमानें व शास्त्रशुद्ध ज्ञानानें प्रतिपक्षाच्या ते कशा चिंधड्या उडवूं शकतात, हें आपल्या प्रत्ययास येईल.

आचार्यांचा कांहीं विशेष असला तर तो हाच आहे कीं त्यांच्या अंगीं विद्वत्ता व पांडित्य असून त्यांच्यांत कोणत्याही तऱ्हेची अहंमन्यता किंवा सांप्रदायिकता आढळत नाहीं. अनेक वर्षांच्या सेवेनें महाराष्ट्रांत त्यांना प्रतिष्ठा प्राप्त झाली असूनहि त्यांच्या अंगांत किंचितहि आढ्यता दिसून येत नाहीं. म्हणून महाराष्ट्रांतील बऱ्याच पुणेरी विद्वान् मंडळींत दिसून येणारी संकुचित प्रांतीयता व अखिल भारतीय नेत्यांविषयीं असूया त्यांच्यांत दिसून येत नाहीं. सर्व प्रगतीचा व ज्ञानाचा अंत महाराष्ट्राच्या परंपरेंत सामावलेला आहे अशी कूपमंडूकवृत्ति व तिच्या पोटीं उद्भवणारी अहंमन्यता यांचा लवलेशहि आचार्यांना शिवला नाहीं. म. गांधींच्याप्रमाणेंच पं. नेहरूंच्या नेतृत्वाचा गौरव ते करीत आले आहेत. ४२ च्या क्रांतियुद्धांत करण्यांत आलेली हिंसा अपरिहार्य व समर्थनीय होती असें त्यांनीं निर्भयपणें प्रतिपादिलें व कॉंग्रेसला म. गांधींची सत्याग्रही परंपरा चालवावयाची असेल तर श्री. जयप्रकाश नारायण यांच्या समाजवादी पक्षाशीं कॉंग्रेसनें अधिकाधिक सहकार्य केलें पाहिजे असें ते निर्भयपणें आजहि सांगत आहेत. त्यामुळेंच महाराष्ट्रांतील तरुण पिढीमध्यें त्यांचेबद्दल आदराची व आपुलकिची भावना दृढमूल झाली आहे.

दुर्दैवानें आचार्यांना दम्याची व्यथा असल्यामुळें निरुपायानें कार्यनिवृत्त व्हावें लागलें आहे. त्यांना कांहीं व्यसन असेल तर तें वाचनाचें व चर्चेचें आहे. राजकीय प्रश्नावर चर्चा करण्यांतच त्यांना काव्यानंदाचा आनंद मिळत असावा. नवीन नवीन विचार समजावून घेण्याची व आत्मसात् करण्याची जवानी त्यांच्या बुद्धींत आजहि दिसून येते. त्यांचा दृष्टिकोन व्यापक असल्यामुळें जागतिक घडामोडींशीं त्यांचा पूर्ण परिचय आहे. मानवधर्म प्रसृत व्हावयाचा असेल तर 'एक जगा'ची कल्पना तातडतोब मान्य झाली पाहिजे अशी त्यांची तळमळ आहे. हीच त्यांची धर्मभावना आहे. महाराष्ट्रांतील विचारवंतांमध्यें ही व्यापक दृष्टि व समतेची आध्यात्मिक तळमळ क्वचितच दिसून येते. आचार्यांच्या या द्रष्टेपणामुळें व सत्यनिष्ठेमुळें अनेकांना त्यांचे ग्रंथ मार्गदर्शन करूं शकले आहेत. सध्यांच्या मतामतांच्या गलबल्यांत दिङ्मूढ झालेल्या जनतेला मार्गदर्शन करणारे व स्फूर्ति देणारे विचार ते अध्यक्षपदावरून प्रतिपादन करतील व विशेषतः संयुक्तमहाराष्ट्राच्या प्रश्नाचा विचार पक्षाभिनिवेशानें व राजकीय संधिसाधूपणानें होण्याऐवजीं राष्ट्रीय ऐक्यास धक्का न लागतां व इतर अधिक महत्त्वाचे आर्थिक व सामाजिक प्रश्न दृष्टीआड केले न जातां सूज्ञपणें कसा करतां येईल हें ते दाखवतील अशी मला खात्री वाटते. या वर्षीं साहित्यसंमेलन पुण्यास असल्यामुळें व आचार्य जावडेकर त्या संमेलनाचें अध्यक्षपद विभूषित करणार असल्यामुळें येत्या संमेलनाची अनेक लोक मोठ्या आतुरतेनें वाट पाहात आहेत.

—श्री. पु. ह. पटवर्धन

---

## माझे थोर सल्लागार व सहायक

ज्यांच्या सहवासामुळें माझं जीवन समृद्ध झालं असं मला वाटतं त्यापैकीं शंकररावजी हे एक आहेत. साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदीं शंकररावजींची निवड यापूर्वीच व्हायला पाहिजे होती. पण ती यापूर्वीं झाली नाहीं हें एका अर्थीं बरेंच झालें! कारण आज पूर्ण आत्मीयतेनें कॉंग्रेसच्या चुका दाखवणारे जे कांहीं थोडे अधिकारी पुरुष आहेत त्यांत शंकररावजींचा दर्जा फार मोठा आहे. ते कुठल्याहि अधिकाराच्या जागेवर








नाहींत व कुठल्याहि पक्षाचे बंदे नाहींत. ते केवळ सदसद्‌विवेक बुद्धीचे बंदे असल्यामुळें, महाराष्ट्रांतील सर्व बुद्धिवादी जनता त्यांच्या आगामी अध्यक्षीय भाषणाकडे मोठ्या उत्सुकतेनें पाहात आहे. अशा अनेकांपैकीं मी एक आहे. शंकररावजींची व माझी ओळखहि जवळजवळ वीस वर्षांची आहे. ती माझ्या लिखाणानेंच झाली. १९३० सालीं मी 'तरुण पिढीचें राजकारण किंवा सत्यशोधकांना इषारा' या नांवाचें एक छोटें पुस्तक लिहिलें व तें शंकररावजी जावडेकर यांच्याकडे अभिप्रायार्थ पाठविलें. त्यावेळीं त्यांची माझी तशी कांहीं प्रत्यक्ष ओळख नव्हती. पण माझें लिखाण त्यांना बरेंच आवडलें व त्यांनीं लगेच अभिप्राय पाठवला, तो मुद्दाम सारांशानें देत आहे. कारण याचमुळें त्यांचे माझे संबंध जवळ येत गेले. त्यांनीं दिलेल्या अभिप्रायाचा सारांश असा : 'आपल्या पुस्तकांतील विचार सत्यशोधक समाज, ब्राह्मणेतर जनता व एकंदर महाराष्ट्र यानें ग्रहण केल्यास महाराष्ट्राच्या कर्तृत्वास योग्य दिशा लागून त्याच्या चालू इतिहासास नवें वळण लागेल. विशेषतः गांधींचा अहिंसावाद व कम्युनिझम् यांची जी जोड या पुस्तकांत दृष्टीस पडते ती माझ्या मतें फार महत्त्वाची आहे.'

शंकररावजींनींहि आतांपर्यंत कम्युनिझमचा व अहिंसावादाचा समन्वय करणारे विचारच सारखे प्रसृत केल्यामुळें वैचारिकदृष्ट्या ते व मी जवळ येत गेलों, त्यांतून स्नेहसंबंध जुळत गेले व ते हळूहळू दृढतरच झाले. ज्या वेळीं माझा वैचारिक गोंधळ होई, किंवा ज्यावेळीं मला कांहीं राजकीय बाबतींत सल्ला घ्यावीशी वाटे त्यावेळीं मी इस्लामपूरला जाऊन त्यांची गांठ घेत असे व त्यांचे घरीं मुक्कामहि करीत असे. तेथें ज्ञान, सौजन्य, प्रेमळपणा यांचा प्रत्यक्ष अनुभव येई. मिष्टान्न—जेवणाबरोबर बुद्धीची भूकहि शांत होई. बऱ्याच ग्रंथांचें अध्ययन केल्याचें श्रेय त्या एका दिवसांत पदरीं पडे. त्यांनीं 'लोकशक्ती'चें संपादकत्व सोडण्याच्या वेळीं मी 'अखंड भारत' नांवाचें साप्ताहिक कोल्हापुरास काढलें. श्री. वि. स. खांडेकर यांनीं वाङ्मयीन साहाय्य देण्याचें कबूल केलें व सहायक म्हणून नांवहि घालूं दिलें. शंकररावजी हेही सहायक असून २।३ वर्षें ते लेख देत होते. 'अखंड भारतां'त आलेल्या त्यांच्या अग्रलेखांचा लेखसंग्रहहि मला छापतां आला.

आज कॉंग्रेसच्या एकंदर धोरणाबद्दल त्यांची जीं मतें आहेत, तशींच माझीं पण जवळजवळ आहेत. मतभेदाचा थोडासा काल होता तो आतां निघून गेल्यामुळें पुनः वैचारिकदृष्ट्या ते व मी जवळ येत आहोंत. स्नेहसंबंध तर आहेच आहे.

—श्री. माधवराव बागल

---

## तपस्वी साहित्यकार

कित्येक वर्षें मी आचार्य जावडेकरांना "फिलॉसफर" या टोपणनांवानें संबोधीत आलें आहे. तत्वज्ञानी केवळ उपदेश देत नाहीं; दृष्टि देतो. श्री. जावडेकरांनीं शिक्षक म्हणून अनेक वर्षें काम केलें आहे. पण ते शिक्षक नसते तरी गुरुस्थानीं विराजमान झालेच असते. कारण त्यांच्या प्रभावी लेखणीनें त्यांना थोर साहित्यकार बनविलें आहे आणि खरा साहित्यकार हा समाजाचा गुरु असतो.

पण श्री. जावडेकर केवळ साहित्यकार नाहींत. ते एक देशसेवकहि आहेत. जनतेचें कल्याण समजण्याची व करण्याची सद्बुद्धि त्यांच्यांत उत्कटतेनें वसत आहे. प्रजेच्या उन्नतीशिवाय साहित्याची उन्नति होत नाहीं, हें माहीत असल्यामुळें त्यांनीं ज्या प्रजास्वातंत्र्याचा पुरस्कार वर्षानुवर्षें केला, त्यासाठीं ते कारावासांतहि गेले. वित्त किंवा सत्ता यांची पर्वा त्यांनीं केली नाहीं. विद्या, संस्कारिता व तप यांच्या बळावर त्यांनीं समाजांत प्रतिष्ठा मिळवली.

शिक्षक, समाजसेवक, पत्रकार, व लेखक या नात्यांनीं श्री. जावडेकरांनीं मोठें यश मिळविलें आहे. पण केवळ वाङ्मयी सेवा हें त्यांचें ध्येय नव्हे. देशकार्य करीत असतांना आपले परिपक्व विचार जनतेला शिकविण्यासाठीं त्यांनीं लेखणीचा साधन म्हणून उपयोग केला आहे. वर्तमानपत्राला त्यांनीं संस्कृतीचें केंद्र बनविलें. वाङ्मयाला आपल्या अवलोकन—निरीक्षण—विचारांचें असाधारण दर्पण








बनविलें. मराठी वाङ्मयांत श्री. जावडेकरांचें लिखाण त्यांतील उच्च अभिरुचि व सदाचाराची प्रेरणा या दोन गुणांमुळें तेजस्वी बनलें आहे. आपले विचार व अनुभव व्यक्त करणारी त्यांची उत्कटता लिखाणांतील प्रत्येक वाक्यांतून ओसंडत असते. सामान्य जनसमाजाला त्यांचें लिखाण झेंपलें नाहीं, त्यांत रसिकता दिसून आली नाहीं तरी त्यांत कृत्रिमताहि नाहीं. मननाइतकेंच त्यांचें संभाषण व संभाषणाइतकेंच त्यांचें लिखाण उत्कट असतें व ही त्यांची मोठी शक्ति आहे, हें कबूल केलें पाहिजे.

साहित्याचा खोल अभ्यास, त्यासाठीं लागणारी प्रभावी सिसृक्षा आणि इतरांबरोबर तटस्थपणें विचार-विनिमय करण्याची शक्ति या तीन गोष्टींतून जिवंत साहित्य निर्माण होऊं शकतें. ज्याचें जीवन तपस्वि-सहज साधेपणांत व्यतीत झालें आहे, योग्यांना साजेल अशी ज्याची निर्मल व निरहंकार वृत्ति आहे, अशा थोर तत्त्वचिंतकाच्या आत्म्याची अमृतकलाच शुभंकर साहित्याच्या रूपानें प्रकट झाली आहे असें कोण म्हणणार नाहीं !

अखंड साहित्यसर्जन करणाऱ्या आणि भारतवर्षाच्या सर्वसमन्वयी साधनेचा पुरस्कार करणाऱ्या शारदादेवीच्या शुद्ध उपासकाला यंदा साहित्यपरिषदेचें अध्यक्षस्थान लाभलें आहे यांत त्या स्थानाचा गौरव झाला आहे असें मला वाटतें. एरवीं निरिच्छ मुनींला भौतिक मानसन्मान, वित्त आणि पदवी यांचें महत्त्वच कोठें वाटतें ? भूतकालांतील भार हलका वाटावा व भविष्यकालाची भयानकता दूर करून तो उज्ज्वल व आकर्षक वाटेल असें मार्गदर्शन मिळवावें याकरितां सामान्य लोक थोर चिंतकाची कास धरतात व त्यांना आपल्या कुटींतून बाहेरील जगांत बोलावून आणतात. तसाच कांहीं प्रकार आतां झाला आहे. पवनारचा क्षेत्रसंन्यासी याच कार्यासाठीं परिव्राजक बनला आहे. आचार्य जावडेकर हेहि आपल्या सामर्थ्यशाली विचारांनीं सर्वोदयाचा मार्ग दाखवतील अशी आशा करूं या.

—श्री. प्रेमा कंटक

## 'लोकशिक्षणा'चे अभिमानी व महनीय लेखक

श्री. शंकरराव जावडेकरांचा व माझा प्रथम परिचय झाल्यास आज वीस वर्षें होऊन गेलीं ! ते स्वतः जसे पुणेंकर नव्हेत तसा मीहि नव्हे. आपापल्या परीनें महाराष्ट्राची सेवा करण्याचें कार्यक्षेत्र आम्हां उभयतांना प्रायः एकेच वेळीं असहकारितेच्या आंदोलनांतून प्राप्त झाल्यामुळें आमच्या सहकार्याचा योग पुणें येथें जुळून आला. खानदेश शिक्षणमंडळाच्या द्वारें अमळनेरास महत् प्रयासानें चालू केलेला राष्ट्रीय शिक्षणाचा असाधारण संस्मरणीय उपक्रम सरकारी नोकरशाहीकडून दडपला गेल्यामुळें त्या संस्थेच्या आजीवसेवकत्वास रामराम ठोकून १९२३ मध्यें मी बाहेर पडलों; आणि ह्या तत्त्वनिष्ठेच्या पार्यीच 'पुढें काय ?'च्या विवंचनेंत तीनचार वर्षें प्रायः अज्ञातवासांत घालविल्यानंतर, राष्ट्रीय शिक्षणाचेंच व्यापक स्वरूप म्हणून 'लोकशिक्षण' मासिकाचा ध्येयवादी उपक्रम पुणें येथें राहून करण्याचें मी ठरविलें.

ह्या समयीं पुण्यास 'चित्रमयजगत्' व डॉ. केतकरांचें 'विद्यासेवक' हीं प्रसिद्ध मासिकें चालू होतीं. वास्तविक आतांप्रमाणेंच तेव्हांहि मी स्वतः तर नाहींच, परंतु इतरांनींहि माझी गणना साहित्यिकवर्गांत कधींच केलेली नव्हती. आणि तत्पूर्वींच दोन वर्षें प्रा. ना. सी. फडके यांच्या कुशल नेतृत्वानें 'विजयप्रेस'चे उत्साही चालक रा. अनंतराव गोखले यांनीं चालू केलेल्या 'रत्नाकर' मासिकाचा बराच बोलबाला पुण्यांत व महाराष्ट्रांत झालेला होता. त्यामुळें 'लोकशिक्षणा'चा' हा नूतन उपक्रम जातिवंत साहित्यिकांच्या दृष्टीनें तरी कांहींसा रूक्ष व उपेक्षणीय गणिला गेला असल्यास नवल नाहीं ! कारण त्यांत 'जादूगार' फडके यांच्या 'गुजगोष्टी', खांडेकरांच्या लोभनीय लघुकथा, दिवाकरांच्या चटकदार नाट्यछटा, 'रविकिरणमंडळा'ची दिव्य काव्यप्रभा आणि माडखोलकर-माटेप्रभृति साहित्यिकांच्या टीका-चर्चा इत्यादि ललितलेखनाचा केवळ अभावच दिसून आला ! त्यांतून हे सर्व चतुर कलावंत साहित्यसम्राट् केळकर यांचाहि कृपाप्रसाद








मिळवून ' रत्नाकरा 'स भरती आणण्याच्या खटाटोपांत असतां, माझ्यासारख्या स्वतःचें किंवा उसनें लेखनसामर्थ्य, तसेंच कोणत्याहि छापखानेवाल्याचें किंवा भांडवलदाराचें पाठबळ नसणाऱ्या, परस्थ व वृत्तव्यवसायास अनभ्यस्त अशा माणसानें ' लोकशिक्षणा 'चा नवीन उपक्रम महाराष्ट्राच्या राजधानींत हातीं घेणें म्हणजे त्या काळीं तें एक मोठें साहसच होतें यांत शंका नाहीं.

तथापि ' लोकशिक्षणा 'चें मुख्य उद्दिष्ट ललित वाङ्मयनिर्मितीपेक्षां विचारप्रधान व देशोन्नतिकारक साहित्य निर्माण करण्याचें म्हणून बुद्ध्या निश्चित केलें गेल्यामुळें इतिहास, राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, शिक्षण इत्यादि विषयांतील तज्ज्ञ व अभ्यासू लेखक शोधून काढून हरप्रयत्नानें त्यांचें सहकार्य संपादणें, हेंच माझें आद्य कर्तव्य होऊन बसलें; आणि ह्या दृष्टीनें पाहणी व विचारविनिमय करीत असतां, टिळक महाविद्यालयास तेव्हां अलीकडेच येऊन मिळालेले विद्वान् व उत्साही अध्यापक श्री. शंकरराव जावडेकर यांच्याशीं माझा ऋणानुबंध अगदीं प्रथमपासून जुळून आला. ह्याचें कारणहि उघड होतें. तें म्हणजे, आम्हां उभयतांतील समानशीलत्व. मी स्वतः राष्ट्रीय शिक्षणाच्या उद्योगांतून स्वार्थावर पाणी सोडून बाहेर पडलेला; तर तेहि टिळक-राष्ट्रीयमहाविद्यालयांत काम करणारे त्यागी आजीव-सेवक. दोघेहि राष्ट्रीय सभेचे कट्टे अभिमानी, इतकेंच नव्हे तर जसे लो. टिळकांचे तसे म. गांधींचेहि चाहते, आणि म्हणूनच पुण्यांतील नेमस्त व 'केसरी' पक्षाच्या बाहेरचे; तसेंच दोघांनाहि महाराष्ट्रांतील सुशिक्षित वर्गाची वैचारिक व देशोन्नतिकारक प्रगति ' लोकशिक्षणा 'सारख्या मासिकाच्या द्वारें साधण्याची विशेष इच्छा. मात्र शंकरराव जावडेकर हेहि त्या काळीं लेखक म्हणून अद्यापि महाराष्ट्रास फारच थोडे परिचित होते. ज्यांना त्यांचा 'राजनीतिशास्त्रपरिचय' हा नुकताच प्रसिद्ध झालेला ग्रंथ पाहून त्यांच्या व्यासंगाची कांहीं कल्पना येत असे; आणि दे. भ. शंकरराव देव यांनीं चालविलेल्या '**स्वराज्य**' पत्रांत ते लिहीत असतात, ही गोष्ट कांहीं जणांस माहीत होती. परंतु पुण्यांतील साहित्यलोकांतहि त्या काळीं त्यांना कोणी मोजीत होतें, असें दिसलें नाहीं! इतकेंच काय, पण त्यांच्या टिळक-महाविद्यालयांतील साहित्यशौंडहि त्यांची गणना साहित्यिकांत करीत नसत! मला मात्र पहिल्याच एक-दोन बैठकींत शंकररावांचें इतिहास, राजकारण अर्थशास्त्र, समाजशास्त्र व तत्त्वज्ञान ह्या विविध शाखांतील विस्तृत वाचन, त्यांची तर्कप्रधान विवेचनशैली व प्रचलित राजकारणाचें मार्मिक समीक्षण यांचा चांगला प्रत्यय आला; आणि त्यांच्या ठिकाणीं लेखनसाहाय्य करण्याची जशी पात्रता तसा पुरेसा उत्साहि आहे, हें जाणून ' लोकशिक्षणां 'तील राजकीय विषयावरील लेखन मीं मुख्यत्वें त्यांजवर सोंपविलें. आणि मला सांगावयास मोठा संतोष व अभिमान वाटतो कीं, दहा-बारा वर्षांच्या आमच्या ह्या सहकार्यांत महत्त्वाचा मतविरोध क्वचितच आला. तसें म्हटल्यास आमच्या उभयतांच्या विचारसरणींत संपूर्ण एकवाक्यता नव्हती व नाहीं. तथापि ' लोकशिक्षणां 'त प्रसिद्ध होणारे सर्वच लेख किती बारकाईनें संपादिले जात हें ज्यांस विदित आहे, त्यांना श्री. जावडेकरांनीं एकंदर संपादकीय धोरणाविषयीं कधींच वैषम्य मानिलेलें नव्हतें आणि त्या दृष्टीनें आम्हां उभयतांत एकदांहि खटका उडालेला नाहीं, ही गोष्ट निश्चित उल्लेखनीय वाटेल, असें मी समजतों.

' लोकशिक्षणां 'तील राजकीय विषयावरील लेखनाची ही जबाबदारी श्री. शंकरराव जावडेकर यांनीं किती उत्कृष्ट रीतीनें पार पाडली, हें ' लोकशिक्षणा 'चे दहा वर्षांचे खंड पाहिले असतां कोणासहि सहज दिसून येईल. जानेवारी १९२८ पासून ह्या मासिकास प्रारंभ झाला, आणि पहिल्याच अंकांत ' स्वराज्य, स्वातंत्र्य व स्वयंनिर्णय ' ही जी त्यांची उद्बोधक लेखमाला चालू झाली ती आजहि वाचनीय आहे. ह्या व पुढल्या वर्षी तेव्हां नवीनच लक्ष वेधून घेणाऱ्या ' रशियन क्रांती'वर एक महत्त्वाची आठ अंकी लेखमाला त्यांनीं गुंफिली असून त्या विषयावर मराठींत विचारप्रवर्तन करणारें असें हें प्रायः पहिलेंच लेखन होय. तसेंच शंकररावांची पुरोगामी राजकीय दृष्टि सन १९३१ सालीं-म्हणजे दीड








तत्पूर्वीच—त्यांच्या 'समाजसत्ताक लोकशाही पक्षाची आवश्यकता' ह्या लेखांत प्रतिबिंबित झालेली दिसेल. हिंदी राजकारणांतील प्रचलित घडामोडींचें समीक्षण करणारे लेख तर 'लोकशिक्षणा'च्या कारकीर्दीत पुष्कळच लिहिले गेले असून त्या त्या वेळीं चिकित्सक वाचकांना त्यांनीं चांगलें आकृष्ट करून घेतलें. 'केसरी'कार केळकरांनीं व पुढें बॅ. सावरकरांनीं लो. टिळकांच्या राजकारणाला आपल्या प्रकृतीस अनुसरून कसें विकृत किंवा भिन्न स्वरूप दिलें ह्याचें मार्मिक विवेचन १९३१ पासूनच प्रसिद्ध झालेल्या 'असंतोषात्मक टिळकभक्तीची मीमांसा,' 'लो. टिळकांचें विवेकी राजकारण आणि बॅ. सावरकरांची अविवेकी हुल्लड' आणि 'टिळक, सावरकर व गांधी' ह्या लेखांत आढळत असून हे प्रबंध अभ्यासकांना आजहि उपयुक्त वाटतील. सारांश,श्री.जावडेकरांनीं १९२८ ते १९४०पर्यंतच्या महत्त्वपूर्ण राजकीय कालखंडांत 'लोकशिक्षणां'तील आपल्या लेखनसंभारानें महाराष्ट्रांतील प्रचलित विचारसरणी राष्ट्रसभेच्या राजकारणास बरीच अनुकूल करून घेतली ह्यांत शंका नाहीं. मात्र त्याचबरोबर आर्थिक दृष्ट्या 'लोकशिक्षण' यशस्वी होण्याच्या मार्गांत कांहीं व्यावहारिक अडचणी उत्पन्न झाल्या हेंहि तितकेंच खरें!

श्री. शंकररावांचें 'लोकशिक्षणां'स जसें बहुमोल साहाय्य झालें तसें 'लघुग्रंथमालें'त 'आधुनिक राज्यमीमांसा' भाग १ व २ हीं उत्कृष्ट पुस्तकें गुंफून तिला त्यांनीं शोभिवंत केलें आहे. ह्याच विषयावर त्यानंतर कित्येक प्रकाशकांनीं दुसरीं लहानमोठीं पुस्तकें लिहविलीं असलीं तरी ह्या ग्रंथांतील व्यापक, स्वतंत्र व मूलग्राही विषयविवेचनाची सर त्यास येणार नाहीं. आणि ज्याप्रमाणें १९२६ मध्यें प्रसिद्ध झालेला श्री. जावडेकरांचा 'राजनीतिशास्त्र-परिचय' हा त्या विषयावर मराठी वाङ्मयांतील पहिला नामांकित ग्रंथ गणिला जाईल, त्याचप्रमाणें 'आधुनिक राज्यमीमांसा' हा त्यांचा अभिनव ग्रंथहि राजकीय तत्त्वज्ञानावरील पहिला उत्तम ग्रंथ म्हणून संस्मरणीय ठरेल ह्यांत शंका नाहीं.

तात्पर्य, १९४१ मध्यें 'लोकशिक्षण' व 'लघुग्रंथमाला' हे दोनहि ध्येयवादी उपक्रम दुर्दैवानें खंडित झाले असले, तरी जोंपर्यंत त्यांची कांहीं निशाणी महाराष्ट्रवाङ्मयांत राहील तोंपर्यंत त्या उपक्रमांचे अभिमानी व महनीय लेखक म्हणून माझे स्नेही—सहकारी शंकरराव जावडेकर यांचेंहि नांव विसरलें जाणार नाहीं, असा मला भरंवसा वाटतो. तसेंच वीस वर्षांपूर्वी ते स्वतः लेखक म्हणून फारसे प्रसिद्ध नसतां 'लोकशिक्षणां'-तून सतत प्रसिद्ध झालेल्या विचारप्रवर्तक लेखनामुळेंच मुख्यत्वें त्यांस आजकालचें स्पृहणीय 'आचार्य'-पद प्राप्त झालें आहे, ह्या गोष्टीचा मला अभिमान वाटतो. स्वतः शंकररावांना आपले लेख 'लोकशिक्षणां'तूनच प्रसिद्ध होणें अधिक श्रेयस्कर व भूषणावह कसें वाटे ह्याची ग्वाही तेहि देतील. असो.

श्री. जावडेकर यांच्या विचारसंपन्न व प्रगमनशील वाङ्मयसेवेमुळें आठ वर्षांपूर्वीच महाराष्ट्र—साहित्य—संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान त्यांस मिळावा, म्हणून माझ्यासारख्या त्यांच्या चाहत्यांनीं कांहीं प्रयत्न केला होता; परंतु तो थोडक्यांत हुकला! अर्थात् पुण्यपत्तनांतील आगामी संमेलनाचें अध्यक्षपद आज तरी त्यांस लाभत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. ह्या सन्मानाबद्दल शंकररावांचें अभिनंदन करून आणि अशाच प्रकारें ह्यापुढेंहि महाराष्ट्र—साहित्याची अभिवृद्धि करण्यास त्यांना दीर्घायुरारोग्य लाभो असें मनःपूर्वक चिंतून हे चार शब्द संपवितों.

—श्री. गणेश गंगाधर जांभेकर

---

## मार्क्सवादांतील माझे पहिले गुरु

स. १९३८ सालची गोष्ट. भागवत व जावडेकर हे टिळक—महाविद्यालयांत त्यावेळीं प्राध्यापक म्हणून काम करीत होते. आचार्य ही पदवी त्यामुळेंच या उभयतांना प्राप्त झाली असावी असें मला वाटतें. त्या विद्यालयाच्या वसतिगृहाची व्यवस्था आचार्य भागवत यांचेकडे होती. ते मूळचे महाडचे रहिवाशी. त्यामुळें त्यांचा व माझा महाडपासूनच ऋणानुबंध होता. मी वसतिगृहांत त्यांचेकडे नेहमी जात असे. व तेथेंच एका








प्रसंगीं आचार्य भागवतांनीं आचार्य जावडेकरांचा व माझा परिचय करून दिला.

स. १९२४ च्या सुप्रसिद्ध खटल्यापासून कम्युनिझम्, मार्क्सवाद हे शब्द कानांवर येऊन आदळत होते. मध्यंतरीं कै. खाडिलकर यांचें वसंतव्याख्यानमालेंत झालेलें 'बोल्शेव्हिझम'-वरील व्याख्यानही मीं ऐकलें होतें. अशा मनः-स्थितींतच स. १९२८ सालीं आचार्य जावडेकर यांचा व माझा परिचय झाला. त्याच सालच्या 'लोकशिक्षण' मासिकांत 'रशियन क्रांतीची पूर्व-पीठिका' व 'त्या क्रांतीचें महत्त्व' हे दोन लेख आले होते, तेहीं माझ्या वाचनांत आले. तेव्हां 'कम्युनिझम्' हें काय प्रकरण आहे हें समजून घेण्याची जिज्ञासा माझ्या मनांत साहजिक उत्पन्न झाली. व म्हणून लिंडसेनें लिहिलेलें Karl Marx's Capital हें पुस्तक त्यांच्या साहाय्यानें वाचण्यास मी प्रारंभ केला. नंतर स. १९२९ सालीं बोल्शेव्हिक क्रांतीसंबंधीं त्यांनीं एक लेखमालाच 'लोकशिक्षण' मासिकांत लिहिली. तीहि मी वाचली. अशा रीतीनें कम्युनिझमचा जो कांहीं थोडा फार अभ्यास माझा झाला, त्यांचें पहिलें श्रेय आचार्य जावडेकरांकडेच आहे.

आचार्य जावडेकरांशीं कोणाचाही एकदां परि-चय झाला कीं तो कसलाहि विकल्प मध्यें न येतां, अविच्छिन्नपणें कायमचा रहातो. घसट राहिली तर इतरांचें बाबतींत नव्याण्णव हिश्शांनीं संघर्ष उत्पन्न होण्याचा संभव असतो. पण आचार्यांच्या बाबतींत याबद्दलचा माझा अनुभव अगदीं उलट आहे. जितकी घसट अधिक तितका तो ऋणानुबंधहि अधिकाधिक दृढ होत जातो. याला कारण त्यांच्या अंगचें अभिजात सौजन्य हेंच होय. मन व्यापक, वृत्ति उदार व प्रेमळ. अभिजात सौजन्य तें हेंच. विचारसरणीच्या बाबतींत त्यांच्याशीं कोणाचे कितीहि मतभेद झाले असले तरी ऋणानुबंधांत केव्हांहि विकल्प येत नाहीं. कम्युनिझमचे बाबतींत मी त्यांना गुरु मानतों. पण पुढें जागतिक परिस्थितीचें विषमते-नें भरलेलें चीड उत्पन्न करणारें हिडिस स्वरूप जसजसें मला दिसूं लागलें, तसतशीं अध्यात्माच्या दृष्टीनें समन्वय करूं पहाणारी त्यांची विचारसरणी जरी तर्कदृष्ट्या शास्त्रशुद्ध असली तरी व्यवहारदृष्ट्या मला ती आजतागायत पटलेली नाहीं. हें मतभेदाचें स्वरूप इतकें पराकोटीला गेलेलें आहे कीं अखेरीस उभयतांनीहि 'हें आम्हांला मान्य नाहीं' अशा रीतीनेंच वादाचा समारोप करावा लागलेला आहे. तरीपण त्यांच्या अभिजात सौजन्यामुळें तो नेहमीं हंसतमुखानेंच होत आलेला आहे.

बौद्धिक प्रामाणिकपणा हा आचार्य जावडेकरां-च्या बाबतींत मला विशेष ठळक रीतीनें दिसून आला. काँग्रेस आतां समाजवादी व्हावी ही त्यांची इच्छा. पण तशी ती झाली नाहीं, इतकेंच नव्हे तर समाजवादी पक्षाला तिच्यांतून बाहेर पडावें लागलें. हें पाहून अशा काँग्रेसचें आपल्या हातून कार्य होणें शक्य नाहीं म्हणून ते काँग्रेसमधून बाहेर पडले. व काँग्रेसचे मुखपत्र जें 'लोकशक्ति' त्याचें संपादकत्वहि त्यांनीं सोडलें.

सांसारिक सुखदुःखांच्या बाबतींत त्यांची वृत्ति 'विपत्कालीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें' अशा प्रकारची रहात असल्याचा एक प्रसंग मला आठवतो. ४२ सालच्या आंदोलनांत ते तुरुंगांत होते. त्यांचा मुलगाहि विजापूरच्या तुरुंगात होता. तो तेथें विषम-ज्वरानें आजारी पडला. डॉक्टरांना त्याच्या प्रकृती-बद्दल वडिलांना तार करणें जरूर वाटलें. त्याला भेटण्याच्या निमित्तानें पॅरोलवर त्यांची सुटका होऊन ते विजापुरास जाण्यासाठीं पुणें येथें आल्याचें मला समजल्यावरून मी त्यांना भेटावयास गेलों. मी स्वतः त्यावेळीं बेचैन झालों होतों. पण स्वतःचा मुलगा काळजी करण्यासारख्या स्थितींत असतांहि शांतपणानें व धीरानें त्यांनीं मला त्याच्या दुखण्याची हकीकत सांगितली. हें पाहून मी मनांतल्या मनांत लाजून गेलों.

असो, अशा प्रकारें त्यांच्या संबधाच्या माझ्या थोड्याशा आठवणी या प्रसंगानें मी दिल्या आहेत. साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदीं त्यांची निवड झाल्याबद्दल साहजिकच मला आनंद होत आहे.

—श्री. त्र्यं. सी. कारखानीस











## जावडेकरांना जवळून पाहिल्यावर

जावडेकरांचा फारसा परिचय मला घडला नव्हता. मुद्दाम होऊन तो करून घ्यावा असा माझा स्वभाव नाहीं. त्यांत मला सौंदर्य दिसत नाहीं. शिवाय जावडेकरांच्या वाङ्मयाचा मी इतका अभ्यास केलेला नव्हता कीं त्यांच्या भेटीची माझी उत्सुकता अनावर व्हावी. किंबहुना त्यांच्या विद्वत्तेला मी थोडा घाबरूनच होतों म्हणा ना!

पण एक दिवस संध्याकाळीं ध्यानीं मनीं नसतां त्यांच्या भेटीचा योग जमून आला. मी हरीभाऊ जोश्यांना भेटण्यासाठीं 'लोकशक्ती'त गेलों होतों. काम आटोपून निघालों तेव्हां त्यांनीं विचारलें: 'जावडेकरांचा तुमचा परिचय आहे ?'. मी 'नाहीं' म्हणतांच ते म्हणाले, 'तर मग बसा. इतक्यांत ते येतील. तोंपर्यंत तुमच्यासाठीं चहा मागावितों. पुन्हां त्यांच्याबरोबर दुसरा चहा आहेच'. मी थांबलों. बाहेर पावसाची सर सुरू झाली. तेवढ्यांत फ्रेम केलेला जावडेकरांचा फोटो हरीभाऊंच्या टेबलावर आला. तो त्यांना देण्यासाठीं होता. फोटो माझ्यापुढें धरीत हरीभाऊंनीं विचारलें: 'कसा आहे ?' पण या प्रश्नाचें नीट उत्तर द्यायला मी जावडेकरांना कुठें पाहिलें होतें ? पण सकृद्दर्शनीं मला प्रश्न पडला, हा फोटो जावडेकरांचा आहे कीं कुणा रशियन लेखकाचा आहे ? त्या चेहऱ्यांत Rough, elemental, stormy असें कांहींतरी होतें. पिंजारलेले केस, कात्रीचा स्पर्श न झालेल्या मिशा, भव्य कपाळ आणि भेदक नजर—यांमुळें ही कुणीतरी उग्र असामी असावी असें मला वाटलें.

माझ्या मनातलें त्यांचें चित्रहि कांहींसें असेंच होतें. मी त्यांच्या साहित्याचा म्हणण्यासारखा अभ्यास केलेला नव्हता. त्यांच्या व्यक्तित्वाचें दर्शनहि घेतलें नव्हतें. पण त्याचा भार आणि धार मला जाणवली होती. गांधीवाद हें निर्बुद्ध भोळसटांचें त्राग्याचें राजकारण आहे अशी हेटाळणी जेव्हां महाराष्ट्रांतील वांझोट्या महत्त्वाकांक्षेच्या मतलबी बुद्धिवाद्यांनीं सुरू केली तेव्हां प्रखर बुद्धिवादानें जावडेकरांनीं त्यांचा कसा धुव्वा उडविला याची मला जाणीव होती.--आचार्यांना यायला अपेक्षेपेक्षां अधिक विलंब लागला होता. दिवे केव्हांच लागून गेले होते. पाऊसहि थांबला होता. तोंच धोतराचे ओचे सांभाळीत आचार्यांची मोटकी मूर्ति आंत आली. 'या दम्यामुळें असें हें पावसाला भिऊन वागावें लागतें' अशी मखलाशी करीत त्यांनीं स्वतःसाठीं ठेवलेली मानाची खुर्ची तशीच टाकून आम्हां तरुण मंडळींतलीच एक खुर्ची घेतली. त्यांची येण्याची, बसण्याची, बोलण्याची सारी रीत अशी होती कीं ते जणुं आपल्याच घरीं आणि आपल्याच मुलामाणसांत आहेत. आधींच वृत्तपत्राची कचेरी आणि तेथें जावडेकर. तेव्हां राजकारणाची चर्चा तेथें निघाल्यास नवल तें कोणतें ? कोणता प्रश्न आणि तो कसा निघाला हें मला नीट आठवत नाहीं. कारण ते काय प्रतिपादन करतात यापेक्षां ते कसे वागतात याचाच माझ्यावर अधिक प्रभाव पडला होता. महाराष्ट्रीय विद्वानांची परंपरागत आढ्यता, तुसडेपणा, दुर्मुखलेपणा यांचा या माणसांमध्यें लवलेश देखील नव्हता. किंबहुना आपण विद्वान् आहोंत याची जाणीवहि नसल्यासारखें त्यांचें वागणें होतें. ते तरुणांतलेच एक झाले होते, आपलें वय आणि अधिकार विसरले होते आणि आम्हां लोकांशीं बरोबरीच्या नात्यानें बोलत होते. मधून मधून त्यांना खोकल्याची उबळ येत होती. बोलतांना त्यांना कष्ट पडत होते. सिंदबादच्या मानगुटीवर बसलेल्या म्हाताऱ्याप्रमाणें दम्यानें त्यांच्या मानेला पायाचा विळखा घातला आहे आणि कंठाला तात लावली आहे असें मधून मधून किनऱ्या जाणाऱ्या त्यांच्या आवाजावरून वाटत होतें. पण बोलतां बोलतां ते आवेशांत आले म्हणजे तो दमाहि दबला जाई; त्यांच्या म्हाताऱ्या शरीरांतून तरुणांचा उत्साह उतू जाऊं लागे आणि हा समर्थ पुरुष कशाहि स्थितींत विचारांचे सप्तसमुद्र निधडेपणानें उल्लंघून जाईल अशी साक्ष पटे. 'आज देशामध्यें जें सरकार आलें आहे, त्यांत पटेल आणि नेहरू या दोन भिन्न प्रवृत्तींची युति आहे. कांहीं काल ती अपरिहार्य असली तरी अशी स्थिति फार काल रहाणें भावी प्रगतीच्या दृष्टीनें धोक्याचें आहे, असें त्यांचें म्हणणें होतें. बोलतां बोलतां, त्यांच्या फोटोंत दिसलेलें तें Stormy कांहींतरी मला त्यांच्या प्रतिपादनांतहि जाणवूं लागलें. देशांतल्या कोणत्या-








हि व्यावहारिक आपत्तीपेक्षां 'त्याच्या प्रश्नेंतला गोंधळ त्यांना अधिक उत्पातकारी आणि धोक्याचा वाटत होता आणि तें आम्हाला पटविण्यासाठीं ते रक्त आटवीत होते. आणि हें सारें करीत असतांना त्यांची वैयक्तिकता सर्वस्वीं अलिप्त होती. त्यांच्या सहजतेला आणि चांगुलपणाला सीमा नव्हती. त्यांच्या विचारांमध्यें फार मोठें सामर्थ्य होतें. पण त्यापेक्षांहि त्यांच्या मागची त्यांची तळमळ, त्यांची श्रद्धा मला अधिक प्रभावी आणि जीवनस्पर्शी वाटली.

ते जेथें उतरले होते तेथूनच मला माझ्या मुक्कामाला जावयाचें असल्यामुळें त्यांनीं मलाहि आपल्याबरोबर टांग्यांत बोलाविलें. जावडेकरांच्या वेगवेगळ्या विषयांवरील मतांपेक्षां त्यांना दिसलेल्या गांधीजींचें दर्शन घेणें माझ्या दृष्टीनें अधिक महत्त्वाचें होतें. कारण माझ्या मनांतली गांधीजींची मूर्ति मला अशा डोळस गांधीभक्तांच्या दृष्टिकोनाच्या मदतीनें घडवावयाची आणि त्यांच्या कसोटीवर पारखून पहावयाची होती. मी त्यांना माझा ' महात्मायना 'चा संकल्प सांगितला. नुकत्याच मी गांधीजींवर लिहिलेल्या श्रुतिनाटिकेची मध्यवर्ती कल्पना सांगितली. दशावतारांत शेवटचा अवतार म्हणून गांधीजींचा अंतर्भाव करून हिंसेतून अहिंसेकडे परमात्म्याची कशी विभूतिवृद्धि होत चालली आहे हें त्यांतून दाखविण्याचा मी प्रयत्न केला होता. मी ही कल्पना त्यांना सांगतांना ते उत्तेजित झाले. हीच कल्पना आपण कुठें तरी मांडल्याचा त्यांनीं उल्लेख केला. पृथगात्मता कीं काय म्हणतात तिला मी अशा रीतीनें मुकलों होतों! पण ही कल्पना जावडेकरांच्या बुद्धिवादाच्या कसोटीवर टिकणारी आहे असें पाहून मला थोडा आत्मविश्वास आला आणि आपण योग्य वाटेवर आहों याचा प्रत्यय येऊन समाधान वाटलें. मग आमचें ' महात्मायना '-विषयीं बोलणें सुरू झालें तेव्हां ते मला म्हणाले, ' तुम्ही रघुवंशासारखें कांहींतरी लिहा. भारताची आध्यात्मिक परंपरा आणि राजकीय परंपरा वेगवेगळ्या ऐतिहासिक व्यक्तींच्या द्वारा दाखवून त्या उभयतांचा संयोग आणि विकास गांधीजींत कसा झाला आहे हें तुम्हांला सुंदर रीतीनें दाखवितां येईल! ' त्यांच्या या सल्ल्याचा मला कितपत उपयोग होईल हें आतांच मला सांगतां येण्यासारखें नसलें तरी त्यांच्या भक्कम विचारशक्तीला Epic कल्पकतेची जोड आहे एवढें मी ओळखलें. त्यांना त्यांच्या निवासस्थानीं पोंचवून मी टांगा पुढें हांकावयाला सांगितलें. टांगा वेधशाळेवरून चालला होता आणि तेथून Weather Forecast करण्याच्या इराद्यानें अंतरिक्षांत फुगे सोडले जात होते. मुलांच्या फुग्यांसारखे ते रंगीबेरंगी नव्हते, निर्हेतुक नव्हते, करमणुकीसाठीं नव्हते. त्यांच्यामागें शास्त्रीयता होती, एक सूत्र होतें, वाऱ्यांची गति, दिशा आणि शक्ति मापण्याची व्यवस्था होती आणि अशा प्रकारें वातावरणाचा अंदाज बांधून धोक्याच्या सूचना देण्याची बुद्धि होती. माझ्या मनांत विचार आला कीं आम्ही कवि मुलांप्रमाणें कल्पनांचे फुगे उडवितो आणि स्वतःचा आणि लोकांचा थोडा वेळ आनंदांत घालवितों; पण आचार्यांसारखे विचारवन्त जे फुगे उडवितात, ते समाजाच्या वेधशाळेंतले फुगे आहेत. राष्ट्राचें वातावरण त्यांच्यावरून ओळखतां येतें आणि सावध होऊन धोके टाळतां येतात. त्यांच्या ठिकाणीं नयनरम्यत्व नसलें तरी त्यांची अद्भुतरम्यता यत्किंचित् कमी नाहीं. आम्हीं कवींनीं त्यांचेंहि सौंदर्य ओळखावयला आतां शिकलें पाहिजे.

आचार्यांना लोक बुद्धिवादी म्हणतात. मी त्यांना जीवनवादी मानतों. जीवनाविषयींचें त्यांचे आकर्षण केवळ बुद्धींत नाहीं, तर त्यांच्या उपजत unerring instinct मध्यें आहे. पण तिला बौद्धिक बैठक मिळवून देईपर्यंत ते स्वस्थ बसत नाहींत. म्हणूनच वयाच्या एकविशींत देखील टिळकपक्ष किंवा ' भारतसेवकसमाज ' यांपैकीं कुणालाहि न मिळतां ते महात्मा गांधींकडे आकृष्ट झाले. टिळकांचें राजकीय क्रांतिकारकत्व, आगरकरांचें सामाजिक क्रांतिकारकत्व आणि गोखल्यांची सत्यनिष्ठा हीं विकसित स्वरूपांत गांधीजींत एकात्म झालीं आहेत आणि भारताचा आध्यात्मिक वारसा घेऊन तीं आतां कांहींतरी अद्भुत करून दाखविणार आहेत हें त्यांनीं जीवनवादित्वाच्या, unerring instinct च्या जोरावर ओळखलें. पण तेवढ्यावर ते थांबले नाहींत. तर गांधींचीं 'सत्याग्रह' आणि 'असहकार' हीं तत्त्वें राज्य-








शास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र आणि अध्यात्म यांच्यावर तपासून त्यांना बौद्धिकतेची बैठक दिली पाहिजे हेंहि त्यांनीं ओळखलें आणि तेंच आपलें कार्य आहे हें जाणलें. त्यांचें सुरुवातीपासून आजपर्यंतचें सर्व वाङ्मय पाहिलें तर आजच्या युगधर्माचा शोध घेत आणि त्याचें अधिकाधिक स्पष्टीकरण करीत ते आले आहेत. आणि सत्याग्रह हा प्रजांच्या उद्धारांचा सनातन साधनमार्ग आहे आणि लोकशाही समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे अशा सिद्धांतावर येऊन ते ठेपले आहेत

—श्री. बा. भ. बोरकर

---

## निरहंकारी अहिंसात्मक मनोवृत्तीचा विजय

१९२५ मध्यें जावडेकरांची व माझी प्रथम भेट आगगाडींत झाली. मुंबईस कै. लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदुमहासभेची बैठक होती. आम्ही दोघेहि त्या बैठकीसाठीं जमलों होतों. मी त्या वेळीं महासभेचा एक पदाधिकारी होतो. ते प्रेक्षक या नात्यानें गेले असावेत. गाडींत, बहुधा कै. मुंडले यांच्यामुळें श्री. जावडेकर यांचा माझा परिचय झाला असावा.

१९३३ मध्यें नाशिक जेलमध्यें त्यांची माझी पुन्हां भेट झाली. तीच खरी भेट. कांहीं दिवस 'महाराष्ट्र प्रांतिक'साठीं चळवळ चालविण्याचें काम मी करीत होतों. ते करीत असतांच पकडलों गेलों होतों. प्रांतांतील वस्तुस्थिति व चळवळ पुढें चालू ठेवण्याच्या दृष्टीनें त्या वेळीं बाहेर असलेले राजेंद्रबाबू आदि नेत्यांचे विचार समजून घेण्याच्या इच्छेनें तेथील मित्रांनीं तुरुंगांत पाऊल ठेवतांच मला गराडा घातला. ज्या चारदोन प्रश्नांचीं उत्तरें मला नीट देतां आलीं नाहींत ते प्रश्न श्री. जावडेकरांचे होते. त्यांना त्यावेळीं मी ओळखलें नव्हतें. दुपारच्या वेळींहि अंगांत गरम बंडी ( पेटी ), मळकट धोतर, न कापलेले केस अशा वर्षांत ते नेहमीं कोणाशीं तरी वादचर्चा करीत आढळावयाचे. या नाशिक-जेलमध्येंच राजकीय दृष्ट्या माझा पुनर्जन्म किंवा जन्म झाला; त्याचें जनकत्व आ० जावडेकर यांचेकडेच आहे असें मला वाटतें.

पहिले ३।४ महिने माझी बुद्धि आ० जावडेकरांच्या बौद्धिक आक्रमणाविरुद्ध बंड करण्यासाठीं शब्दशः उसळून उठत असे. एकहि दिवस असा गेला नसेल, नव्हे दिवसाचे चारदोन तासहि असे गेले नसतील कीं त्यांच्याशीं माझा वाद झाला नाहीं आणि त्यांनींहि माझ्या शंका, माझे प्रश्न यांचा कधीं कंटाळा न मानतां समाधान होईपर्यंत किंवा मला निरुत्तर करीपर्यंत चर्चा करण्याचें सोडलें नाहीं. विशेष अभ्यास न करतां आपल्या मताबद्दल भरपूर आग्रही वृत्ति ठेवणाऱ्यांपैकीं मी एक होतों.

आ० जावडेकरांचा स्वभावपरिचय किंवा त्यांच्या प्रचाराचा प्रभावीपणा सांगण्यासाठीं स्वतः-संबंधींचा हा वैयक्तिक उल्लेख अपरिहार्य आहे. १९३० पर्यंत मी हिंदुमहासभावादीच होतों. गांधीजींच्या दांडी-यात्रेमागील प्रचंड बंडखोर वृत्तीनें मला आकर्षित केलें व मी सत्याग्रहाच्या वावटळींत गुरफटला गेलों. पहिल्या तुरुंगवासांत मी ठाण्यास होतों. तेथें महाराष्ट्र व गुजरातमधील बरेच प्रमुख कॉंग्रेस नेते होते. त्यांपैकीं बहुतेक प्रमुख नेत्यांचा माझा घनिष्ठ स्नेहसंबंधहि जडला.

पांच महिन्यांच्या त्या अमोलिक कालांत माझ्या हिंदुत्वनिष्ठ बुद्धीवर कांहीं नवसंस्कार झाला नव्हता. दीडशेंहून अधिक संख्येच्या त्या मित्रांच्या सहवासांतून मी पूर्व स्वरूपांतच बाहेर पडलों होतों. गांधी—इर्विन करार व नंतरचा दुसऱ्या (१९३२) लढ्याचा काळ यामध्यें मी कॉंग्रेसमध्यें कार्य करीत राहिलों तों केवळ एकामागून एक अशा कामांत गुरफटत गेल्यामुळें व शिस्तीच्या भावनेमुळें. माझी बुद्धि व मतें हिंदुमहासभेच्या प्रवृत्तींचींच राहिलेलीं होतीं. परंतु आचार्य जावडेकरांच्या २।३ महिन्याच्या सहवासानंतर तीं मतें शास्त्रशुद्ध रीतीनें व समूळ उखडून गेलीं असल्याचें मला आढळून आलें.

त्यांची वादपद्धति जितकी तर्कशुद्ध व प्रखर आहे तितकीच ती स्नेहमय असते. विरोधकाच्या अंतःकरणांत सत्यनिष्ठा जागृत करून ती ते वाढवीत नेतात. वाद करतांना दुसऱ्याचें अंतःकरण दुखवलें








जाईल अशी भाषा त्यांच्या तोंडून सहसा निघत नाहीं, दुसऱ्याचा लहानपणा ते केव्हांहि उघडा होऊं देत नाहींत. ज्ञानाचा विपुल संचय, सुलभ विवेचन व मुख्यतः सत्यसंशोधन व सत्योपासना यांचा पदोपदीं होणारा आविष्कार यामुळें त्यांचे वादविवाद हे ऋषिमुनींच्या आश्रमांतील पूर्व-उत्तर पक्षासारखे वाटत व त्यांचा प्रचार प्रभावी व यशस्वी होई. त्यांच्या वादांत तत्त्वाबद्दलचा प्रखर आग्रह असतो; पण या आग्रहांत अहंतेला स्थान नसते. फुंकर घालून जखमेच्या वेदना कमी करणाऱ्याच्या वृत्तीनें पराभूत प्रतिपक्षीयाशीं ते वागतात. त्यांच्या प्रचाराचा विजय हा त्यांच्या निरहंकारी तत्त्वनिष्ठेचा व अहिंसात्मक मनोवृत्तीचा विजय आहे. नाशिकजेलमध्यें झालेलें माझें परिवर्तन हें सर्वस्वीं त्यांच्यामुळें होतें. माझ्याप्रमाणेंच अनेक भांडवलवादी वृत्तीच्या पण प्रामाणिक कॉंग्रेस कार्यकर्त्यांना त्यांनीं समाजवादी दृष्टि पटविली; तर मार्क्सवादी व हिंसामय साधनांवांचून हिंदुस्थानांतील क्रांति यशस्वी होणार नाहीं अशा विश्वासाच्या व समाजवादी निष्ठेच्या कार्यकर्त्यांना त्यांनीं सत्याग्रही प्रतिकाराचा प्रभावही पटविला. नाशिकजेलमधील त्यांचें हें कार्य फार महत्त्वाचें असें होतें.

हिंदी समाजवादी पक्षाचा जन्म नाशिक जेलमध्येंच १९३३ मध्यें झाला आहे. साथी जयप्रकाश नारायण, : मसानी, एस्. एम्. जोशी, पटवर्धन-बंधू, अशोक मेथा, दांतवाला, गोरे आदि समाजवादी पक्षाचे संस्थापक, नेते व कार्यकर्ते व त्यांचे अनेक सहकारी त्यावेळीं नाशिक जेलमध्येंच होते. कॉंग्रेसमधील सत्याग्रही प्रवृत्तीच्या कार्यकर्त्यांना आ० जावडेकर हे समाजवादी दृष्टिकोन पटवून देण्यासाठीं पुष्कळ परिश्रम घेत. त्यामुळें सत्याग्रही व समाजवादी प्रवृत्तीच्या कार्यकर्त्यांच्या मधील संघर्ष पुष्कळ कमी होई. सुसंगत व शास्त्रीय रीत्या तरुण व क्रांतिनिष्ठ विचारांच्या कार्यकर्त्यांना आ० जावडेकर यांनींच गांधीवादाचा परिचय योग्य रीत्या करून दिला. गांधीजींच्या 'ट्रस्टी-शिप'च्या कल्पनेसंबंधीं आ० जावडेकर आपलें मत नेहमीं मांडीत असतातच. पण १९३३ मध्यें नाशिक जेलमधील एका चर्चेच्या वेळीं साथी मिनू मसानी यांना आ० जावडेकर यांनीं ही 'ट्रस्टी-शिप'ची कल्पना सत्याग्रही साधनांनीं व्यवहार्य कोटींत उतरण्यासारखी आहे हें पटवलें होतें असें मला स्मरतें.

महाराष्ट्रांत गांधीवादाच्या निषेधार्थ उभ्या असलेल्या टिळक-परंपरेंतलि नेत्यांच्या मागें सर्व साधनें असूनही बुद्धिनिष्ठ महाराष्ट्राला गांधीवादाचें निर्दोषत्व पटवून देण्याचें महत्कार्य आ. जावडेकर यांच्याइतकें अन्य कोणी केलेलें आहे असें मला वाटत नाहीं. मी स्वतः वैचारिकदृष्ट्या क्रांतिकारक परंपरेवर श्रद्धा ठेवणारा व त्यामुळें अहिंसेचा उपहास करणारा असा होतों. १९३४ डिसेंबरमध्यें मी नाशिक तुरुंगांतून बाहेर पडलो तो अहिंसात्मक प्रतिकाराचा प्रभाव पटलेल्या मनस्थितींत होतों. त्यानंतर त्या विश्वासाला अंशतः जीवनश्रद्धेचें स्वरूप येत राहिलें आहे.

सत्यसंशोधन व आपल्यास पटलेल्या तत्त्वाचा आग्रहपूर्वक प्रचार हेंच त्यांचें जीवनध्येय आहे. हें ध्येय आचरण्यासाठीं कोणताहि त्याग करण्यास ते कचरणार नाहींत. आपलें एखादें स्थान राहील किंवा जाईल, किंवा आपल्या योगक्षेमाचें साधन काय, असल्या गोष्टी त्यांच्या चित्ताला कधीं स्पर्शहि करीत नाहींत.

'लोकशक्ति'-पत्राचें संपादकत्व त्यांनीं दोन वेळां राजीनामा देऊन सोडलें. दोन्ही वेळचे त्यांचे निर्णय मला न पटलेले किंवा अनावश्यक स्वरूपाचे वाटत होते. परंतु त्यांची भूमिका वेगळ्या स्वरूपाची व वरच्या कोटीची होती असें मला नंतर दिसलें.

हे राजीनामे देतेवेळीं आपण पुढें काय करावयाचें वगैरेसंबंधींचा विचार· क्षणभरहि त्यांच्या मनाला शिवला असेल असें मला वाटत नाहीं.

सतत वाचन, मनन व स्वतःस पटलेल्या तत्त्वाचा प्रचार व त्यासाठीं करावा लागेल तो स्वार्थत्याग करण्याची तयारी—या गुणसमुच्चयामुळें आ० जावडेकर यांनीं मराठी साहित्यांत फार थोर असें स्थान संपादिलेलें आहे.

—श्री. ह. मो. जोशी








## संमेलनाध्यक्ष जावडेकर : अभिनंदन व व्यक्तिदर्शन

### क्रियावान् पंडित

यंदा मे महिन्यांत भरणाऱ्या मराठी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष आचार्य श्री. शंकरराव जावडेकर हे निवडले गेले ही अभिनंदनीय घटना आहे. हिंदुस्थानास राजकीय स्वातंत्र्य सुमारें दोन वर्षां-पूर्वीच मिळालेलें आहे. हिंदुस्थानांत नवीन युग सुरू झालें आहे. हें नवीन युग सुरू होण्यासाठीं, राजकीय स्वातंत्र्याची उषा अवतरण्यासाठीं, ज्या अनेक प्रतिभावान् विचारकांनीं सूक्तें रचलीं, त्यांत आचार्य जावडेकर ह्यांची प्रमुखपणानें गणना केली पाहिजे. राजकीय स्वातंत्र्याच्या सुप्रभातीं श्री. शंकरराव जावडेकर यांस आवाहन करून अध्वर्युपदाचा मान साहित्यिक म्हणविणारांनीं दिला ह्यांत साहित्यिकांची गुणाभिरुचि आणि विचारी लोकांमधील नवयुगाची गांभीर्ययुक्त जाणीव प्रकट झाली आहेत.

गेलीं २५ वर्षें श्री. शंकरराव जावडेकर ह्यांनीं आपले विचार, आपली लेखणी व आपलें व्यक्तित्व राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीच्या महदुद्योगांत समर्पण केलेलीं आहेत. आणि ह्यांतच त्यांची सर्व थोरवी सामावलेली आहे. शंकरराव हे पंडित आहेत आणि बुद्धिवैभव हा त्यांच्या व्यक्तित्वाचा विशेष आहे. परंतु ते केवळ पुस्तकी पंडित नाहींत, ते क्रियावान् पंडित आहेत. पुस्तकी पंडित असूनहि त्यांनीं आपलें पांडित्य मातृभूमीच्या उद्धारासाठीं वाहिलें, देशाच्या स्वातंत्र्यप्रीत्यर्थ आपली सर्व विचारशक्ति त्यांनीं उपयोगांत आणली ह्यांतच सामाजिक दृष्टीनें त्यांचें महत्त्व आहे.

हिंदुस्थान परतंत्र असतांना ज्या साहित्यिकांच्या विचारांनीं व लेखनकलेनें स्वातंत्र्याच्या ध्येयानें स्वराज्यप्राप्तीचा मार्ग अनुसरला नाहीं, त्या साहित्यिकांनीं खरें सामाजिक जीवन विचारानें व आचारानें अनुभवलें नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. समाजाची मुख्य गरज ज्या विचारांच्या आटोक्यांत येऊं शकत नाहीं, ते विचार, ती कला व तें साहित्य वस्तुस्थितिनिरपेक्ष आहे. ज्या विचारांमध्यें व ज्या पांडित्यामध्यें समाजाच्या दुःस्थितीस व ती दुःस्थिति थांबविणाऱ्या उपायास स्थान मिळूं शकत नाहीं तो विचार व तें पांडित्य अत्यंत पंगु, असहाय व निर्वीर्य आहे. वस्तुस्थितिनिरपेक्ष अशा विचारामुळें प्रसविलेलें साहित्य किंवा कला हा एक प्रकारचा विलास आहे! हा विलास केवळ व्यक्तिनिष्ठ असेल किंवा नसेल; तो वैचारिक विलास केव्हां केव्हां सामाजिक स्वरूपहि धारण करील; ह्या वैचारिक विलासानें उच्च प्रकारचें मनोरंजन किंवा करमणूक व्यक्तिदृष्ट्या व समाज-दृष्ट्या होऊंहि शकेल. परंतु अशा प्रकारचा उच्च वैचारिक विलास कोणत्याहि तऱ्हेनें समाजोद्धारास सहायभूत होऊं शकत नाहीं आणि स्वार्थपरता हाच हेतु ह्या वैचारिक विलासामध्यें प्रधान असल्यामुळें तो समाजास आणि व्यक्तीस उच्च पदवीस नेऊंहि शकत नाहीं.

खरें साहित्य, खरी कला किंवा खरा विचार तोच कीं, ज्यानें समाजाच्या शृंखला, समाजाचें पारतंत्र्य नष्ट होतील. स्वातंत्र्याभावी समाज हा गुदमरून गेलेला असतो; त्याची संस्कृति मृतप्राय झालेली असते, त्याचें सर्वच जीवन खुरटलेलें असतें. अशा समाजास उत्साहवर्धक आशा दाखविणें, त्या समाजास पराक्रमशील बनविणें व खुरटलेल्या जीवनास पालवी फुटेल असा प्रयत्न करणें हेंच विचारी मनाचें, अभिजात वाङ्मयाचें, कलापूर्ण हृदयाचें कार्य आहे.

ललितवाङ्मय व शास्त्रीय वाङ्मय ह्यांमध्यें अधिक समाजहितवर्धक कोणतें असे प्रश्न निर्माण करणें, त्यामध्यें मूल्यमापन करून त्यांत श्रेष्ठता व कनिष्ठता ठरविणें ही उठाठेव परतंत्र देशांत करण्यांत कांहींहि फायदा नसतो. हे वाद परकीयांनीं आक्रमण केलेल्या समाजांत अनाठायीं आहेत. कारण गुलाम झालेल्या देशांत खरें शास्त्रीय वाङ्मय निर्माण होण्यास अवकाश नसतो व ललित-वाङ्मय हें निव्वळ एक करमणुकीचें साधन बनलेलें असतें. जीवन हें अनेकविध आहे व दुःस्थितीमध्यें खिचपत पडलेल्या समाजास विरंगुळा म्हणून मनोरंजनाची आवश्यकता असते ह्यांत कांहीं शंका नाहीं. परंतु विरंगुळा म्हणून जें मनोरंजन समाजास पाहिजे असतें, त्यानें समाजाचा उद्धार होऊं शकत नाहीं; पराक्रमशील पौरुषमय जीवन हेंच परतंत्र देशांत उच्च वाङ्मय आहे.

श्री. शंकरराव जावडेकर ह्यांनीं अशा उच्च








वाङ्मयनिर्मितीचें कार्य जन्मभर केलें आहे आणि म्हणूनच खऱ्या साहित्यिकांच्या अग्रभागीं ते शोभूं शकतात. शंकररावांचें समाजशास्त्राचें, इतिहासाचें, अर्थशास्त्राचें सूक्ष्म अध्ययन आहे. आमच्या संस्कृतीचें चिकित्सायुक्त परिशीलन त्यांनीं केलेलें आहे. पाश्चात्य संस्कृतीचें व समाजशास्त्राचें तुलनात्मक ज्ञान त्यांनीं संपादन केलेलें आहे. गेल्या ३० वर्षांतील पाश्चात्य समाजांतील स्थित्यंतरें, प्रचंड घडामोडी, क्रांतिकारक उलथापालथी त्यांच्या जाणीवयुक्त नजरेनें पाहिल्या आहेत. अशा तऱ्हेनें अनेक ज्यांची बुद्धि परिणत झालेली आहे, असे अनुभवी विद्वान महाराष्ट्रीय समाजांत अत्यंत विरळा आहेत. शंकररावांची गाढ विद्वत्ता देशभक्तीमध्यें त्यांनीं अनेक वर्षे रुजविली असल्यामुळें त्यांच्या स्वभावांत प्रामाणिक निष्ठेचें असाधारण तेज झळकत असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

स्वातंत्र्ययुगांत साहित्यिकांनीं श्री. शंकररावांची निवड करून त्यांचा मान केला एवढेंच नाहीं तर साहित्यिकांनीं स्वतःसच गौरविलें असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे. —श्री. हरि कृष्ण मोहनी

---

## विचार हेंच जीवन—

[ खालीं दिलेलें पत्र आचार्य विनोबा यांचे बंधु श्री. शिवाजीराव भावे यांनीं १९४० सालीं आचार्य स. ज. भागवत यांना लिहिलेलें असून त्यांतील भाग आचार्य भागवतांच्या कृपेनें 'नवभारता'करितां उद्धृत केला आहे. श्री. शिवाजीराव भावे हे १९४० सालीं 'गीताई'च्या प्रचारकार्यास्तव सातारा जिल्ह्यांत दौऱ्यावर असतांना इस्लामपूरला आचार्य जावडेकरांकडे उतरले होते. त्या मुक्कामांत त्यांना आचार्य जावडेकरांच्या व्यक्तिमत्त्वाचें जें 'दर्शन' झालें, तें त्यांनीं या पत्रांत थोडक्यांत आपल्या चटकदार शैलीनें मांडलें आहे. आचार्य जावडेकरांचें हें 'व्यक्तिदर्शन' एका खाजगी पत्रांतील आहे हे ध्यानांत घेतल्यास त्यांतील स्वारस्य विशेष लक्षांत येईल. — का. सं. ]

आचार्य भागवत,

सा. न. वि. वि..........................

इस्लामपूरला श्री. जावडेकरांच्याकडे उतरलों. ५।६ दिवस चांगलें बोलावयास मिळालें. गांवांत असून गांवाबाहेर असें त्यांचें घर, तसेंच त्यांचें चित्तहि, गांवकी–आणि–"प्रांतकी"– पासून अलिप्त दिसलें. तेथल्या घरांत ते राहतात परंतु घर त्यांचें नाहीं. ह्या बाह्य परिस्थितीप्रमाणेंच त्यांच्या मनाची ठेवणहि एकंदर ममत्वशून्य असून, जसें ते घरीं एकांतांत वरच्या जागीं असतात, त्याप्रमाणेंच नेहमीं विविध विचारांच्या उच्च वातावरणांत त्यांचें मन रमलेलें दिसतें. जरी त्यांचा पूर्व-पश्चिम दोन्हीं संस्कृतीचा अभ्यास असला तरी त्यांच्या खोलींत एकंदर पश्चिमी पुस्तकांचीच गर्दी दिसली. उघडच आहे. इकडच्या दुनियेंत आपण प्रत्यक्ष राहतों तेव्हां पुस्तकें इकडचीं कशाला? म्हणून पश्चिमी विचारांचीं पुस्तकरूपानें निरनिराळीं दालनें आणून तिकडची दुनिया उभी केली आहे. अर्थाकडे (पैशाकडे) विशेष लक्ष नसूनहि ते इतर विषयांच्या तुलनेनें अर्थशास्त्राचा जास्त विचार करतात. त्यांच्या परार्थ प्रेरणेचाच तो परिणाम असावा. शिवाय आध्यात्मिक शक्तीवरहि त्यांचा विश्वास आहे. त्यावरून परमार्थाकडेहि त्यांची नजर आहे, असें दिसतें. "लेखणीचा" त्यांच्यावर वरदहस्त आहे असें म्हणण्यापेक्षां (सदैव लेखणीवर त्यांचा हात असल्यामुळें) लेखणीवर "त्यांचा" वरदहस्त आहे असेंच म्हणणें योग्य ठरेल. लेखणीहि त्यांच्या आज्ञेप्रमाणें बरोबर काम देते असें दिसतें. आपणाप्रमाणें ते ह्या लिहिण्याच्या बाबतींत पराधीन किंवा कर्मविमुख नाहींत. लेखनाच्या दृष्टीनें खरोखर ते मोठेच कर्मयोगी दिसले!—एकंदरींत त्यांच्या सहवासांत फारच आनंद वाटला. प्रचलित विषयावर त्यांनीं पुष्कळच नवीन विचार सांगितले. विचारांच्या जोरकसपणामुळें बोलतांना त्यांचा आवाज जरी मधून मधून मोठा होत असे तथापि 'काश्मीरजस्य कटुतापि नितांतरम्या,' हें आपल्या भाषणांतलें वैशिष्ट्य त्यांत प्रकट झालेलें दिसलें नाहीं.

शिवाजी

---








विक्रीस तयार !

# नवभारत

अनेक ग्राहकांच्या मागणीवरून 'नवभारता' च्या पहिल्या वर्षाच्या (ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८) बारा अंकांचें उत्कृष्ट बांधीव पुस्तक विक्रीस तयार असून म. ऑ. नें रु. पंधरा फक्त आल्यास तें रजि. बुक-पोस्टानें घरपोंच पाठवूं. व्ही. पी. नें पाठविलें जाणार नाहीं.

## जुने अंक विकत घेऊं

'नवभारत' चे जानेवारी १९४८ व मार्च १९४८ हे दोन अंक आमचेकडे मुळींच शिल्लक नसल्यानें ते योग्य किंमतीस विकत घेऊं. वरील अंक कोणाकडे असल्यास त्यांनीं आम्हांस कळविण्याची अवश्य कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत'
२९१ शनिवार, पुणें २

## वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोष्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोष्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होता येते.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखे-पूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत' च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक
'नवभारत',
२९१ शनवार पेठ, पुणें २.

